# काळीगंगा



कोकणी लेखक :
महाबळेश्वर सैल
मराठी अनुवाद :
प्रफुल्ल गायतोंडे

# काळीगंगा

(कोकणी कादंबरी)

मूळ लेखक

महाबळेश्वर सैल

मराठी अनुवाद

प्रफुल्ल गायतोंडे

प्रतिमा प्रकाशन

Kaliganga (Kokni Kadambari)
Author : Mahabaleshwar Sail
काळीगंगा (कोकणी कादंबरी)
मराठी अनुवाद: प्रफुल्ल गायतोंडे

प्रकाशन क्रमांक: २६७

प्रकाशक
अरुण पारगावकर
प्रतिमा प्रकाशन
१३६२ सदाशिव पेठ, औदुंबर अपार्टमेंट्स,
नवा विष्णु मंदिर चौक, पुणे ४११ ०३०
दूरभाष: ४४७ ८९०८ / ४४७ ८४४४


९/१३१ मीरा सोसायटी, सॅलसबरी पार्क
पुणे ४११ ०३०
फोन: ४२६ ५००४

मुद्रक
लताली प्रिंटर्स
२२ बुधवार पेठ,
आनंदाश्रम, पुणे ४११ ००२

अक्षरजुळणी
टाइपो-आर्टस्
सौ. धनश्री ध. पुरोहित
१४८१ शुक्रवार पेठ,
शनिपार-मंडई रस्ता, पुणे ४११ ००२

मुखपृष्ठ: रमेश भारताल, पुणे

प्रथमावृत्ती: डिसेंबर, २००३

मूल्य: २००/- रुपये

I.S.B.N./81/7774/058/X

# महाबळेश्वर सैल : परिचय

श्री. महाबळेश्वर सैल यांचा जन्म ४ ऑगस्ट १९४३ रोजी माजाळी, कारवार (कर्नाटक) इथला. एस.एस.सी. झाल्यावर घरच्या प्रतिकूल परिस्थितीमुळे पुढे शिक्षण घेता आले नाही आणि वयाच्या १७ व्या वर्षी ते भारतीय सैन्यात भरती झाले.

१९६३-६४ मध्ये संयुक्त राष्ट्रसंघाच्या वतीने पॅलेस्टाइनला इजिप्त-इस्राइल सीमेवर शांती सेनेत त्यांनी यशस्वी कामगिरी केली. गोवा-मुक्ती मोहिमेतही त्यांचा सहभाग होता. तसेच १९६५ च्या भारत-पाक युद्धातही ते सहभागी होते. पंजाब-हुसेनवाला विभागात त्यांनी लक्षणीय कामगिरी केली.

अचानक ते कोकणी कथांच्या रूपाने साहित्यक्षेत्रात प्रकटले आणि आपल्या सिद्धहस्त लेखणीने प्रसिद्ध झाले. आपले अनुभव अत्यंत सूक्ष्मरीत्या शाब्दिक स्वरूपात रेखाटताना त्यांचे हुबेहूब दर्शन ते घडवतात. सूक्ष्म आणि सखोल निरीक्षण हेच त्यांचे सामर्थ्य आणि ते शब्द स्वरूपात तितक्याच ताकदीनं उभं करणं हे त्यांचं कसब आहे. नंतर ते गोव्यातच स्थायिक झाले आणि नुकतेच ते पोस्टमास्टरच्या पदावरून निवृत्त झाले आहेत.

त्यांचे प्रकाशित साहित्य : पलतडचें तारूं, तरंगा, अरण्यकांड, अदृष्ट हे कथासंग्रह. त्यांची चार नाटकेही प्रकाशित झाली आहेत.

**काळीगंगा –** (कोकणी कादंबरी, १९९६) यास एकूण चार पुरस्कार मिळाले आहेत. (१) कोकणी भाषा मंडळ पुरस्कार, (२) गोवा कला अकादमी ॲवॉर्ड, (३) राष्ट्रीय साहित्य अकादमी ॲवॉर्ड, (४) डॉ. टी. एम. पै फाऊंडेशन ॲवॉर्ड.

नॅशनल बुक ट्रस्ट तर्फे ही कादंबरी इंग्रजीतूनही प्रकाशित झाली आहे. कर्नाटक-कोकणी साहित्य अकादमीचे माजी सभासद, गोवा कला अकादमीचे सल्लागार समितीचे सभासद, राष्ट्रीय साहित्य अकादमी, नवी दिल्ली, सल्लागार मंडळावर नियुक्ती. हे त्यांना लाभलेले काही सन्मान.



# मराठी अनुवादक प्रफुल्ल गायतोंडे : परिचय

श्रीमती प्रफुल्ल गायतोंडे या विज्ञान शाखेच्या पदवीधर आहेत, पण वाङ्मयप्रेम ही त्यांच्या मर्मबंधातील ठेव आहे. काही काळ त्यांनी काणकोणच्या मल्लिकार्जुन हायस्कूलमध्ये अध्यापन केले आणि अल्पावधीतच कुशल व विद्यार्थिप्रिय शिक्षिका म्हणून नावलौकिक संपादन केला. अध्यापन हा व्यवसाय नसून ती सृजनशील कृती आहे, आनंददायी स्वरूपाचे हे कार्य आहे. ही जीवननिष्ठा त्यांनी बाळगली आणि आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटविला.

पुढे त्या आपले पती ज्येष्ठ स्वातंत्र्यसेनानी व शास्त्रज्ञ श्री. शिवानंद गायतोंडे यांच्यासमवेत इंग्लंडला गेल्या. तेथे स्पीच थेरपीचा प्रगत अभ्यासक्रम पूर्ण केला आणि त्याची प्रॅक्टिसही केली, नंतर मायदेशी परतल्यावर त्या पुण्यात स्थायिक झाल्या.

त्यांचा मनःपिंड मूलतः राष्ट्रवादी, शिवाय त्यावर सासरी व माहेरी प्रगाढ संस्कार झालेले आहेत. त्यातून परिणत झालेला वैचारिक वारसा त्यांनी मनोभावे जपलेला आहे. सामाजिक क्षेत्रात विधायक कार्य करण्यासाठी स्वतःला झोकून देण्याची त्यांची वृत्ती आहे. कित्येक वर्षे त्या ग्रामीण परिसरातील अंध लोकांमध्ये स्वावलंबन व आत्मविश्वास निर्माण करण्याचे काम करत होत्या.

मराठीवर त्यांचं प्रभुत्व आहे. त्यांची भाषाशैली प्रभावी आहे. भावोत्कटता हा त्यांच्या लेखनाचा स्थायी भाव असला तरी भावनेच्या प्रवाहात त्या वाहून जात नाहीत. जीवनाच्या साकल्याचे भान व बुद्धिवादी दृष्टिकोन या त्यांच्या लेखनामागील प्रेरणा आहेत. अनुवाद हीदेखील नवनिर्मितीच आहे अशी त्यांची धारणा आहे. ख्यातनाम स्वातंत्र्यसेनानी स्व.डॉ. गायतोंडे यांच्या पत्नीच्या (इदिला) ''In Search of Tomorrow'' या आत्मचरित्राचा त्यांनी केलेला सरस अनुवाद याची साक्ष पटवितो.

डॉ. टी. बी. कुन्हा यांच्यासारख्या क्रांतदर्शी व प्रज्ञावंत महापुरुषाच्या ''Denationalization of Goans'' या लक्षणीय पुस्तकाचा तसेच आलन पॅटन यांच्या ''Cry the Beloved Country'' या जगप्रसिद्ध पुस्तकाचाही त्यांनी अनुवाद केला आहे.

उत्तमोत्तम कलाकृतींचा आस्वाद घेणे हा तर छंद आहे, पण या आस्वादप्रक्रियेत दुसऱ्यांना सामावून घेण्याचाही त्यांचा प्रयत्न आहे.

''काळीगंगा'' ही कोकणी साहित्यातील महान कलाकृती अनुवादित करण्यामागे त्यांचा हाच उद्देश आहे.



# मनोगत

'' ही कादंबरी इतकी जबरदस्त आहे, की तिचं मराठीमध्ये भाषांतर व्हायला हवं.'' श्री. मधु मंगेश कर्णिक, पणजी-गोवा येथील कला अकादमीमध्ये एका साहित्यिक समारंभात बोलत होते.

केवळ उत्सुकता आणि कुतूहलापोटी मी ''काळीगंगा'' वाचली. वाचली आणि मी पुरती भारावून गेले. त्याचा मनावर इतका खोल परिणाम झाला, की लगेच श्री. सैल यांची परवानगी घेऊन मी अनुवादाला सुरुवातही केली.

तसं पाहिल्यास या कादंबरीला नायक-नायिका असा ठराविक साचा नाही. काळी नदीच्या दोन्ही तीरावरच्या खेड्यातील सांस्कृतिक जीवनावर ही बेतलेली आहे. तिथले रीतिरिवाज, श्रद्धा-अंधश्रद्धा, नैसर्गिक आपत्तींना तोंड देतानाची गावकऱ्यांची एकजूट, प्रसंगी एकमेकांना मदत, पण शेतजमीन म्हटलं की हीच माणसं कशी एकमेकांविरुद्ध टोकाची भूमिका घेऊन सहज वैरत्वही पत्करतात, अशा अनेक प्रवृत्ती या कादंबरीत आढळतात. कुठेही कृत्रिमपणा नाही. मनुष्यस्वभावाचे अनेक पैलू सहज उलगडले गेले आहेत. आईविना पोरक्या तान्हुल्याला एक माहेरवाशीण स्वतःचं दूध पाजते. तसंच आपल्या कमलासारख्या रंग-रूप-गुणांनी धवल असलेल्या विधवा सुनेला सासऱ्याची पाशवी लालसा आत्महत्या करायला भाग पाडते. मंजूळ आपल्या तान्ह्या बहिणीला आईची उणीव भासू न देता सर्वस्व पणाला लावून अत्यंत मायेने वाढवते. तिच्या अल्लड-हुडपणाकडे दुर्लक्ष करीत, वडलांचा राग पत्करूनही तिचं कोड-कौतुक करते. शाळेत पाठवते. पण परिस्थितीने, शारीरिक दुर्बलतेने हताश बनलेली तीच मंजूळ मरताना आपल्या दोन्ही मुलांना तिच्या पदरात टाकून, त्यांना अंतर देणार नाही– असं वचन घेते. दोन्ही बहिणींमध्ये जास्त दुर्दैवी कोण? लग्न करून

सासऱ्याच्या, नवऱ्याच्या वर्तनाने असहाय, क्षीण झालेली, अहेवपणाचं मरण आलेली मंजुळा की सर्व सुखं हाताशी असताना मंजुळाच्या दोन मुलांत अडकलेली — आपली प्राप्ती होत नाही म्हणून प्रियकराने केलेल्या आत्महत्येनंतर कुमारी वैधव्य मानणारी सुमन, हा विचार मनाला चटका लावून जातो. कादंबरी विसरता येत नाही, हेच तिचं वैशिष्ट्य!

ही कादंबरी प्रकाशित करण्याचं श्रेय माझ्यावर पितृतुल्य प्रेम करणाऱ्या मा. ग. प्र. प्रधान सरांना द्यायला हवं. हस्तलिखित वाचून झाल्यावर ते प्रकाशित व्हायलाच हवं या जिद्दीने त्यांनी प्रतिमा प्रकाशनचे श्री. अरुण पारगावकरांकडे संपर्क साधला. सरांच्या विनंतीला मान देऊन श्री. पारगावकरांनी काळीगंगा ही कादंबरी प्रकाशित केल्याबद्दल मी त्यांची ऋणी आहे.

काही ऋणं त्यातून मुक्त न होण्यासारखी असतात, पण त्यातही एक वेगळाच आनंद असतो. माझ्या पतीचं सक्रिय प्रोत्साहन हे अशा प्रकारचं ऋण आहे.

मराठी वाचकांना ही कलाकृती नक्कीच आवडेल असा विश्वास बाळगल्यास तो अनाठायी ठरू नये.

—प्रफुल्ल गायतोंडे

# काळीगंगा

केळीच्या पानांचा द्रोण करून मंजुळाने त्यात अबोलीची फुलं काढून आणली. नि बैठकीच्या खोलीत खिडकीपाशी बूसन ती त्यांची माळ गुंफू लागली.

एकीकडे तिला बायूलाची काळजी वाटत होती. किती वेळ झाला, भवानी कुठं गेली असेल भटकायला माहीत नव्हतं. मघाशी फुलं काढताना किती हाका मारल्या पण ' ओ ' म्हटलं नाही.

तिने केळीचा दोर पायाच्या अंगठ्याला बांधला होता आणि दोराचा पदर हातात धरून ती फुलांची वेणी गुंफत होती. अर्धी वेणी होता होता अचानक दोर तुटला आणि हातात आला. गुंफलेली सगळी फुले विस्कटून खाली पडली. तिने पुन्हा गुंफायला सुरुवात केली. कुठं बरं गेली असेल ही बायूल ? फारच झाला उडाणटप्पूपणा हिचा.

इतक्यात खिडकीबाहेर धप्पकन एक सुकलेला नारळ पडला. आणू नंतर म्हणून ती तशीच फुले गुंफीत बसली. थोड्या वेळाने शेजारची शेवंतुआजी कानोसा घेत, काठी टेकत टेकत हळूच आली आणि नारळ उचलून घेऊन गेली. मंजुळा खिडकीतून बघत होती. ' आता गंमतच करते शेवंतुआजीची. मघाशी सुनेला, सुमित्राकाकीला शिव्या देत होती ना, तोंडाला पावडर फासते म्हणून ! ' फुलांची वेणी गुंफून झाली तशी ती उठली. माजघरात दांडीवर ती वेणी लोंबकळवली, परकर-पोलकं नीट केलं आणि बाहेर पडली ती थेट शेवंतुआजीच्या घरी गेली.

" आजी, जरा कोयती दे ग " म्हणत ती घरात शिरली.

" तुझ्या आपाची वाघ मारायची कोयती घरात असताना आमची कोयती कशाला हवी ग ? "

" आपा कोयती घेऊन वाघ मारायला गेला आहे ना, म्हणून. "

जरा शोधल्यावर तिला कोयती सापडली आणि कोपऱ्यात ठेवलेला

नारळही. तिने कोयतीची चोच कचकन नारळावर मारली आणि तो घेऊन ती बाहेर आली व अंगणात बसून नारळ सोलू लागली. शेवंतुआजी एकदम समोर येत म्हणाली, "अग, अग, हा आमचा नारळ कशाला सोलतेस?"

"आजी, हा तुझा नारळ होय? मग आमचा तो माडावर सुकलेला नारळ कुणा कावळ्याने कोंचून खाल्ला होय? म्हटलं, आमच्या नारळावर आमचं नाव लिहिलंय आजी! हा बघ, लांबट, पातळ सालीचा आणि तीन डोळ्यांचा. देवापुढे फोडायला ठेवला तर लोक बदलून आमचाच नारळ नेतात."

"काय वाह्यात ग बाई, ही कार्टी! उद्या लग्न झाल्यावर कुणाचं घर पाड घालणार आहे, देव जाणे!"

मंजुळाने नारळ फोडून एका वाटीचे बारीक तुकडे केले आणि समोर भजनाच्या झोपड्यापाशी मुलं खेळत होती त्यांना ते दाखवून जवळ बोलावलं नि ते सगळे तुकडे त्यांना वाटून टाकले.

फणफणतच शेवंतुआजी म्हणाली, "तुझ्या गर्भादानाचा प्रसाद वाटतेस का ग?"

"नाही ग आजी, आमच्या बैलाला ना वासरू झालं आहे ग, म्हणून." उरलेली वाटी तिने आजीसमोर ठेवली आणि म्हटलं, "आजी, सुनेला म्हणावं गूळ घालून तुला याचं छान घाटणे करून दे."

मंजुळा घरी आली. बायूल अजून आली नव्हती. दूर केरवडी गावावरून संध्याकाळची सूर्यकिरणे घांग्रीच्या खडकावर पडत होती आणि तो डोंगराएवढा खडक अंगावर कलतो आहेसा वाटत होता. डोंगरातून वाकडी तिकडी वाहत येणारी काळी नदी या संध्याप्रकाशात आता सोन्याने सजवलेली जणू काळी नवरीच वाटत होती.

फ्रॉकच्या ओटीत पेरू भरलेली सुमन पळत पळत आली आणि घरात घुसली. मंजुळाने विचारलं, "कुठून, काय आणलंस ग पोरी?"

इतक्यात तिच्या मागे लागलेला पंढरीअण्णा दारात येऊन उभा राहिला आणि धापा टाकीत ओरडला, "कुठं गेली ती कार्टी, मंजूळ? बोलव तिला बाहेर. आज सोडणार नाही बघ तिला, तंगडीच मोडून टाकतो तिची. तुझ्या या बहिणीने माझ्या झाडाचे कच्चेच पेरू तोडून आणले आहेत. सगळ्या झाडाचं निःसंतान केलं. अगदी कोवळी, कच्ची फळे. फूलदेखील झडलं नव्हतं. बोलव तिला बाहेर, मंजूळ. नाहीतर मीच ओढून आणतो तिला" म्हणत तो दरवाज्यात आला.

दारात उभी राहून दोन्ही हातांनी दरवाजा अडवीत मंजुळा म्हणाली,

“ आत येऊ नकोस पंढरीअण्णा. मी म्हणते आत येऊ नकोस. ”

पंढरी तणतणत बाहेरच्या सोप्यावर येऊन बसला, “ ती बाहेर येईपर्यंत मी असाच खडतर बसून राहणार आहे इथं. पण आज मी तिला सोडणार नाही. चार काठ्या हाणणारच तिच्यावर. ”

खरं तर मंजुळा पार घाबरून गेली होती. तरीसुद्धा बळेच आवाज चढवीत ती म्हणाली, “ पंढरीअण्णा, सुमनला हात लावू देणार नाही मी, आधीच सांगते. ”

“ बघतो ना तू काय करतेस ते ! ” पंढरी ठाण मांडून सोप्यावर बसला होता.

मंजुळा दरवाज्यात उभी होती. पण सुमनचा कुठेच आवाज नव्हता. कुठल्या कोपऱ्यात दडून बसली होती, देव जाणे.

समोरून रामदादा जात होता, त्याने विचारलं, “ काय रे पंढरी, काय झालं आहे तुझं ? ”

“ गणेशच्या धाकट्या पोरीने माझ्या झाडाचे कच्चे, कोवळे पेरू तोडून आणले आहेत रे. आणि ही मंजुळा तिची बाजू घेऊन दार अडवून उभी राहिली आहे. ”

“ ती सुमन म्हणजे जरा अवखळच पोर आहे. मुलीची जात पण मुलासारखी सगळा गाव डोक्यावर घेऊन हुंदडत असते. परवा बर्म्याकडच्या चिंचेच्या झाडावर चढून काठीने चिंचा पाडीत होती. ”

“ नाही रे रामदादा, तशी मस्त नाही ती. पण अलिकडे तिला काय झालंय समजत नाही. ”

पंढरी मध्येच तणतणला, “ चार काठ्या पडल्या पाहिजेत चांगल्या, मग सुधारेल. ”

“ तुला सांगते पंढरीअण्णा, मी मुळीच हात लावू देणार नाही तिच्या अंगाला. ”

“ तूच चढवून ठेवली आहेस तिला. नेहमीच तिची बाजू घेतेस ना म्हणून शेफारली आहे ती. उद्या लग्न होऊन तू नवऱ्याच्या घरी गेलीस की बघ, ती हाती लागणार नाही. ”

“ तशी ती प्रेमळ आहे रे. लहान आहे, सुधारेल. ”

रामदादा जाता जाता म्हणाला, “ पंढरी, पोरीला मारू बिरू नकोस हं. आईविना वाढलेली पोर, दया येते रे. ”

थोड्या वेळाने गणेश बांधावरून येताना दिसला. त्याच्या खांद्यावर

नांगराचं धूड होतं. ते त्याने घरासमोरच्या फणसाच्या झाडाला उभं टेकवून ठेवलं. हातातलं खोरंही तिथं टेकवलं. करगोट्याला खोचलेलं पंचाचं टोक सोडून तोंड पुसलं. मंजुळा आपाला काही सांगू नको म्हणून खुणांनी पंढरीला विनवीत होती पण पंढरी घुश्शातच होता.

"काय झालं रे पंढरी?" गणेशने विचारलं.

"तुझ्या धाकटीने माझ्या झाडाचे कच्चे पेरू तोडून आणले. फुलंदेखील झडली नव्हती अशी कोवळी फळं. एकदेखील पेरू झाडावर शिल्लक ठेवला नाही. आता आत जाऊन लपून बसली आहे."

गणेश मुकाट्याने फणसाच्या झाडाकडे गेला. तिथं नांगराला खोचून ठेवलेली जोताची काठी काढली– लिमतोडीची– बैलांच्या पाठीवर देखील फुटणार नाही अशी टणक काठी. ती घेऊन मंजुळाला बाजूला ढकलून तो घरात गेला. मंजुळा भीतीने थरथर कापत होती, रडत रडत म्हणत होती, "नको रे आपा, बायूलाला मारू नको रे!"

भिजलेल्या पाखरासारखी घाबरून सुमन एका काळोख्या कोपऱ्यात बसली होती. गणेशने ओढीतच तिला बाहेर आणली तसे तिच्या ओटीतले कच्चे पेरू खोलीभर पसरले. गणेश काठीने तिच्या पायावर, पाठीवर सपासप फटकारे हाणीत होता. आठ-दहा फटकारे झाल्यावर मंजुळा मध्ये पडली, तसा तिच्या पाठीवर देखील एक फटकारा बसला. तेव्हा काठी तशीच सुमनच्या समोर नाचवीत तो म्हणाला, "जाशील? दुसऱ्यांच्या बागेत पुन्हा जाशील? खूप झाल्या तुझ्या कागाळ्या. आधीच तू मेलीस तर बरं होईल असं वाटतं. त्यात आणि ही मस्ती."

बाहेर पंढरी अवाक्! जळो ते पेरू! तिथून पळूनच जावंसं वाटलं त्याला. एवढंसं तोंड करून तो मुकाट्याने उभा राहिला.

गणेशने हातातली काठी बाहेर भिरकावून फेकली. खुंटीवरचा शर्ट काढून अंगावर लटकवला, हातात कोयती घेतली व नांगराची कानी (दावे) सोडवून घेतली. कोयती नेऊन माजघरात ठेवली आणि कुणालाही काहीच न सांगता तो बाहेर निघाला. अंगणात पोचल्यावर मंजुळाने विचारलं, "कुठं निघालास, आपा?"

"सुताराकडे."

मागे न बघताच त्याने झपझप पावलं उचलली. सुमन अगदी कळवळून ओक्साबोक्शी हुदंके देत होती. मंजुळा तिला जवळ घेऊन "उगी, उगी" म्हणत होती पण तिलाच रडू आवरत नव्हतं.

पंढरी तिथून बाजूला सटकताना स्वतःशीच पुटपुटत होता, " जळले ते पेरू, पोरीला उगाचच मार खावा लागला. मला तरी काय ठाऊक, गणेश एवढं मारणार म्हणून ! "

सुमन रडायची थांबली तेव्हा मंजुळाने तिला मोरीकडे नेलं आणि तिचं तोंडबिंड स्वच्छ धुतलं. मग ती तिचे केस विंचरत बसली. काही वेळ दोघीही बहिणी मुकाट्यानेच बसल्या होत्या.

" बायूल, आता आणखी मस्ती नाही ना ग करणार ? "

" बाय, तुझ्यावर पण काठी बसली का ग ? "

" नाही ग, जराशीच. "

" मग बाहीवरचा हा वळ ? "

" तुझी अख्खी पाठ फोडून घेतलीस आणि माझ्या वळाचं काय विचारतेस ? "

" बाय, मी मरो एकदाची असं आपा नेहमी का म्हणत असतो ग ? "

" वेडीच आहेस झालं. अग, रागाने म्हणतो तो तसं. "

" बाय, तू आईला पाहिलं होतंस ? "

" हो. "

" मी पण पाहिलं होतं ? "

" तू अगदीच लहान होती ग तेव्हा, अवघी तीन महिन्यांची. "

" मग मी नाही पाहिली ना ? "

" पाहिली होती ग, पण तुला कशी आठवेल ? "

" आई डोक्यात खूप फुलं घालायची ? "

" हो, माझ्यासारखीच तिलाही फुलांची खूप हौस होती. दर दिवसाआड ती नदीकडे जाऊन कांदळं तोडून आणायची. "

" मला मात्र नाही आवडत फुलं. "

" आमची बायूल म्हणजेच एक फूल आहे ! "

" आई कुणासारखी दिसत होती ग, तुझ्या का माझ्यासारखी ? "

" दोघींच्याही सारखी. "

" खोटं सांगतेस तू. परवा गंगामावशी म्हणत होती, मंजुळा अगदी आईसारखी दिसते आणि सुमन वडिलांचं रूप घेऊन आली आहे. "

" म्हणून काय झालं ? आपा पण आपलाच ना ? उलट मी आईसारखी काळी, तू आपासारखी गोरी. "

" मग आपा मला नेहमी मारतो का ? "

मंजुळाने तिला कवेत ओढली. "आता नाही कुणी हात लावणार माझ्या बायूलाला. पण तू ही मस्ती करणं जरा सोड ना."

सुमन बसल्या ठिकाणीच पेंगायला लागली. "बायूल, झोपू नको हं इतक्या लवकर. मग जेवायला उठणार नाहीस. मी छान कालवण केलं आहे. वांगी, देठे आणि तिसऱ्या घालून."

तरीसुद्धा सुमन उठली. आतून चटई आणली आणि हॉलच्या कोपऱ्यात झोपून गेली. मंजूळ आपाची वाट बघत सोप्यावर बसली होती. सूर्य नुकताच गडाच्या बाजूने गावात पश्चिमेकडे गेला होता. काळ्या प्रकाशात काळया नदीच्या प्रवाहात जणू काजळ वाहत आहे असं वाटत होतं. दुपारी प्रखर उन्हात त्यातून चांदी वाहत असल्यासारखं दिसत होतं, आता त्याचं काजळ झालं होतं. त्या प्रवाहात दूर शीड गुंडाळलेली एक बोट स्थिर उभी होती. तिची डोलकाठी समोरच्या डोंगरावर क्रॉस मारल्यासारखी उभी होती.

खारगे गावात पोचताना संथ वाहणारी ही काळी नदी ह्या शिद्दर गावाजवळ आल्यावर एकदम विक्राळ रूप घेते. इथं तिचा प्रवाह फुटतो आणि दोन बेटं निर्माण होतात. या बेटांभोवती नाचत मुरडत प्रवाह पुढे जातो. उन्हात हे प्रवाह जणू नर्तिका नृत्य करताहेत असे वाटतात, तर कधी काळोख उतरू लागल्यावर बेटांना नागिणीसारखा विळखा घालून बसल्यासारखे वाटतात. मग अंधारात नदीचं, नदीतल्या बेटांचं एक वेगळंच साम्राज्य तिथं वास करतं. रात्रीचं एखादं पाखरू ओरडलं, कुणाच्या घरातून धूर वर निघू लागला की प्रलयानंतरच्या कदीम काळात शिरल्यासारखं वाटतं. हळूहळू अंधारात नजरेआड होणाऱ्या समोरच्या परिसराकडे मंजुळा काहीशी भांबावून बघत होती. तिच्या काळजाला आता वेगळीच हुरहूर लागली होती. मन हलकं फुलकं, उत्कंठा लागल्यासारखं झालं होतं. आज तिला आपल्या आईची खूपच आठवण येत होती. केसांचा एवढा मोठा अंबाडा, वर फुलं. कपाळावर नेहमी ओघळणारं रुपयाएवढं कुंकू! आई अगदी तिच्या डोळ्यांसमोर उभी राहिली. आईच्या लुगड्याचा दुधासारखा वास नाकात भरला. तेव्हा ती नऊ वर्षांची होती. पण आई तिला नीट आठवत होती, तिचा वास नाकात दरवळत होता, तिचा आवाज कानात घुमत होता.

तिचे डोळे भरून आले. तिने आतून बायूलाचा कानोसा घेतला, ती गाढ झोपली होती. तिच्या इवल्याशा घशातून सूं सूं आवाज येत होता.

...बायूल तर अजून लहान आहे आणि आपा माझं लग्न करायचं म्हणतो. कशाला एवढी घाई करतो तो? मिळेल त्याला सांगत सुटतो, मंजुळाला एक चांगलासा मुलगा बघा म्हणून. बायूल तर अजून विहिरीवरून कळशीभर

पाणीदेखील आणू शकत नाही. आधीच ती आपाला डोळ्यांसमोर नको, त्यात जरा अवखळ, उनाडक्या करते. मला तर तिला सोडून जाऊच नयेसं वाटतं. पण आपा काहीच ऐकणार नाही. सतरावं सरून अठरावं लागलं म्हणतो, किती दिवस घरी ठेवून घ्यायची म्हणतो. बायूलाला सोडून जायच्या नुसत्या विचारासरशीच माझं काळीज गलबलून येतं. पण आपाला कोण सांगणार ? तो कुणाचं ऐकणार आहे का ?

बऱ्याच वेळानंतर आपा आला. आपाची चाहूल लागताच ती पटकन उठली. आत बाहेर बघावं तर सगळीकडे काळोख पसरलेला. इतका अंधार पडला आहे आणि मी वेडपटासारखी दिवा न लावताच बसले आहे. ती लगबगीने आत गेली. जाताना वाटेत पाटाला आपटली. शोधू गेल्यास काड्यांची पेटीच कुठे सापडेना. इतक्यात आपा आत आला. खिशातून काड्यांची पेटी काढून त्याने लख्खकन काडी पेटवली नि आत जाऊन दिवा लावला.

“ काळोखातच कशाला बसलात ग ? ”

“ वेड्यासारखी उगाच बसून राहिले. बायूल झोपली आहे ना ? ”

गणेश माडाच्या आळ्याकडे जाऊन हातपाय धुऊन आला व विडी शिलगावत काही वेळ माजघरात बसला. शेजारचा विश्राम मुकाट्यानेच आत आला आणि समोर बसला. गणेशने तंबाखूची पिशवी त्याच्याजवळ फेकली. विश्रामने तंबाखू आणि पान घेऊन विडी वळली. ती चिमणी (दिवा) वर धरून पेटवताना त्याने म्हटलं, “ काल म्हणे आंब्याच्या जवळून वायंगणात (शेतात) गुरं घुसली. ”

“ राखण केली पाहिजे, नाहीतर हातातोंडाशी आलेलं गुरं खाऊन टाकतील. ”

“ दहा जणांची इस्टेट, कुणी राखावी ? ”

“ रोज एकेकाने भार घ्यावा. ”

“ खरं आहे तुझं. आज छोटीला बरंच चोपलंस म्हणे तू ? ”

गणेश गप्पच राहिला.

“ प्रेमळ पोर ती, लहान आहे, थोडा अवखळपणा करते. ” विश्राम उठला आणि विडी शिलगावत जाऊ लागला. जाताना म्हणाला, “ मारू नकोस रे त्या पोरींना. आई नसलेल्या पोरी, तुलाच आई मानून आहेत त्या. ”

आत मंजुळा बायुलाला उठवीत होती पण ती कशीच उठत नव्हती. “ बायूल, बघ, आपा आला आहे, त्याला परत राग येईल हं. उठ. ” पण सुमन उठतच नव्हती, झोपेतच गुल्ल. “ आपा, चल. बायूल नाही उठत

जेवायला.''

गणेश उठला आणि सुमनजवळ जाऊन मुकाट्यानेच जरा वेळ उभा राहिला. ती गाढ झोपली होती. तिचा चेहरा तीन महिन्यांच्या अर्भकासारखा अगदी निरागस दिसत होता. चिमणीच्या उजेडात तिच्या पायावरचे, दंडावरचे वळ तेवढे उठून दिसत होते पण त्यांची वेदना चेहऱ्यावर जरासुद्धा दिसत नव्हती. त्याने मुकाट्यानेच तिला वर उचलून अंगावर घेतली; बाहेर आणून तिच्या चेहऱ्याला, डोळ्यांना पाणी लावलं. ती ''आं आं'' करीत उठली पण अजून अर्धवट झोपेतच होती. त्याने तिला पाटावर आणून बसवलं. तिचा हात भाताशी नेऊन लावला, ''जेव ग बायूल.''

मिटलेल्या डोळ्यांनीच तिने भात कालवला. न थांबता घासावर घास घेत तो सगळा भात ती जेवली. बायने दिलेला तांब्या घेऊन तोंड धुतलं आणि तशीच जाऊन परत झोपली. लगेच तिला झोपदेखील लागली, जणू ती मधे उठलीच नव्हती.

मंजुळाने आपालाही वाढलं. जेवता जेवता घसा खाकरून गणेशने विचारलं, ''खूप वेळ रडत बसली होती का ग ती?''

''मारायला लागलास की तुला डोळे नसतात, आपा. पुन्हा कधी मारू नकोस रे तिला.''

गणेश गप्पच राहिला.

आपाचं नेहमी असंच. बरा तेव्हा किती बरा असतो. राग आला की मग मात्र आंधळाच होतो. बायूलावर कसला राग धरून बसला आहे देव जाणे! आईला देखील तो खूप सतावीत असायचा, एवढ्या तेवढ्या कारणावरून शिव्या द्यायचा. पण आईने अंथरूण धरलं तेव्हा त्याच्या हालांना पारावार उरला नाही. आईचं पुष्कळ केलं त्याने, लहान मुलासारखी सेवा केली तिची. तिचं डोकं आपल्या मांडीवर घेऊन भरवायचा तिला. ती गेल्यावर सहा महिने वेड लागल्यासारखा झाला होता. ''माझी लक्ष्मी उठून गेली रे देवा'' म्हणून रडायचा. बायूलाकडे तर डाव्या डोळ्याने देखील बघायला तयार नव्हता. तिच्याच खड्ड्यात नेऊन पुरून टाका तिला म्हणायचा.

मंजुळा तेव्हा लहान, केवळ नऊ वर्षांची, पण तिला सगळं नीट आठवत होतं. चितेवर घालायला गंधाची काडी हवी होती, शोधाशोध केली तर कुठे सापडेना. मग तिनेच कुठूनतरी हुडकून आणली आणि केशवभाऊजवळ दिली. एकीकडे बिचारी रडत होती आणि मर्तिकाला आलेली माणसं तिलाच काय काय विचारीत होती. वस्तीतल्या बऱ्याच बायका घरात जमल्या होत्या पण

त्या आपल्या उगाच गणमणत होत्या. आईच्या सभोवती बसून काय काय दुःखी उद्‌गार काढीत होत्या. बायूल बिचारी कुठं पडली होती कुणालाच माहीत नव्हतं.

मंजुळा आधीपासूनच खूप समजूतदार. लोक म्हणायचे, तिच्या आईने जाताना आईपणाचा हात ठेवला आहे तिच्या डोक्यावर. आपाची देखील मंजुळावर भारी माया. तिच्या पाठीवर एक मुलगा होऊन गेला. तिसरी सुमन झाली आणि आई गेली. हे सगळं विपरीत घडताना बघून आपा चक्रावून गेला. आतल्या आत सुकून निबर झाला होता. नऊ वर्षांची मंजुळा मात्र एका रात्रीत शहाणी, समजूतदार झाली. एखाद्या अनुभवी म्हातारीसारखी घरात वावरू लागली.

आई जेव्हा मुलाच्या वेळेस गरोदर होती तेव्हा मंजुळा सहा वर्षांची होती. शेजारच्या बायका म्हणायच्या, "तुझ्या आईच्या पोटात ना बाबू आहे, तुझा भाऊ!" पोटावर पडल्यास आई ढकलून द्यायची म्हणून ती पोटाभोवती हात घालून, पोटाला कान लावून झोपायची. मी बाबूला खेळवणार, त्याला घेऊन नाचणार, त्याचे मुतल्यावर धुणार... तिचा विचार चालू असायचे.

"आई, बाबू कधी येणार ग?"

"अजून थोडा मोठा झाल्यावर."

"तू माझ्याकडे देशील ना ग त्याला?"

"हो तर, तूच त्याला खेळवायचं, आंघोळ घालायची. थोरली बहीण ना तू त्याची?"

तो जन्मताच गेला. काय झालं ते कळण्याआधीच लोक त्याला घेऊन गेले. आईचं पोट सपाट आणि बाबू मात्र नाही. आईच्या त्या सपाट पोटाकडे ती अगदी भांबावून बघायची.

कितीतरी दिवस आई त्याला नेलेल्या वाटेकडे डोळे लावून बसायची. तीसुद्धा कधी कधी आईबरोबर तिच्या कुशीत मुकाट्याने बसायची. कधीतरी अचानक ती त्या वाटेने धावत सुटायची, वाट बघत थांबल्यासारखी आखाड्यात जाऊन उभी राहायची. दूर झाडांमधून कुणीतरी खणल्याचा आवाज यायचा आणि घाबरून ती पळत पळत परत यायची. आईच्या पोटाला सुद्धा स्पर्श करायला ती भलतीच घाबरायची. कितीतरी दिवस आई, आपा घरात मुकाट्यानेच वावरायचे. ज्याचं तोंडदेखील पाहायला मिळालं नाही त्या बाळाने बरेच दिवस त्यांना घोर लावला होता. त्याच्याविषयी कुणीच काही बोलत नव्हतं, तीही कुणाला काही विचारीत नव्हती. एक मूक सावट सगळीकडे पसरलं

होतं.

जेवून झाल्यावर मंजुळाने सगळी भांडी गोळा केली आणि ती माडाच्या आळ्याकडे आली. "आपा, जरा बाहेर अंगणात येऊन उभा राहा ना, मी भांडी धुऊन टाकते."

"भरल्या वस्तीत कसली भीती वाटते ग तुला? चारी बाजूंनी घरं आहेत ना?"

"मला अंधाराची भीती वाटते, तो आत्ताच मला बोचकारणार असं वाटतं."

"भित्री भागूबाईच तू. उद्या नवऱ्याला सांगायला पाहिजे ओटंबाच्या वृक्षाखाली घर बांध म्हणून."

"ते का आपा?"

"कारण त्या वृक्षाखाली दिवसासुद्धा अंधार असतो."

"आपा, आईसुद्धा अंधाराला घाबरायची का रे?"

"होय, तीसुद्धा तुझ्यासारखीच अंधारात पाय ठेवायला दचकायची. लेकही तशीच आईवर गेली आहे."

"अंधाराला घाबरणारी माणसं लवकर मरतात म्हणे!"

"थू: अशा अवेळी असं अभद्र नको ग बोलूस!"

वस्तीतल्या इतर लोकांची जेवणं अजून उरकली नव्हती. बऱ्याच घरांमधून बोलण्याचे, भांडी वाजल्याचे आवाज ऐकू येत होते. नरसिंहाच्या अंगणात गप्पा मारीत बसलेले पुरुष अजून उठून गेले नव्हते. पूर्वी गणेशदेखील त्यांच्यात जाऊन बसायचा. पण अलीकडे तो संध्याकाळ झाली की विड्या फुंकीत बसतो.

काम आटोपलं तशी मंजुळा आत जाऊन सुमनच्या शेजारी आडवी झाली. तिचा अंगाखाली गेलेला हात हळूच सोडवून नीट केला. अंगावर पांघरूण टाकलं. आपले मानेखाली गुंडाळलेले केस खांद्यावरून छातीवर घेतले. काळ्याभोर मऊ मऊ रेशमासारख्या विपुल केशभाराने तिचं शरीर झाकलं गेलं. उपडी झोपल्याने तिच्या छातीचा भार तिला सहन होईना. छातीची एक बाजू तिने हळूच जमिनीवर टेकवली. आणि बायूलाच्या अंगावर हात टाकून ती झोपली.

अंगणात कुणीतरी काठी टेकीत येत असल्याचा आवाज झाला. कानोसा घेतला तेव्हा मंजुळाला साळूआजी दिसली. सकाळ-संध्याकाळ दोन्ही वेळा नेमून दिल्यासारखी ही साळूआजी प्रत्येकाच्या घरी फेरी मारीत असते. लहान-थोर प्रत्येकाची विचारपूस करीत जाते. कधी अंगणात तर कधी माजघरात

बसते. कधी स्वयंपाकखोलीतही येऊन चुलीच्या समोर बसते.

गणेश माजघरात बिछान्यावर पडला होता. समोर चिमणीचा दिवा जळत होता. "स्मशानातली भुतं अजून उठली नाहीत आणि इतक्या लवकर जेवून झोपलास का तू, गणेश?"

"नाही ग, साळूआजी, खूप दमलो होतो. संध्याकाळी जोत बांधलं होतं ना?"...

माजघरात बसता बसता ती म्हणाली, "मरण यायच्या आधी मरू नये आणि झोप आल्याशिवाय झोपू नये. अलीकडे तू रोगट कोंबड्यासारखा दिसू लागला आहेस."

"भोग! दुसरं काय!"

"कोणत्या भोगाला रडतो आहेस रे तू? बारा वर्षांची असताना मी विधवा झाले होते ना रे? भोगाच्या नावाने रडत बसले असते तर या वस्तीचा संसार करूच शकले नसते. तुझी तर स्वतःचीच, सोन्यासारखी दोन मुलं आहेत... आण, ती विडी आण."

"मी वळलेली विडी तुला कुठं चालते?" गणेशने तिला तंबाखू आणि पान काढून दिलं.

त्या पानाच्या तुकड्यावर तिनं एक बारीकशी विडी वळली.

"आज तू म्हास्तीच्या टेकडीवर दिसली होतीस."

"फिरते आपली डोंगरातून, मुळ्या, कांड्या, सालं गोळा करीत. चुलत्याकडून हा औषध कुटण्याचा मंत्र घेतला आणि त्यातच जीवित अडकलं. चुलत्याने तरी घरात इतकी मुलं असताना मलाच का निवडावं?"

"तू खरोखर बुद्धिमान म्हणूनच ग, साळूआजी. तुझ्याएवढी हुशार कोण सापडली असती त्याला?"

"पण एक मात्र खरं हं, गणेश. हा औषध कुटण्याचा मंत्र मी घेतला आणि माझं वैधव्यदेखील मी विसरून गेले."

"पण तुला एक सांगून ठेवतो, साळूआजी, तू मेल्यावर तुझा हा औषधांचा बटवा काळ्या नदीत फेकून द्यावा लागणार. उगाळून द्यावी म्हटलं तर एकसुद्धा मुळी कुणाला ओळखता येणार नाही."

"हे मात्र अगदी खरं रे बाबा तुझं. ही विद्या कुणाला तरी द्यावी म्हणून खूप प्रयत्न केले मी. पण कुणाला त्रासच घ्यायला नको. या, माझ्याबरोबर रानातून फिरायला या. औषधांचा पाला, मुळ्या दाखवते म्हटलं तर एक जण सुद्धा यायला तयार नाही. आता आल्या आहेत ना या गोळ्या? दगदग हवीय

कुणाला ? डॉक्टरांना कचाकच नोटा काढून देतात. इतकी वर्षं मी फुकट औषध देते पण आहे का कुणाला काही त्याचं ? ''

'' खरं आहे ग तुझं. ''

'' तुझी धाकटी जराशी मोठी असती तर तिच्याच गळ्यात माझा बटवा बांधला असता बघ. ''

'' छे ! तिला काय कळणार ? अवखळ आहे ती. ''

'' नाही, नाही गणेश, तसं समजूं नकोस. बरीच हुशार आहे ती. परवा मी सहज म्हटलं, ' रात्री आकाशभर असणारी ही एवढी नक्षत्रं दिवसा कुठे जात असतील ग ? ' तर तिने काय उत्तर दिलं माहित आहे ? ''

'' काय ? ''

'' म्हणाली, दिवसा प्रकाशाचा पूर येतो आणि नक्षत्रं त्यात बुडून जातात. ''

'' अस्सं ? ''

'' झोपली कारे पोरं ? ''

'' झोपली असतील. रात्रंदिवस त्यांचीच काळजी वाटते बघ, साळूआजी. ''

'' काहीच काळजी करू नकोस तू. देव आहे. गर्भ रचण्याआधी तो आईच्या पोटात मुलाचं अंथरूण घालून ठेवतो. आणि जन्मण्यापूर्वी स्तनांना पान्हा निर्माण करतो. तेव्हा त्यांची काळजी देवाला, तुला नव्हे बरं ! ''

विडी ओढता ओढता साळूआजीला जबरदस्त ठसका लागला. बरगड्यांचा सापळा नुसता खवळून निघाला. घशातून बराच वेळ '' हूं हूं'' असा आवाज येत राहिला आणि मग ती खोकायची थांबली.

उंच, सडपातळ बांध्याची साळूआजी आता अगदीच आवळली होती, पोखरली होती. डोक्यावर पांढऱ्या केसांचा कापूस वरचेवर भुरभुरत होता, कुठल्याही क्षणी वाऱ्याने उडून जाणार असल्यासारखा. गणेशला वाटलं, ही अख्खी साळूआजी वळकटी करून गुंडाळल्यास असोल्या नारळाएवढी देखील होणार नाही. पण केवढी बुद्धिमान बाई ! आषाढ, श्रावण महिन्यात विष्णू, हरिविजय, पांडवप्रताप वाचते आणि प्रत्येक वाचनाचं इतकं सुंदर विवेचन, विश्लेषण करते की नुसतं ऐकतच राहावंसं वाटतं. कुणाचं लग्न असो वा मरण ही नेहमीच पुढे. लग्नाच्या सामानाची यादी देते तेव्हा एखादा नारळसुद्धा चुकणार नाही इतकी व्यवस्थित असते.

हिचा भाऊ येसो गेला तेव्हा त्याचा मुलगा लहान, जेमतेम दहा-बारा वर्षांचा. त्या मुलाला घेऊन भावाचा आठ खंडी शेतीचा संसार तिने व्यवस्थित संभाळला. त्याला घेऊन, नांगर-जू खांद्यावर मारून शेतात जायची. स्वतः जोत बांधून जमीन कसायची. नंतर भाच्याच्या हातात नांगर द्यायची. असं म्हणतात की या गावात जोत बांधून, नांगर हातात घेणारी ती पहिलीच बाई.

खोकला थांबला तेव्हा साळूआजी म्हणाली, " सीमेवर युद्ध पेटलं आहे म्हणे. चीनने भारतावर आक्रमण केलं आहे. काल हळग्याहून श्रीपाद शेट आला होता, तो सांगत होता. महाभयंकर युद्ध म्हणे. रेडिओवर म्हणे या दिवसात त्याच बातम्या असतात. या दळभद्रया गावात एक रेडिओदेखील नाही, कुठं बातम्या ऐकेन म्हटलं तर. "

" या खेपेला आपल्या वस्तीतला कुणी आघाडीवर नाही ना ग ? "

" कालपासून तीच चौकशी करीत होते मी. पण कुणाची बातमी कुणाला नाही. महेश्वर आणि बाळू काश्मीरमध्ये आहेत, तेवढं माहीत आहे मला. मनोहर आसाममध्ये आहे म्हणे. सदानंदचं मात्र महिन्याभरात एखादंदेखील पत्र नाही, आई बिचारी रडते. "

" एकुलता एकच पोरगा ना ग तिचा ? "

" आईचं न ऐकता मिलिटरीत गेला, आईच्या जिवाला घोर. तो गेल्यापासून बिचारी अगदी पोखरली आहे, काट्यालाच जीव घेऊन आहे. "

मग गणेश आणि साळूआजी वस्तीतले किती जण सैन्यात आहेत याची बोटांवर जुळणी करू लागले. एकूण नऊ जण होते, अठरा घरातून नऊ जण सैन्यात. साळूआजी म्हणाली, " वाड्यावरचे पुरुष म्हणजे बैलोबा आहेत बैलोबा. शिक्षण अर्धवट सोडून द्यायचं आणि सैन्यात भरती व्हायचं. आणि ते सुद्धा इन्फन्टरीत. डोकंच कमी. आता इथं असलेल्यांच्या जिवाला घोर ! "

" मागं जर्मनीच्या लढाईच्या वेळी असंच झालं होतं, साळूआजी. वस्तीतले अर्धे पुरुष लढाईवर. गावात पोस्टमन आला तर इथल्या लोकांची बोंबाबोंब व्हायची. महेश्वरचा बाप बेपत्ता झाला तेव्हा लागोपाठ तीन तारा आल्या. गावावर संकट. "

" तरीसुद्धा मुलगा गेलाच ना सैन्यात पुन्हा ? " देवीच्या देवळाच्या दिशेने हात जोडीत साळूआजी नवस बोलली, " पाव ग बाई देवीमाते, या वस्तीतला एकूण एक मुलगा सुखरूप परत येऊ दे ! परत आल्यावर जोडप्याने तुझी ओटी भरायला लावते. परगावी आग असो वा पाणी, तुझंच संरक्षण त्यांना. "

काठी उभी केली आणि ती जायला उठली.

" पन्हळी (पागोळी)च्या आड्याला आपटशील हं, संभाळून जा. "

" आपटायला आता मी पूर्वीसारखी उभी नाही राहिले रे, देहाला धरतीचे वेध लागलेत. "

" दिवा दाखवू का ग ? "

" कशाला रे, जन्मापासूनची सवयीची वाट. "

" तसं नव्हे ग. पायाखाली काही असल्यास भीती. "

" ती भीती उरली नाही रे आता. खायचंच असतं तर त्याने कधीच खाऊन टाकलं असतं. एकदा मुळी खणत असताना हातावर नाचून गेला. अस्सा दीड वाव होता, हळदीच्या मुळासारखा पिवळा धमक, गळ्यावर तुळस. आणि एक सांगून ठेवते बघ, गणेश, ह्या परिसरातल्या वस्तीत त्याने कधी एकही जीव घेतला नाही. इथं खुंट पुरून मठी बांधलेल्या मूळ पुरुषाचा महिमा आहे तो. अजूनही तो खुळखुळ काठी टेकीत वस्तीत फिरत असतो, वस्तीचं रक्षण करीत. मीसुद्धा ऐकला आहे तो खुळखुळ आवाज. "

ह्यांचा कुलदेव गावडोंगरीचा मल्लिकार्जुन. तेव्हा यांचा मूळ पुरुष गोव्याहून इथं येऊन राहिला यात शंकाच नाही.

पूर्वी या वस्तीला शिद्दर गावचे लोक जेवणकरांची वस्ती म्हणायचे. कुणाला कधी सणावारी किंवा वार्षिक, म्हाळ वगैरे कारणासाठी ब्राह्मण, सवाष्णीची जरूर पडल्यास इथनंच बोलावून न्यायचे. ह्या गावचे लोक त्यांचे सगेसोयरे म्हणून.

मूळ पुरुष गोवा सोडून इथवर कसा आणि का आला याविषयी पिढ्यान् पिढ्या एक आख्यायिका चालत आली आहे –

अलीकडच्या आणि पलीकडच्या डोंगरांच्या पायथ्यांशी दोन लहान गावं होती. दोन्ही गावांमध्ये गुरे चरायच्या वाटेवर डोंगरात भात, नाचणी, कुळीथ वगैरे लावायच्या जागेवरून नेहमी हाणामारीपर्यंत भांडणं व्हायची. एकदा पलीकडच्या गावातल्या लोकांनी अलीकडच्या गावातल्या लोकांची शे-पन्नास गुरं रात्रीच गोठ्यातून सोडून नेली. वळवीत वळवीत आणि मारीत नेऊन त्यांनी ती खाली टाकली. त्यात कितीतरी गुरं मेली काहींचे पाय मोडले, उरलेली भयाण जंगलात हरवली आणि वाघाने खाऊन टाकली.

दुसऱ्या रात्री अलीकडच्या गावातल्या लोकांनी पलीकडच्या गावावर धाड घातली. लोकांना मारलं, चोपलं, बदडलं; गावातल्या विचारवंताचं डोकं कापून कुऱ्हाडीच्या पात्यावर नाचवीत आणलं, ते आपल्या रिकाम्या गोठ्यात

बांधून त्याला आग लावली.

मग ते आपलं उरलं सुरलं सामान घेऊन दिगंतरात पसरले. दहा दिशांनी दहा जण गेले. त्यांचा तो मूळ पुरुष मायंगिणीहून खाली उतरून गोपतिठ्यावर पोचला. तिथून तो हळगे गावात आला. तिथल्या लोकांनी त्याला एक रात्रभर देखील राहू दिलं नाही, पळवून लावलं. तेव्हा तो नदी पार करून खारगे गावात आला. त्या वेळी कुणी अनोळखी माणूस गावात येऊन राहणार असल्यास जाणकारांची मान्यता घ्यावी लागायची. योग्य कारण नसल्यास मान्यता मिळत नसे. खारग्यात त्याने तसंच राहायचा प्रयत्न केला पण गावचे लोक लाठ्या-काठ्या घेऊन मागे लागले. शेवटी तो शिद्दर गावात आला आणि चिंताग्रस्त होऊन देवळासमोर बसला. बरोबर बायको आणि मुलं. आता आणखी कुठं जाऊ रे देवा म्हणत डोक्यावर हात घेऊन तसाच बसला होता.

तेव्हा शिद्दरचं हे नरसिंहाचं देऊळ नवीन बांधत होते. असली भली मोठी तुळई खांबावर चढवायची होती. लोक ती चढवायचा आटोकाट प्रयत्न करीत होते पण त्यांना यश येत नव्हतं. सतत पाच दिवस प्रयत्नांची शर्थ करून ते थकले होते. मूळ पुरुषाने ते पाहिलं आणि त्याचे बाहू स्फुरू लागले. तो चांगला धट्टाकट्टा, उंचापुरा, लोखंड ओतून घडवलेल्या पुतळ्या- सारखाच होता, अंगात हत्तीचं बळ. त्याने त्या लोकांना सांगितलं, तुम्ही सगळे मिळून तुळईचं एक टोक उचला, मी एकटाच दुसऱ्या टोकाला खांदा देतो. लोक ऐकतच राहिले.

"बघा तरी तुम्ही खांदे देऊन."

त्या सगळ्यांनी मिळून एका टोकाला खांदा दिला. मूळ पुरुषाने एकट्यानेच दुसरं टोक उचललं. एक पाय दगडावर ठेवून त्याने पटकन तुळई खांबावर टेकवली. सगळेच आश्चर्याने थक्क!

देवळाच्या मिराशाने पुढे येऊन विचारलं, "कुठचा, कोण बाबा तू?"

"घरदार सोडून आलो आहे मालक, तुमच्या गावात आसरा द्या नाहीतर वाऱ्यावर पडेन मी!"

मिराशाने त्याला जवळ बोलावलं आणि गावच्या जाणकारांसमोर सांगितलं, "तिथं एक कडमाचं आणि दुसरं सावरीचं झाड दिसतं ना तो तुझा तिठा. तिथं खुंटा मार आणि तुझी मठी उभी करून आनंदात राहा. नदीच्या काठावर बरीच जमीन पडीक आहे. तिची मशागत करून तुझा निर्वाह कर. जमीन कष्टांची असली तरी सुपीक. मधे मधे पूर येतो तेव्हा कुजून जाते. पण एक वर्षाचं पीक आलं तरी तीन वर्षं खाऊन संपणार नाही."

मूळ पुरुषाने आपलं चंबू-गबाळं उचललं आणि बायको-पोरांना घेऊन तो जाऊ लागला, कडमाच्या झाडाकडे.

" आणि हे बघ, तू देवळाची तुळई आधी ठेवली आहेस तेव्हा नरसिंहाच्या जत्रेच्या दिवशी कळसाला फोडलेल्या सात नारळातला एक नारळ तुझ्या मानाचा; ह्या गावचा मानाचा एक पाट आता तुलापण."

मूळ पुरुषाने कृतज्ञतेने मिराशाकडे पाहिलं.

" तुझा कुलदेव कोण ? "

" गावडोंगरीचा मल्लिकार्जुन. "

" मग तू आमचा सोयराच. अमावास्या-पौर्णिमेला आयता जेवणकार मिळाला. "

कडमाच्या वृक्षाजवळचा तिठा तसा बराच ऐसपैस होता. तिथे तऱ्हेतऱ्हेची बरीच झाडंझुडपं पसरली होती. मूळ पुरुषाने न्याहाळून पाहिलं, मध्येच कोसळून मातीमय झालेल्या एका घराचे अवशेष दिसत होते; तसाच तुळशीचा कोसळलेला पार आणि गंजलेली एक समईसुद्धा.

एक वाटसरू जाता जाता म्हणाला, " हा पडीक परिसर लाभत नाही कुणाला. झोपडी उभी केलेला माणूस चार पावसाळेदेखील टिकत नाही. पुत्रफल प्राप्त होत नाही. पूर्वी कुणीतरी, मेलेल्या एका गरोदर बाईला पोटात मूल जिवंत असतानाच पुरलं होतं म्हणे. तेव्हापासून ती लावसट इथं मूळ धरून बसली आहे. "

मूळ पुरुष चिंतेत पडला. आता आणखी कुठे जाणार ? आयतीच राखणदारी मिळाली आहे गावाची ती सोडता कामा नये. काय बरं वाईट व्हायचं असेल ते इथंच होऊ दे. तो त्वेषाने उठला, खुंटा पुरला आणि कुदळ हातात घेतली.

आज त्या ठिकाणी मूळ पुरुषाची मोजून अठरा घरे आणि तीस चुली आहेत. खाऊन-पिऊन समाधानात नांदताहेत. वस्तीभोवती अनेक जातींच्या आंब्याची झाडे आहेत, मधे नारळांनी भरलेले माड डुलत आहेत. चारी दिशांना चार विहिरी आहेत, तलावासारख्या.

वस्ती अशा ठिकाणी वसली आहे की चारी बाजूंनी अफाट पसरलेली शेतं आहेत. पलीकडे एका बाजूने काळ्या नदीचा प्रवाह, त्यातली बेटं, वरच्या बाजूने शेतं संपली की उंच डोंगर. डोंगराच्या पायथ्याशी कारवार शहराकडे जाणारा पायवाटेसारखा रस्ता.

शिद्दर गावची ही एकच वस्ती शेतांमधली, बाकी सगळा गाव डोंगराच्या

पायथ्याशी. अवघ्या गावावर मागच्या हिरव्यागार डोंगरांनी छत्र धरल्यासारखं वाटतं. त्यामुळं गाव जणू निसर्गाच्या कुशीत वसल्यासारखा शीतल, रमणीय, समाधानी वाटतो.

खूप पाऊस पडल्यावर काळ्या नदीचं पाणी चढू लागलं की मग मात्र ह्या खालच्या वस्तीतल्या लोकांच्या पोटात गोळा उठतो. पूर येऊन पाणी अंगणापर्यंत पोचतं. मग हे लोक आपापली चीजवस्तू गोळा करून घर सोडायची तयारी करतात. मोठ्ठा पूर आला तेव्हा तर तेरा दिवस वस्ती पाण्याखाली बुडालेली होती.

गणेश सकाळी उठला, तोंड धुतलं आणि मंजुळाला उठवीत म्हणाला, "मी म्हातारआंब्याच्या तुकड्यात जोत बांधणार आहे. तू नंतर चहा, भाकरी घेऊन बायूलाला पाठव, लवकरच्च पाठव कारण मग मला जोत सोडून वईकरता खुंट आणायला डोंगरावर जायचं आहे."

आपा गेला तशी मंजुळा लगेच आळस झटकून उठली. मधे कधी कोण जाणे, दोघीही बहिणी एकाच चादरीत घुसल्या होत्या. मंजुळा हळूच चादरीतून बाहेर आली. सुटलेल्या केसांचा तिने अंबाडा बांधला. पोलक्याची वरची दोन बटणं सुटली होती, घाईघाईने तिने ती लावली. छेः, ही दोन्ही पोलकी आता तंग झाली आहेत. लवकरच नवीन शिवावी लागतील. बायूलाला पण एक फ्रॉक शिवायला हवा.

रात्री तिने भाकरीसाठी म्हणून अर्धा शेर उकडे आणि पावशेर सुरय तांदूळ भिजत घातले होते. ते धुऊन तिने रगड्यावर घातले आणि घडाघडा वाटायला सुरुवात केली. तेवढ्यात बायूलाला जाग आली.

"बाय, पोळे करणार का ग?"

"नाही, भाकरी."

"मी नाही खाणार हं."

"तुला नेहमी पोळे हवेत खादडायला, पण त्याच्यासाठी मग उडीद लागतात, तेल लागतं."

"बाय. आज शाळेला सुट्टी."

"का ग?"

"माजाळीची जत्रा नाही का ग आज?"

"वा जत्रा माजाळीला आणि तुम्हाला सुट्टी इथं शिद्दरला. बरं बाई तुमच्चं."

अग, मास्तर माजाळीचा नाही का? बाय माजाळीला खूप मोठी जत्रा असते म्हणे. गोव्याहून देखील लोक येतात. ''

'' मी एकदा गेले होते आपाबरोबर. तिथं त्याचा मावसभाऊ सदाकाका असतो ना. तिथे ना दोन 'भांड्या' असतात. त्यांना मोठमोठे दोर बांधून शंभर दोनशे लोक ओढीत असतात. भांडीची वरची आडी इतकी उंच इतकी उंच, की ती वर जाते तेव्हा आकाशाला भिडल्यासारखीच वाटते. ओढणारे लोक, 'ये, भांडी ये, भांडी ये' म्हणून जोरजोरात ओरडत असतात. अबोलीच्या फुलांनी सजवलेली वरची आडी वर खाली हलत असते, करकरत असते. भांडीबरोबर लोकांच्या झुंडी पळत असतात. मज्जा येते. ''

'' मला मात्र आपा कुठल्याही जत्रेला नेत नाही. ''

'' आई असताना जायचा ग तो, जत्रेला, नाटकाला. आता नाही कुठं जात. आपल्या गावच्या जत्रेला देखील नाही ग जात तो. ''

'' का ग? ''

'' कोण जाणे! तुला माहीत आहे बायूल, आपा पूर्वी नाटकात देखील काम करायचा. ''

'' खरंच? ''

'' मला पक्कं आठवतं, आपाने एकदा एवढी मोठी दाढी लावून काम केलं होतं. मी आईबरोबर पुढेच बसले होते. आई सारखी हसत होती. ''

सुमनने नुसतंच '' हूं '' केलं आणि ती जाऊन परत झोपली.

'' झोपलीस का ग पुन्हा? भिकूअण्णाकडे जाऊन चहाकरता दूध घेऊन ये जा. ''

ती उठली आणि पेला घेऊन दूध आणायला गेली. बाहेर उजाडलं होतं पण हवेत गारवा होता, थंडी वाजत होती. सुमनने दोन्ही हात छातीवर कवटाळून घेतले. अंगणातल्या कडेला असलेल्या माडांची झावळे वाऱ्याने हलली आणि तिच्या अंगावर दवाचे थेंब पडले. अंग शिरशिरलं. पेला हातात घेऊन ती भिकुअण्णाकडे पळत सुटली. वाटेत खुशाली चुलीत मोठा जाळ करून भात उकडीत होता. नितळ सारवलेल्या अंगणात काल उकडलेलं भात वाळत घातलं होतं. त्या जाळाची ऊब घेत सुमन तिथं जरा थांबली. चुलीवरची एवढी मोठी भाताची हंडी आवाज करीत होती. एकसारखा भर्रभर्र आवाज आणि मधेच वरून पाणी उतू जात होतं ते चळ्ळ्कन् चुलीत पडत होतं. खुशाली भात उकडलं का म्हणून पुनःपुन्हा पाहायचा नि जाळ पुढे सारायचा. हरी कांबळ पांघरून विस्तवाचा शेक घेत होता.

“ किती हंड्या झाल्या रे, खुशाली ? ”

“ ही आठवी, शेवटची. ”

“ आठच ? ”

“ या वर्षी पीक तसलंच ते. गेल्या वर्षी मी अकरा हंड्या उकडल्या होत्या, हरी. तरी पुढचं पीक येईपर्यंत दम निघाला. या वर्षी देवच आहे! शेवटच्या महिन्यात उणं पडणारं भात आणायला निळूकडे जावं लागलं नाही म्हणजे मिळवली. ”

“ छेः, निळूकडे ! खंडीला दीड खंडी भात खळ्यावर येऊन घेऊन जातो आणि वर फोलपट भात काढून दिलं म्हणतो. आपल्याच वंशकुळीचा असूनही मारवाडी जातीचा असल्यासारखा व्याज खातो. ”

“ तुझं बरं आहे रे, हरी. पंधरा वर्षं सैन्यात नोकरी केली, आता पेन्शन. ”

“ अरे, अठरा वर्षांचा असताना गेला होतो सैन्यात पाय तुडवायला. किती हाल, दगदग सोसली माहीत आहे ? इथं तुम्ही बामणांची शेतं अडवली, आता ती तुमचीच झाली आणि तुम्ही मोठे शेतकरी झालात. माझ्या वडीलाचं शेतसुद्धा भावाने नीट वाटून दिलं नाही. वर म्हणतो, मी राखून ठेवलं आहे, देतो तेवढं घे. मोठा भाऊ असल्यामुळं मीही भांडायला नाही गेलो. चार दमड्यांची पेन्शन तेवढी दिसते तुम्हाला. ”

“ तू काहीही म्हण हरी, शेतीचा व्यवसाय म्हणजे भुकेकंगाल व्यवसाय. वडीलधाऱ्यांनी म्हटलेलंच आहे, “ उत्तम व्यापार, मध्यम नोकरी, कनिष्ठ शेती ” मध्येच खुशालीने साद घातली.

“ अग, डाव आणि बुटला घेऊन ये. भात उपसायला हवं. ” त्याने जळती लाकडे भरभर बाहेर काढली आणि त्यांच्यावर पाणी शिंपडलं. तेवढ्यात त्याची नजर सुमनवर गेली. “ ही ‘ मुगालालू ’ कधी आली ? ”

सुमन लाजली आणि पळत सुटली. लहानपणी कुणीतरी असाच एकदा तिला मुगाचा लाडू दिला होता. तो तसाच हातात घेऊन ‘ मुगालालू, मुगालालू ’ म्हणत ती साऱ्या वस्तीभर नाचली होती. तेव्हापासून लोक तिला ‘ मुगालालू ’ म्हणून चिडवायचे.

सुमन दूध घेऊन आली तेव्हा मंजुळा चुलीवरचा चहा उतरवून वाट बघत बसली होती. “ इतका वेळ दूध आणायला ? म्हशीची धार काढीत बसली होतीस की काय ? ”

सुमन उलट तिच्यावरच ओरडली, “ भिकुअण्णाने आत्ताच तर गोठ्यातून दूध काढून आणलं. ”

“ बरं, बरं, तोंड धू आणि चहा घे. ”

मंजुळाने सुमनला चहा-भाकरी दिली. आपाचा चहा पितळेच्या किटलीत ओतून वैलाजवळ ठेवला. ”

“ सुमन, लवकर चहा पी, आपाचा चहा घेऊन शेतावर जायचं आहे. मी विहिरीवर जाऊन पाणी घेऊन येते. ”

मंजुळा घागर, कळशी उचलून दोर घेऊन विहिरीवर गेली. सुमन चहा पिऊन बाहेर आली तर घरापुढल्या वाटेवरून गोविंद, चंद्रकांत, मनू वगैरे मुलं कुठंतरी जात होती. “ कुठं जाता रे गोविंद ? ”

“ भवरीच्या तळ्यातली कमळांची बोंडं काढायला. ”

“ पाणी जास्त आहे का रे ? ”

“ नाही ग, कमरेएवढं. ”

“ मी येऊ ? ”

“ ये. ”

मागंपुढं न बघता दरवाजा तसाच उघडा टाकून सुमन मुलांबरोबर पळाली.

मंजुळा घागर घेऊन आली तर सुमन आत, बाहेर कुठंच नव्हती. अंगणात येऊन ती मोठमोठ्याने हाका मारू लागली, “ सुमन, ए सुमन, मेली कुठं गेली कडमडायला ? ”

पण सुमनचा आवाज नव्हता. वेडा गंगू गुरांचा कळप घेऊन कडेकडेने चालला होता. तो मोठमोठ्याने गुरांशी बोलत होता, त्यांना शिव्या देत होता. त्यामुळं काही वेळ त्याच्या आवाजाने सगळा परिसर गजबजून गेला होता. मंजुळा पुन्हा हाका मारू लागली, “ सुमन... ”

मधल्या घरातली सुमित्रामावशी दारात येऊन म्हणाली, “ अग, वस्तीतली मुलं भवरीच्या तळ्यातली कमळांची बोंडं काढायला गेली आहेत. तीपण गेली असणार. बोलत होती मघाशी त्यांच्याकडे. ”

मंजुळा इतकी चडफडली, मनात म्हणाली, “ आता येऊ दे तर खरी. मीच काठीने फोडून काढते तिला. ” ती तडक आत गेली. चहाची किटली उचलली, भाकऱ्या कपड्यात बांधून घेतल्या आणि आपाला चहा नेऊन द्यायला गेली.

बायूलाला का नाही पाठवलंस म्हणून आपाने विचारलं तेव्हा ती म्हणाली, “ उठलीच जराशी उशिरा. जाऊ दे म्हटलं. तोंड धुतल्यावर तिला चहा दिला आणि मीच इथं आले. ”

मंजुळा चहा देऊन परत आली तरी सुमनचा पत्ता नव्हता. आता मात्र

तिला खरंच राग आला. तिला सोडणारच नाही आज, म्हणत तिने बाहेर जाऊन एक बारीकशी काठी तोडून आणली आणि पन्हळीच्या तिथं एका कोपऱ्यात ठेवली.

मंजुळा 'मुडे' बांधण्याकरता गवताची वेणी वळत सोप्यावर बसली होती. समोरची नदी, तिच्या पलीकडील हळगे, हुळगे गाव, त्याच्या मागचे डोंगर. सगळ्यावर उन्ह चकाकत होतं आणि सगळा परिसर हाताशी आल्यासारखा वाटत होता. हुळग्याच्या माळावर नवीनच बांधलेल्या त्या मोठ्या शाळेचा लाल रंग इथूनही स्पष्ट दिसत होता. नदीच्या काठी असलेल्या उसांच्या मळ्याला कुणीतरी रहाटाने पाणी शिंपत होता. आणि रहाटाचा कर्रकर्र आवाज येत होता.

मंजुळाच्या मनात संताप आणि त्याचबरोबर काळजीही. ही पोरगी मुलांबरोबर पाण्यात खेळायला गेली आहे. त्या तळ्यातून पलीकडे गणपतीकरता माती काढतात. तिथं पाय गेला तर परत वर येणार नाही.

शेजारची गोकुळकाकी अंगण सारवत होती. कोळशाची पूड मिसळलेलं ते काळं काळं शेण. दर उन्हाळ्यात किती सुरेख अंगण करते ही गोकुळकाकी ! ऐसपैस समतल अंगण, कापलेल्या सुंदर कडा. आधी मातीने अंगण सारवून घ्यायचं, ते वाळल्यावर शेणामातीने सारवायचं. त्यावर काळ्याभोर शेणाचा हात. अंगण इतकं सुरेख दिसायचं, की नुसतं नाचत सुटावं, फुगड्या घालाव्या असं वाटायचं. खुशालीअण्णा दारात झावळांचा छोटासाच मांडव घालतो. घरीदारी नेहमी गारवा नांदत असतो. वस्तीवर उन्हाळ्यात प्रत्येकाच्या दारात सारवलेलं अंगण असतं पण गोकुळकाकीच्या अंगणाचं सौंदर्य वेगळंच. अंगणातली ती तुळस तर गवंड्याने रंगवल्यासारखी सारवते.

उरलेलं शेण तळहातावर घेऊन ते गायरीत टाकण्यासाठी गोकुळकाकी जात होती. मंजुळा म्हणाली, "काकी, यंदा शिमग्याचा मेळा नाचू दे तुझ्या अंगणात. मेळा अंगणात उतरला की त्यांचा उत्साह द्विगुणित होईल."

"मी मस्त घेतला असता ग मेळा नाचवून. चांगली ताटभरून तळीदेखील दिली असती. पण मूळ तुळशीच्या मोठ्या अंगणातच मेळा नाचायला पाहिजे, इतर कुठे नाचता कामा नये, असा पूर्वापार चालत आलेला दंडक आहे ना ?"

"पण तुझं अंगण म्हणजे कुणीतरी नाचावंसंच आहे ग."

"अग, तुझा आपा शेताची मेर घालतो ती माझ्या अंगणातल्या मेरेपेक्षाही रेखीव असते. माझी कसली स्तुती करतेस ?"

हो, आपाचा हात खरंच कलावंताचा. त्याने घातलेली धान्याची, शिवडांची

घुडी किती छान वाटते. पण हल्ली त्याचे हात जणू आळसावले आहेत, बधिर व्हायला लागले आहेत. परवा बियाणांचे गठ्ठे कसेतरी बांधून ठेवले आहेत, एका बाजूने पोट सुटल्यासारखे दिसतात. पूर्वी कसे चेंडूसारखे गठ्ठे बांधायचा तो.

बऱ्याच वेळानंतर सुमन आली. गुपचूप पावलांनी अंगणात पोचली, घाबरत घाबरत. मंजुळाने रागानेच तिच्याकडे पाहिलं खरं पण पाहिल्यावर तिचा राग डोळ्यांतच मावळला. सुमन भिजून चिंब झाली होती. केसांतून देखील पाणी गळत होतं. तिचे दोन्ही खांदे, टवटवीत फुललेल्या ढीगभर साळकांनी भरले होते. ती सगळीच साळकांनी भरली होती. तिचा गोरा चेहराही जणू एक साळीकच झाला होता. आणि फ्रॉकच्या ओटीत साळकांची बोंडं भरलेली. तिला पाहून मंजुळाला बोलणंच सुचेना. ती बघतच राहिली.

सुमन मंजुळाच्या जवळ आली. हळूच ओटीतली दोन मोठी बोंडं काढून तिच्या समोर धरून म्हणाली, " बाय, बोंडं खाणार ? "

तिचा तो शुद्ध, निरागस चेहरा बघून मंजुळा गप्पगार झाली. तिने सुमनच्या खांद्यावरची देठासहित असलेली दहा-वीस साळकं काढून घेऊन आपल्या मांडीवर ठेवली आणि ती हुंगली. मनात म्हणाली, " म्हणूनच तुझी आई होऊन राहिले मी, बायूल. तुझ्याएवढंच वय असताना मी तुझी आई झाले होते. तू मात्र अजूनही उनाडकी सोडत नाहीस. "

सुमन पुन्हा तिच्या नजरेसमोर तीन महिन्यांची बाळ झाली. नऊ वर्षांची मंजुळा, तिची आई होऊन तिला खेळवू लागली. आईच्या स्तनपानासाठी रडणाऱ्या सुमनला सुलोचनाकडे नेऊन ती म्हणाली, " ताई, हिला जरा पाजशील ? रडून रडून चिनारली आहे ती ! " ती मागच्या स्मृतीत बुडून गेली.

मंजुळा चुलीच्या पुढ्यात बसून पेजेच्या मडकीचा जाळ सारीत होती. मडकी खदखदून पाणी उतू जात होतं आणि ती धार विस्तवावर पडत होती. विस्तव परत परत विझत होता. बाहेर पाच महिन्यांची सुमन न थांबता अंथरुणात रडत होती. तिला उचलून घ्यावं म्हणून मंजुळाने घाईघाईने जाळ पुढे सारला. निखाऱ्याला लागून तिचा हात भाजला. वरून कढत कढत पेजेच्या पाण्याची धार हातावर पडली. " आई ग " म्हणून कळवळत हात तसाच झटकून ती बाहेर आली.

बाहेर माजघरात बसलेला गणेश रागाने सुमनवर तणतणत होता. " अवचिन्ह, वेळी अवेळी न थांबता ओरडते आहे. महिना व्हायच्या आत

आईला खाऊन टाकली आणि आता कुणाला खायला रडतेस? मेलीस तर सुटेन मी.''

मंजुळाने तिला उचलून अंगावर घेतली आणि ती अंगणात आली. ''रडू नको हं, शहाणी माझी बायूल - नाही... नाही...''

मंजुळाने तिला अंगावर घेऊन डोलवलं, कुशीत घेऊन तशीच अंगणभर धावली. मेरेवरच्या जास्वंदीचं फूल काढून तिच्या समोर धरून हलवलं. हळूहळू ती रडायची थांबली.

''आपा, पेज शिजली वाटतं. पेजेची मडकी जरा चुलीवरनं खाली उतरवून ठेव. काल मी गोकुळकाकीला बोलवून आणली होती, मडकी खाली उतरून ठेवण्यासाठी.''

गणेशने आत जाऊन चुलीवरची मडकी उचलली आणि खाली ठेवली. बाहेर येता येता त्याने विचारलं, ''पेजेबरोबर तोंडी लावणं काय केलं आहेस ग?''

''लीलाताईने चार शेवग्याच्या शेंगा दिल्या आहेत, त्याच शिजवते.''

ती आत गेली आणि तिने थोडं पेजेचं पाणी ताटात काढून थंड केलं आणि ते चमच्याने थोडं थोडं बायूलाला पाजू लागली. मग तिला खाली ठेवून ती शेंगा चिरू लागली. तेवढ्यात गणेश आत जाऊन नारळाची वाटी घेऊन आला आणि विळीवर बसून ती खवायला लागला. शेंगा चिरत बसलेल्या मंजुळाला तो खर्र खर्र, एका तालात, आवाज ऐकू येत होता. आईपण अशीच खवायची ताटभर खोबरं. 'हुमणा'साठी आणि भाजीला पण भरपूर खोबरं घालायची. आपा शिव्या द्यायचा, पाडलेले नारळ लवकर संपतात म्हणून. पण पाहिजे तेवढं खोबरं असल्याशिवाय ती स्वयंपाकच करू शकत नव्हती. मामा मधेच कधीतरी एखाद दिवशी यायचा. ''तुझ्या हुमणाच्या ओढीने धावत आलो आहे मी'' मग तो येताना आणलेले शेवर्ट, शेतकं समोर ठेवायचा, अगदी ताजे टवटवीत. मग आईच्या हाताला न्यारीच चव यायची.

आईने नारळ खवायला सुरुवात केली रे केली मी पडलेलं पहिलं खोबरं उचलून पळत सुटायची. आई शिव्या द्यायची पण मी थेट अंगणात. बरेचदा आई मला ''उनाड पोरगी तू'' म्हणायची, मला बरं वाटायचं. आई गेल्यावर मात्र लोक मला म्हणू लागले, ''मंजुळ, पोरी तू आता बायूलाची आई व्हायला हवं, बापाला अन्न शिजवून घालायला हवं.''

शेंगा चिरून झाल्यावर तिने त्या धुतल्या. स्वयंपाकखोलीत असलेल्या आपाने त्या टोपात घालून चुलीवर शिजत ठेवल्या. वरून खोबरं, कांदा आणि

मिरची टाकली. जाळ सारीत तो चुलीजवळ बसला. घराच्या मागच्या बाजूने गोकुळकाकी कुठेतरी जात होती. “ झाला काय ग स्वयंपाक, मंजूळ ? ” म्हणत ती खिडकीपाशी आली. चुलीसमोर पाठमोऱ्या बसलेल्या गणेशला बघून ती म्हणाली, “ सकाळी खांद्यावर खोरं मारून मेरा करायला गेलेला पाहिला होता की रे मी तुला. कधी आलास ? ”

“ हा आताच आलो. चिखलात खोरी मारता मारता थकलो. लवकरच आलो. ” जाता जाता गोकुळकाकी म्हणाली, “ शेताभाताचं काम आणि घरी आल्यावर ही चुलीपुढची दगदग. पुरुषमाणसाला चुलीपुढ्यात बसलेलं पाहवत नाही. पण त्या दहा वर्षाच्या पोरीवर तरी किती भार टाकणार ? ”

मंजुळाने खिडकीतून पाहिलं, गोकुळकाकी तुरूतुरू चालत होती. तशीच होती ती. चालायला लागली, कामाला लागली की तिला विश्रांती ठाऊक नसायची. बुटक्या बांध्याची, दणकट हातापायाची गोकुळकाकी म्हणजे कामाला नुसती वाघ. शेतात इतरांबरोबर वेणणी, लावणी करताना ही सर्वांच्या पुढे. रानात सरपण आणायला गेली तर हा एवढा मोठा भारा घेऊन यायची. पुरुषदेखील आश्चर्याने थक्क.

मंजुळाने थोपटून थोपटून सुमनला झोपवलं. मग तिची अंगडी-टोपडी, रात्री भिजवलेलं अंथरूण वगैरे गोळा केलं नि आत येऊन म्हटलं, “ आपा, मी विहिरीवर जाऊन कपडे धुऊन येते हं. ”

आपाने नुसतं “ हां ” म्हटलं. ती तिथंच जरा घुटमळू लागली. “ आपा, भिकुअण्णा बायूलाच्या दुधाच्या पैशांबद्दल विचारीत होता. म्हशीला पेंड आणायची आहे म्हणत होता. ”

गणेश एकदम खेकसला, “ देतो म्हणावं पैसे, बुडवून नाही खाणार. आणि तुला सांगतो, उद्यापासून दूध बंद कर. फार कौतुकं नकोत. वाचली तर वाचली. ”

मंजुळा बावरल्यासारखी झाली. “ नको, आपा, दूध दिलं नाही तर भुकेने तळमळेल ती. ”

“ पेज दे चांगली घोटून. ” मंजूळ मुकाट्याने विहिरीवर गेली.

विहिरीवरून परत आली तर लीला बायूलाला घेऊन अंगणात उभी आणि तिला “ उगी उगी ” करते. तिने मंजुळाला दरडावलं, “ अग तिला माजघरात तशीच टाकून कुठं गेली होतीस तू ? कितीतरी वेळ रडून रडून पोर कळवळली. भूक लागली असेल ग तिला. ”

आपा होता इथं, कुठं गेला असेल, म्हणत ती आत गेली. बशीत थोडी

पेज घेऊन ती चांगली घोटली आणि बाहेर येऊन म्हणाली, "दे तिला इकडे, लीलाताई. पेज भरवते."

"अग, ती पेज पचणार आहे का तिला? हगवण लागेल ना?"

"काही नाही व्हायचं, लीलाताई. दे तिला."

लीलाने बायूलाला मंजुळाकडे दिलं आणि म्हटलं, "उद्या काही झालं तर मी सांगितलं नाही म्हणू नकोस हं." ती निघून गेली.

मंजुळाने जेमतेम दोन चमचे पेज भरवली असेल, बायूलाने ती ओकून टाकली. तिच्या झबल्यावर सगळं खरकटं सांडलं. ती उगाच तणतणली, "आता तुझं जास्तच झालं हं, बायूल. पेज नाही घेतली तर उद्यापासून नुसतं पाणी पिऊन राहावं लागेल. आपाने दूध बंद कर म्हटलं आहे."

ती आत गेली. वाईलावरची दुधाची पातेली आणली आणि त्यातलं सगळं दूध तिला पाजलं. पोट भरलं तशी बायूल हसू खेळू लागली. मग मंजुळा पण तिच्याशी खेळू लागली. तिला दोन्ही पायांवर घेऊन होडी केली, विमान केलं. तऱ्हेतऱ्हेचे आवाज काढीत, टाळ्या पिटत दोघी बहिणी हसत हसत खेळू लागल्या.

खेळून दमल्यावर बायूल पेंगू लागली आणि मंजुळ उगाच घाबरल्यासारखी झाली – उद्यापासून आपाने तिचं दूध बंद कर म्हटलं आहे!

भिकुअण्णा दारावरून जात होता. तो परत पैसे मागेल म्हणून मंजुळा माजघरात आडोशाला उभी राहिली. भिकुअण्णाने अंगणातूनच आवाज दिला, "मंजूळ, ए मंजूळ."

घाबरत घाबरत बाहेर येऊन तिने म्हटलं, "काय अण्णा?"

"मोठी कोक्याची आई होऊन फिरते आहेस. बायूलाला दूध कोण पाजणार?"

"मी पैशांबद्दल आपाला सांगितलं आहे, अण्णा!"

"हो, भेटला होता गणेश. त्याचं डोकं फिरलं आहे. म्हणे, दूधच बंद कर. मला शिव्या देत होता. पैसे देईल तेव्हा देऊ दे. तू दूध आण रोज. पोरीला वळवळू देऊ नकोस. आई गेली लेकराची आणि स्तनपान चुकलं. आता मी दूध बंद करू होय? पैशाला पावतो तो कामाला पावतो, आणि दुधाला पावतो तो जन्माला पावतो असं म्हणतात."

मंजुळाला गहिवरून रडूच आलं एकदम. डोळ्यांच्या कडा ओलावल्या आणि तिने ओला आवंढा घोटला. तिने पुढे रडू नये म्हणून भिकुअण्णा लगबगीने म्हणाला, "जा पोरी, घरी दुधाचा लोटा भरून ठेवला आहे. मावशीला द्यायला

सांग."

काळोख पडल्यावर संध्याकाळी आपा आला. हातपाय न धुताच तसाच डोक्यावरनं कांबळ पांघरून माजघरातच झोपला. मंजुळाने चिमणीचा दिवा त्याच्या पुढ्यात ठेवला आणि तीही बाजूला बसली. बायूल आत झोपली होती. आपाला उठवायचा मंजुळाला धीर होत नव्हता. मधेच तो कधी कधी एकदम चिडतो!

बसल्या ठिकाणी तीही आता पेंगू लागली. थोडा झोपेचा अंमल — पुन्हा जाग... आईबरोबर मामाकडे जायला होडीत बसली आहे; अंगावर कोऱ्या वासाचे कपडे. आईच्या लुगड्याचा जरीकाठ, अंबाड्यावर शेवंतीची फुलं - अबोलीची फुलं... आई साखरआंब्याचं झाड हलवून आंबे पाडते. एक पिकलेला आंबा चाखून बघते आणि अख्खा मला देते... ती हळूच आईच्या पोटाला कान लावून विचारते, "आई, आत बाबू आहे.... ?

पेंगता पेंगता मधेच तिचा तोल गेला आणि डोकं खाड्कन भिंतीला आपटलं. त्याबरोबर आपाने डोक्यावरचं पांघरूण काढून पाहिलं, "पोर इथं बसून पेंगत होती वाटतं." तो उठला. "बाय, ऊठ, जेवू या."

त्याने उठून स्वतःच वाढलं. दोघंही मुकाट्याने जेवू लागली. पण वाटत होतं, इथंच कुठंतरी आईचं वास्तव्य आहे. तिची सावली हलते. काळोख-उजेडातून ती फिरते. दोघांपैकी कोणीतरी आता आईविषयी बोलेल आणि दोघांनाही रडू येईल. आई गेली तेव्हा दीड-दोन महिने असंच व्हायचं, कुणाची मंद पावलं वाजली, एखादा मधाळ शब्द कानावर पडला की खळ्कन डोळे पाझरायचे. आपा तर इतका हळवा झाला होता की बऱ्याच वेळा मंजुळाला वाटायचं, तोंडावर पांघरूण घेऊन तो आतून रडतो आहे.

जेवून उठल्यावर आपाने विचारलं, "बाय, बायूलाला दूध दिलं होतं ना ग?"

"हो आपा, भिकुअण्णाने दूध ने म्हटलं आहे."

"आण तू दूध. मी देतो पैसे."

यशवंत आणि आबोले हळूच घरात घुसली आणि गणेशच्या समोर येऊन गप्पच बसून राहिली.

"का येणं केलंस, यशवंत?"

"सहज रे, असंच."

या नवरा-बायकोचं साऱ्या गावाला कौतुक. शेतात, रानात कुठंही जाताना

दोघंही बरोबरच बाहेर पडतात आणि दोघंही बरोबरच परततात. नवरा जोत बांधतो तेव्हा बायको मेरेवर बसून त्याच्याशी गप्पा मारते आणि बायको वेणणी करते तेव्हा नवरा गप्पा मारतो. लोक त्यांना राघू-मैनेची जोडी म्हणून चिडवतात. पण गणेशला ती आठवतात ते पाऊस पडू लागल्यावर दोघंही एकाच --- उभी राहिलेली.

कोपऱ्यात एक कुऱ्हाड होती. यशवंत उगाचच कुऱ्हाडीकडे गेला.

“ गणेश बघ, तुझ्या कुऱ्हाडीचा दांडा मोडला आहे, लवकरच दुसरा घालावा लागणार. ”

“ रानात जाऊन दांडा आणायला हवा, तो साफ करायला हवा. ”

पण गणेश त्यांना बारकाईने न्याहाळीत होता. का बरं हे जोडपं आलं असेल ?

आबोले अगदी कळवळ्याने बोलत होती, “ बाई नसलेलं घर म्हणजे पार नसलेला पिंपळ. दोन्ही पोरीच. उद्या बरंच काही व्हायचं आहे. पोरीच्या जातीला आई हवीच. ”

“ भोग भोगायचे असतात ग, आबोल्या. ”

“ आता भोगशील उद्या म्हातारपणी हातपाय मोडून पडल्यावर काय करशील ? घरात आपलं म्हणून एक माणूस हवंच. ”

“ आता काय उपाय आहे त्याला ? ”

“ उपाय आहे गणेशबाब, तुझं वय झालेलं नाही अजून, परत लग्न कर. ”

आपल्या डोक्यावर घणाघात झाल्यासारखं वाटलं त्याला. ज्याला तो घाबरत होता नेमकं तेच बोचकारायला समोर उभं राहिलं होतं ! तो काहीशा रागातच म्हणाला, “ तुला वेड लागलं आहे, आबोल्या. जा बघू लवकर इथून. ”

यशवंत म्हणाला, “ दिवा एकदा मालवला तर आपण पुन्हा पेटवतोच ना ? कुऱ्हाडीचा दांडा मोडल्यावर पुन्हा नवा घालतोसच ना तू ? पूर्वी बायको असताना सुद्धा चारचार लग्नं करायचे. ऐन वयात बायको गेली आणि तू असाच राहणार आहेस ? अरे, त्या दोन अजाण पोरींकडे तरी बघ जरा. ”

डोकं धरून मान खाली घालून गणेश गप्पच बसला.

“ माझी चुलतबहीण आहे. आहे काळीसावळी पण दणकट बांध्याची आहे. चुलता माडावरून पडल्यापासून अंथरुणावरच आहे. ”

“ म्हणून तू तुझ्या चुलतबहिणीला माझ्या मुलींच्या डोक्यावर सावत्र आई बसवू पाहतेस ? ”

“ मोगरे तशी चांगली पोरगी आहे, गणेशबाब. मीही आहेच इथं. उद्या मुलींना तिने काही कमी-जास्त केलं तर झिंज्या धरून हलवेन मी. ”

गणेश काहीच बोलला नाही.

ह्या दिवसात बायूलाला काय झालं होतं तेच कळत नव्हतं. रात्रंदिवस नुसती रड रड रडायची. खाल्लेलं देखील पचत नव्हतं, उलट्या व्हायच्या. मधेच पोट फुगायचं, मधेच सदीने घुसमटायची. अंगाने देखील बरीच रोडावली होती. मूळचा तांबूस गोरा रंग आता पांढरा फटफटीत दिसत होता, कातडी अगदी हाडांना चिकटली होती. फक्त दोन डोळे तेवढे लुकलुकत होते. मधेच कधीतरी तिने हसून मंजुळाकडे पाहिलं की तिचं काळीज कळवळून यायचं. हसताना तिच्या चेहऱ्यावरच्या शिरा ताणल्या जाऊन तिला दुखत असावंसं वाटायचं. ती रडायला लागली की मंजूळ नाना प्रकारे तिला खेळवायचा प्रयत्न करायची आणि रडायची थांबली नाही तर स्वतःच रडायची. आपा बिचारा परत परत साळूआजीला बोलावून आणायचा. ती येऊन काहीतरी शेक भाज करायची, कधी कधी मुळी उगाळून द्यायची.

साळूआजी स्वतःचं अपयश मानून घ्यायला तयार नव्हती. कधी कधी म्हणायची, ताप रडतो पेजेसाठी, बाळ रडतं आईच्या उबेसाठी.

बायूल रडायला लागली की कधी कधी आपा नुसता निर्दयपणे माजघरात बसून राहायचा पण मंजुळाचा जीव नुसता वर खाली व्हायचा. आत बाहेर करीत ती कुठल्या तरी काकीला नाहीतर मावशीला हाका मारीत सुटायची आणि तिच्या हाकेला त्या धावून यायच्याही. सगळ्यांचं शेवटी एकाच मुद्द्यावर एकमत व्हायचं, “ आई नसलेल्या पोराचं जिणंच असं. उडत-बुडत वर येईल. ” पण एका बाईने म्हटलं, “ तिला कारवारला नेऊन चांगल्या डॉक्टराला दाखवून आणा. ” मंजुळाने आपाला म्हटलं, “ आपा, बायूलाला आपण लाँचमधून कारवारला नेऊ या. ” त्याने नुसतं ‘ हूं ’ म्हटलं. “ उद्याच नेऊया, आपा. ” तो पुन्हा हुंकारला.

त्या दिवशी बायूल खूप रडली. प्रत्येक जण आपापल्या घरातून ते रडणं ऐकून भांबावून जायचा. मधेच ते रडणं माडांच्या चुडतांमधून आणि आंब्याच्या फांद्यांमधून वस्तीवर ओसंडून जात असल्यासारखं वाटायचं तर कधी ती किंचाळी तीव्रतेने कानावर आदळायची. आई नसलेली एक पोर आईच्या पान्ह्यासाठी रडते आणि आम्ही मुर्दाडासारखे ते रडणं मुकाट्याने ऐकतो. उद्या गणेशला सांगायला हवं, “ डोंगर पार करून नदी ओलांडून जा आणि तिला

कुठल्या तरी डॉक्टरला दाखवून आण. उगाच बलामत घेऊ नकोस डोक्यावर, तिची मेलेली आई गय करणार नाही तुझी.''

मधेच सुमित्राकाकी दारात येऊन उभी राहिली. तिने म्हटलं, ''पोरीला आईच्या पान्ह्याची गाठ आली असणार. कुणाचा तरी स्तन तोंडात दिल्यास ती नक्कीच रडायची थांबेल.''

''पण कुठून आणू स्तन?'' असा भाव चेहऱ्यावर घेऊन मंजुळाने तिच्याकडे पाहिलं. ''केशवकडे सुलोचना आली आहे माहेरपणाला, तिच्याकडे घेऊन जा.'' ती तशीच परत गेली. मंजुळा मोठ्या भक्तिभावाने तिच्याकडे पाहत राहिली. किती घरंदाज दिसायची ती! या वस्तीतल्या लोकांमध्ये ती वेगळीच वाटायची. उंच बांधा, गोरा गोरा वर्ण. कोणतीही साडी असली तरी अगदी स्वच्छ आणि नेसायची सुद्धा किती व्यवस्थित. घरातलं सगळं काम करायची पण नेहमीच टापटीप आणि टवटवीत. लोक म्हणत, ती एका मामलेदाराची मुलगी. पाच बहिणींतली शेवटची. तिचं लग्न व्हायच्या दोन वर्षं आधी वडील कुठल्या तरी भानगडीत सापडले आणि नोकरी गेली. आणि ही उंच, सुबक सुंदर मुलगी नरसिंहाच्या गळ्यात पडली. ती कुठंही, कसल्याही प्रसंगी गेल्यास बाजूला उभी राहून सगळं नीट निरीक्षण करायची आणि मग आपला सल्ला द्यायची. तिचा स्वच्छ आवाज आणि भाषा इतकी प्रभावी होती की लोकांना तिचं म्हणणं लगेच पटायचं.

''आपा, बायूलाला सुलोचनाकडे न्यायचं आपण?''

''मी नको ग, तू लीलाला घेऊन जा.''

मंजुळा काळोखातूनच लीलाच्या घरी पळाली.

केशवअण्णाचं घर वस्तीच्या अगदी दुसऱ्या टोकाला. मंजूळ आणि लीला बायूलाला घेऊन त्यांच्या घरी निघाल्या तेव्हा लोक जेवून झोपयची तयारी करीत होते. बायूलाचं पिरपिर रडणं चालू होतं. लीलाने तिला आपल्या खांद्यावर घेतली होती आणि ती रडू नये म्हणून तोंड दाबूनच ठेवलं होतं.

त्या दोघी जेव्हा केशवअण्णाच्या घरी पोचल्या तेव्हा घाबरूनच गेल्या. माजघरात मिट्ट अंधार होता. आतमध्ये सुलोचना बाळाशी लाडेलाडे काहीतरी बोलत होती आणि स्वतःच हसत होती. बंद दाराच्या फटीतून दिव्याच्या उजेडाची तिरीप दिसत होती. चिरक्या आवाजात मंजुळाने हाक मारली, ''सुलोचनाताई...''

सुलोचना आपल्या बाळाच्या कौतुकात मग्न. मधेच बायूल घुसमटल्यासारखी रडली. मंजुळाने पुन्हा हाक मारली, ''सुलोचनाताई.''

सुलोचनाने जरा वेळ कानोसा घेतला आणि "कोण ग?" म्हणत दार उघडलं. मागून केशवअण्णा, देवकीमावशी पण दारात आले. "काय ग मंजुळा, काय झालं?"

"सुलोचनाताई, बायूलाला जरा तुझं दूध पाजशील?"

क्षणभर सगळे गडबडलेच. लीलाने सांगितलं, "पोर कधीची रड रड रडते आहे. दूध मिळाल्यास जरा गप्प राहीलसं वाटतं."

केशवअण्णा म्हणाला, "पाज ग बाई, आई नसलेली पोर. जन्म देणाऱ्या आईपेक्षा दूध देणारी आई महान म्हणतात. तुझा मुलगा आयुष्यवंत होईल."

सुलोचनाने बायूलाला घेतलं आणि आत नेऊन सगळ्यासमोरच तिला पदराखाली घेतलं आणि ती पाजू लागली. ती चुरूचुरू स्तन ओढीत होती, मध्येच 'स्' करून श्वास घेत होती, मध्येच तृप्तीचा हुंकार देत होती. बाजूला उभ्या असलेल्या मंजुळाचं अंग एकदम शहारलं.

पिता पिता बायूल झोपली. सुलोचना म्हणाली, "उद्या रडली तर पुन्हा घेऊन या तिला; उगाच रडवू नका."

देवकीमावशी म्हणाली, "म्हशीचं दूध पण द्या तिला."

"या दिवसात तिला काहीच पचत नाही ग मावशी."

परत येताना लीला मंजुळाला सांगत होती, "या सुलोचनाला लग्नानंतर पाच-सहा वर्षं मूलच नव्हतं. नवऱ्याने त्रास द्यायला सुरुवात केली होती. तेच निमित्त घेऊन तो दुसरं लग्न करायला निघाला होता. मुलगीदेखील पाहिली होती म्हणे. पण तेवढ्यात हिला दिवस गेले आणि सुदैवानेच सुटली."

मंजूळ नुसतीच "हूं, हूं" करीत होती.

लीला मंजुळापेक्षा सहा-सात वर्षांनी मोठी तरी दोघींची खूप मैत्री होती. मुळात लीलाचा स्वभावच गोड. मंजुळाला ती खूप आवडायची. लीला बोलताना भिजल्या मुखाने बोलल्यासारखी तोंडभर बोलायची आणि शब्दागणिक डोळ्यांतून हसायची. दुस्वास करणारी तिची वहिनीसुद्धा जेव्हा तिची स्तुती करायची तेव्हा लोकांना लीलाबद्दल जास्तच आपुलकी वाटायची. तशी ती सुंदर वगैरे काहीच नव्हती. गोरीपान होती, पण त्या गोरेपणाला रेखीवपणा नसल्यामुळे ती पसरट आणि भसाडी दिसायची. पण गुण मात्र निवडून घ्यावेत असेच.

मध्यंतरी दोन दिवस बायूल बरी होती. तिसरे दिवशी रात्री तिचं पोट भात्यासारखं फुगलं. अचानक तिला आकडी मारून तिचं सगळं शरीर ताठ व्हायला लागलं. मंजुळा जोरात किंचाळली. साळूआजी कुठंतरी जवळपासच

असावी. ती त्वरेने आली आणि लागलीच एक मुळी उगाळून दिली. मुळीचा खरोखर उपयोग झाला असावा, बायूल थाऱ्यावर आल्यासारखी वाटली. पण तिचा ताप आता चढू लागला होता. तिच्या कपाळावर हात ठेवला आणि साळूआजी निक्षून म्हणाली, "आताच्या आता तिला डॉक्टरकडे न्यायला हवं. नाहीतर पोर हाती लागायची नाही."

वस्तीभर लोक अंगणात जमले. इथल्या प्रत्येक माणसाने तिला अंगा-खांद्यावर खेळवली होती, आपल्या घरी नेऊन नाचवली होती. महिन्याची असतानाच ती घराबाहेर पडून प्रत्येक घरी फिरली म्हटलं तरी चाललं असतं. पण अडाणी माणसं ती. आई नसलेली पोर म्हणून खूप लाड व्हायचे तिचे. पण तिचं पालनपोषण कोण आणि कसं करतं ते कुणीच बघत नव्हतं, लहान बाळाला वाटेल ते भरवलं तर पचत नाही, हगवण लागेत किंवा उलटी होते एवढंच त्यांना माहीत होतं.

आता तिला लगेच डॉक्टरकडे न्यायला हवी म्हटल्यावर तीन-चार लामणदिवे अंगणात आले. कुणीतरी गणेशला म्हटलं, "पोरीला नीट चादरीत गुंडाळून खांद्यावर घे. कारवारला जायला आता गाडी नाही की होडी. जवळच हळग्याला डॉक्टरकडे जाऊ या. नदी ओलांडली की हळगे आलंच."

विष्णू, खुशाली, सदाशिव बरोबर जायला निघाले. गोकुळमावशी म्हणाली, "कुणीतरी दोघेच जा ना, होडीत उगीच गर्दी कशाला?"

वेडा विठोबादेखील त्यांच्या बरोबर जायला बघत होता, मागे मागे करीत होता. कुणीतरी त्याला दम भरला, "तू आणखी नको जाऊस. उगाच हैराण करशील सगळ्यांना."

पण मंजुळा कशीच थांबत नव्हती. सगळ्यांनी समजावलं, "नको ग जाऊस तू. रात्रीची वेळ, कितीतरी चालावं लागेल, शिवाय नदी पार करावी लागेल." पण ती कशीच ऐकेना. लहान मुलासारखी मोठमोठ्याने "बायूल, बायूल ग." म्हणून रडत होती. आणि कुणी अडवत असणाऱ्याचा हात झटकत होती. बायूलाच्या जन्मापासून एक क्षणभरदेखील ती तिच्यापासून दूर झाली नव्हती. वस्तीतल्या कुणीही तिला उचलून आपल्या घरी नेली तर ती वेडीपिशी व्हायची. आणि लगेच तिला घेऊन यायची. लोक चेष्टेने म्हणायचे, "या आईची छाती दुधाने शिरशिरली आहे वाटतं." आणि आज तिच्या डोळ्यांसमोर ते बायूलाला चादरीत गुंडाळून लांब नेत होते.

पुरुष मंडळी फाटक ओलांडून वस्तीपलीकडे पोचलेही नसतील, मंजुळा "आपा रे" म्हणून किंकाळी फोडीत त्यांच्यामागे पळत सुटली. खुशालीने

म्हटलं, "येऊ दे रे, पोरीचा जीव राहणार नाही घरी."

आपाने बायूलाला खांद्यावर घेतली होती. तिच्या ज्वराचा अंग भाजणारा दाह जाणवत होता. वस्तीपासून नदीपर्यंतची सगळी शेतजमीन कसलेली होती. बारीक कडांवरून आणि ढेपळ्यातून चालावं लागत होतं. मधेच कुणाचा तरी तोल जायचा. पण गणेश मात्र बायूलाला संभाळून घेत अलगद चालत होता. मंजुळा अगदी त्याच्या पाठोपाठ चालत होती, मधेच 'बायूल' म्हणून हाक मारीत होती.

बाहेर तसा अगदीच काळोख नव्हता. दूरवर गडाच्या बाजूने अस्ताला गेलेल्या चंद्राचं अर्धवर्तुळ चमकत होतं. मध्येच ते धुरासारख्या ढगाआड शिरायचं नि पुन्हा बाहेर यायचं. डोक्यावरचं आकाश मात्र राखेच्या हाताने पुसून टाकल्यागत. अगदी मोकळं होतं, मधे मधे नुसतेच गढूळ, काळे पांढरे ढग पसरले होते.

दूर बांधावरच्या झाडीतून कुणीतरी रडल्यासारखा आवाज येत होता. एखादा पक्षी का कुणी माणूस किंचाळत होता नीटसं कळत नव्हतं. मधे मधे सारा परिसर भेदून तो आवाज यायचा आणि त्यासरशी मंजुळा घाबरून आपाला चिकाटायची.

मागे वस्तीतली एक आजी वारली होती. तिचा पाय खूप सुजला होता आणि त्याला जखम झाली होती. जमिनीला टेकल्यावर तो खूप दुखायचा. दर पावलागणिक ती "आई ग" म्हणून विव्हळत किंचाळायची. त्यातच ती मेली. मेल्यावर लोक म्हणायचे ती आता भूत होऊन त्या दुखऱ्या पायाने तशीच फिरते आणि "आई ग, आई ग" म्हणून ओरडत असते. आपण स्वतः ऐकलं आहे म्हणून बरेच जण खात्रीपूर्वक सांगायचे. मंजुळाला ते आठवत होतं आणि भीती वाटत होती.

मागून खुशाली आणि विष्णू चालत होते. ते मधे मधे काहीतरी बोलून तिला धीर देत होते, थांबून बायूलाला पण बघत होते.

तारीकडे पोचले तर अगदी ओहोटी. दोन्ही बाजूंनी तीस-चाळीस पावलं किनारा कोरडा पडलेला. नदीचा रोडावलेला प्रवाह राड्यातून जणू काळोख वाहतोय असं वाटत होतं. दूर दूरपर्यंत, झाडाझुडपांनी, डोंगर-दऱ्यांनी वेढलेली ही नदी आता काळोखात जणू एखाद्या रिक्त पोकळीत शिरायला चालली आहे असं वाटत होतं. घराच्या दारातून, चुडतांच्या आडोशातून नेहमी बघत असायचे ती सूर्यकिरणांनी चकाकणारी गडगंज नदी! आज या काळोखातलं, काळ्या कुजकट चिखलातलं त्याच नदीचं आकुंचित झालेलं भयानक रूप

बघून मंजुळा सैरभैर झाली. ती डोळे फाडून बघतच राहिली, त्यातच हरवून गेल्यासारखी, कावरीबावरी होऊन.

किनाऱ्यावर नाव नव्हती. नावाडीही नव्हता. तिथे जवळच पाग्यांची चार पाच घरं होती. गवताची ती एवढीशी उभी घरं, काळोखात गवताच्या गंज्यांसारखीच वाटत होती.

खुशालीने पुढे जाऊन हाक मारली, ''तारयामामा, आहेस का रे बाबा ?''

एका घरातून बाईचा आवाज आला, ''कुणाला तरी घेऊन पैलतिरी गेला होता. तिथेच झोपडीत झोपला वाटतं.''

मग खुशाली आणि विष्णू आळीपाळीने साद घालू लागले, ''तारया, ओ तारया.'' बऱ्याच वेळाने प्रतिसाद आला, ''ओऽऽ हुय.....'' आवाज काळ्या पोकळीत, लाटालाटातून फिरला.

पलीकडे जरा गडबड ऐकू आली आणि काळोखातली हालचालही. आवाज थांबला. नाव नदीत घुसवल्याचा, वल्ह्याचा 'घस्स घस्स' आवाज ऐकू यायला लागला.

नावाडी ऐलतीरी जवळ पोचल्यावर मोठमोठ्याने सांगत होता, ''कोण तरी अनोळखी माणूस, हत्तीएवढा एक लाल बैल घेऊन आला आणि आपल्याला पैलतीरी सोड म्हणाला. ओळख ना देख. कुणाचा बैल कुठून चोरून आणला असेल देव जाणे! उद्या माझ्यावर खापर!''

पुढे आल्यावर या लोकांना ओळखून तो म्हणाला, ''कोण, गणेशमामा का रे, काय झालं, कुणाला काय झालं ?''

''छोटी तापाने फणफणते आहे रे. डॉक्टरकडे नेतो आहोत.''

''छे छे'' करून नावाड्याने हळहळ व्यक्त केली आणि घाईघाईने त्यांना होडीत बसवलं. चिखलातून चालत जाऊन होडीत बसेपर्यंत पाय चिखलाने पूर्ण भरून गेले. ते पाण्यात जरा बुचकाळून सगळे तसेच होडीत बसले. एक वल्हं विष्णूने तर दुसरं नावाड्याने घेतलं. ते भरभर पाणी कापीत होते. वल्हवता वल्हवता नावाडी सांगत होता. मी तिकडे गेलो तो तिथंच राहिलो. भवरीचे तिघे चौघे जण येऊन बोलत बसले. सकाळी म्हणे उसाच्या घाण्यावर गुळाची काहील खाली उतरताना सुटून पडून एक जण भाजून होरपळला. दोन्ही पाय बेडकासारखे सुजले आहेत. दुपारच्या लाँचने त्याला कारवारला नेलं आहे.''

होडीतून उतरल्यावर तो म्हणाला, ''मी इथंच खोपटात झोपतो. परत आल्यावर मला उठवा. नीट जपून आणा पोरीला. डॉक्टरला म्हणावं मी सांगितलं आहे, देऊ तारीने. तोंडाने जरा वाईट आहे तो डॉक्टर, शिवराळ. पण मनाने

चांगला आहे. प्रत्येक जण आपण गरीब म्हणून सांगून त्याला फसवतात. त्याला सुद्धा पोट आहेच ना रे ? ''

ते नदीचा तीर ओलांडून वर आले आणि त्यांना खारगेचा शिवराम दिसला. बैलाला एका झाडाला बांधून तो खोपटासमोर बसला होता. आतल्या कंदिलाचा उजेड त्याच्या चेहऱ्यावर पडला होता. विष्णूने त्याला ओळखलं.

'' अरे, इकडे कुठं रे शिवराम ? ''

'' माजाळीला भांडीच्या जत्रेला गेलो होतो बैल आणायला. पैलतीरी पोचव म्हटलं तर नावाडी कसाच ऐकेना. ''

'' अरे, तू मिलट्रीत गेला होतास ना रे ? ''

'' पंधरा वर्षं सर्व्हिस करून आलो, आता पेन्शनवर. वाट्याला आलेली शेत-जमीन कसून खाईन आता. भावाने एक बैल दिला आहे. ''

मग विष्णूने नावाड्याला हाक मारली आणि म्हटलं, '' तारयामामा, हा खारग्याचा शिवराम. शिद्दरला आम्ही एकाच शाळेत शिकलो होतो, दळवी मास्तरकडे. ने त्याला पैलतीरी. बैल तरुण आहे, दाव्याला धरला तर सहज पोहून जाईल. ''

ते डॉक्टरच्या घरापर्यंत पोचले तेव्हा अगदी मध्यरात्र झाली होती. खिडकीतून पाहिलं तर आत वात बारीक केलेला एक कंदील पेटत होता आणि खाटेवर झोपलेला डॉक्टर जोरजोरात घोरत होता.

पण यांना कुणाला डॉक्टरला उठवायचा धीर होत नव्हता. एकीकडे बायूलच्या काळजीने सगळे हैराण झाले होते. पण उठवायला कुणी धजत नव्हतं.

रस्त्यावरून कुणीतरी गडबड करीत चालला होता. यांना पाहून तो दवाखान्याच्या दारात आला. वस्सकन् दारूचा भपकारा पसरला. मोठमोठ्याने ओरडत हाका मारत त्याने डॉक्टरला उठवलं.

'' डॉक्टर, लोक मरताहेत इथं. हळगे, हुळगे, शिद्दर, किन्नर कुठून कुठून नदी पार करून लोक येतात आणि तू घोरत पडला आहेस ? ''

'' कोण रे तो आई xxx '' म्हणत डॉक्टर उठला. कंदिलाची वात मोठी केली. एकदम खूप उजेड पडला. डॉक्टरच्या अंगावर मळलेला, भोकं पडलेला गंजिफ्रॉक होता आणि गुडघ्याखाली पोचणारी खाकी हाफ पँट. सदा सर्वकाळ त्याच्या अंगावर हेच कपडे असायचे. कुठं बाहेर जायचं असल्यास त्याच्यावरच एक पैरण लटकावून जायचा.

तो उठला आणि हातात एक छडी घेऊन बाहेर आला. '' रॉकी, जातोस

का नाही तू इथनं? परवाच एक छडी बसली होती ना तुझ्यावर?''

रॉकी बाहेर गेला आणि ''सालाझार मुर्दाबाद, सालाझार मुर्दाबाद'' म्हणत चालायला लागला. लांब गेला आणि रडल्यासारखं काहीतरी बरळू लागला.

डॉक्टर व्हरांड्यात येऊन काही वेळ उभा राहिला. स्वतःशीच बोलत असल्यासारखा म्हणाला, ''बायको माहेरी म्हणून गोव्याला गेली होती, सहा महिने झाले. ती गेली आणि गोवा एकदम बंद झाला. माशी फिरकत नाही, कुणी विचारपूस करीत नाही. हा वेड्यासारखा फिरतोय इकडे. चांगला खाणीतून चिरे काढायचा. आता सगळंच सोडून दिलं आहे.''

मग एकदम जाग आल्यासारखा मागे फिरला.

''मेल्यांना वेळ काळ काही नाही. उठले की आले. चांगले खाऊन पिऊन मरा, आजारी नाही पडणार. दोन भाताची शितं आणि एक माशाचा काटा. याच्या शिवाय कुणी काही खाल्लं आहे का कधी?''

''डॉक्टर, मूल खूपच आजारी आहे.''

''काय झालं आहे?'' म्हणत डॉक्टरने पुढे येऊन गणेशच्या खांद्यावरून मूल उचललं आणि आपल्या खांद्यावर घेऊन आत गेला. आपण झोपलेल्या खाटेवर तिला घालून बॅटरीच्या उजेडाने तपासायला सुरुवात केली. ही सर्व मंडळी खिडकीतच गर्दी करून उभी होती, डोळ्यांत प्राण आणून बायूलाला बघत होती.

तपासत असताना डॉक्टर बडबडत होता, ''दैना करून टाकली आहे दैना. तुमच्यापेक्षा नांगराला बांधायचे बैल बरे. मरायला टेकल्यावर इथं घेऊन येता, डॉक्टरवर बलामत घालायला. आता डॉक्टरने काय तुळशीपत्र घेऊन पाणी सोडावं लवकर मरा म्हणून?''

विष्णूने म्हटलं, ''आई नसलेली पोर, साहेब.''

डॉक्टरने जरा वेळ त्याच्याकडे बघितलं आणि मुकाट्यानेच तपासायला सुरुवात केली. ''पोटाचा कचका जंतांनी भरला आहे. अंगावरचं दूध पिणाऱ्या मुलांना सहसा जंत होत नाहीत.''

मग त्याने बायूलाला कसलं तरी औषध पाजलं आणि एक सुई टोचली. सुई टोचताच ती किंचाळली. ते ऐकून मंजुळा रडायलाच लागली. खुशालीने तिला दम भरला आणि गप्प बसायला सांगितलं.

डॉक्टरने बायूलाला आणून गणेशकडे दिली. त्याने तिला चादरीमध्ये गुंडाळून खांद्यावर घेतली. मग डॉक्टरने तीन गोळ्या कागदात बांधून दिल्या,

बाटलीतून थोडं लाल औषध दिलं आणि गणेशच्या पाठीवर हात ठेवून प्रेमळ शब्दात तो म्हणाला, "फुलासारख्या पोरीची दैना झाली आहे. सतत तीन रात्री या गोळ्या दे. जंत गेले की सुधारेल ती. खाऊ-पिऊ घाल चांगलं. म्हशीचं दूध, पेज आणि रोज एक केळं."

भक्तिभावाने आणि कृतज्ञतेने गणेशने मान डोलावली.

"कुठून आलात रे तुम्ही?"

"शिद्दरहून"

"जायला तार आहे ना?"

"सांगून आलो आहोत."

"पोरीला संभाळा. जरूर लागल्यास परत घेऊन या."

मधेच खुशालीने विचारलं, "डॉक्टर, घरात एकटेच? बायको, मुलं...?"

डॉक्टर वस्सकन ओरडला, "कोण राहणार तुमच्या या दरिद्री गावात?"

तो आत गेला. सगळे बाहेर येऊन वाट चालू लागले. विष्णूने म्हटलं, "अरे, खुशाली, तू का म्हणून त्याच्या बायकोविषयी विचारलंस? माहीत नाही का तुला, आठदहा वर्षं झाली. आपण या खेडवळ वातावरणात राहणार नाही म्हणून बायको सोडून गेली."

"नाही रे बाबा, मला माहीत नव्हतं." असं म्हणत खुशालीने दोन्ही गालांवर मारून घेतलं. जरा पुढं गेल्यावर त्यांच्या एकदम लक्षात आलं, "डॉक्टरची फी दिलीच नाही." हो की रे, चला देऊन येऊ."

सगळे जण माघारी फिरले. पुन्हा खिडकीजवळ येऊन पाहिलं तर डॉक्टर मघासारखाच गाढ झोपला आहे आणि डाराडूर घोरतो आहे. मग आता काय करावं? विष्णूने म्हटलं, "आणखी नका उठवू त्याला आता. आठ दिवसांनी मी म्हारीच्या जत्रेला येणारच आहे, तेव्हा देईन."

आता ते पावलं झपझप टाकीत चालू लागले. मघाची काळजी, ताण आता कमी झाला होता. विष्णू मध्येच मंजुळाला चिडवतही होता.

"आता तो तारयामामा तुला होडीत घेईलच याची खात्री नाही बघ."

"का बरं?"

"अग तो एवढा मोठा बैल होडीत असणार ना."

"तू उगाच काहीतरी सांगतोस ना?"

"तू असं कर, बैलाची शेपटी पकड आणि नदीत उडी मार. काही झालं तरी शेपटी मुळीच सोडू नकोस."

“ खोटं सांगतोस तू. ”

मधेच जरासं सैलावून गणेश म्हणाला, “ ताप उतरू लागला हं... ”

ते चालतच होते. खुशाली म्हणाला, “ रात्रीचं आपण ऐलतीरीच राहू. माझी मावशी आहे, वाटेत. भवरीला तिचं घर आहे. ”

“ नको, वस्तीतले लोक काळजी करीत, वाट बघत असतील ना ? ”

ते नदीकाठी पोचले तेव्हा मघाचा तो बैल आणि त्याचा मालक कधीच नदी पार करून गेले होते. तारयामामा होडी किनाऱ्याला लावून आत आडवा झाला होता. सगळीकडून परिसर अगदी शांत होता. ती काळी होडी, आत काळी घोंगडी पांघरून झोपलेला तारयामामा, काळ्या नदीचा काळा प्रवाह... सगळं बघताना काही क्षण मंजुळा त्यातच हरवल्यासारखी झाली. पण तारयामामाला उठवल्यावर त्याने मोठमोठ्याने बोलून, गोष्टी सांगून सगळ्या परिसराला जाग आणली. मंजुळाला हायसं वाटलं.

होडीतून उतरल्यावर खुशाली म्हणाला, “ तारयामामा, तू या वर्षीचं वस्तीवरच्या लोकांकडून खंडिताचं भात अजून नेलं नाहीस की रे ? ”

“ येतो, येतो, एक दिवस दुपारीच येतो. तुम्हा लोकांनी शेर-पासरी दिल्यावरच आमचं पोट भरेल ना ? ”

ते घरी पोचले तेव्हा रात्रीचा एक वाजून गेला असावा !

वस्तीवरचे बरेच लोक जवळ दिवा ठेवून माजघरात, अंगणात वगैरे बसले होते. फाटकाशी यांची चाहूल लागताच सगळे अंगणात गोळा झाले. “ काय झालं ? डॉक्टर काय म्हणाला ? ”

विष्णूने मोठ्या आवाजात सांगितलं, “ बरी आहे ती आता. होईल बरी. जंतांचा त्रास होता म्हणे. आता औषध वगैरे दिलं आहे. ”

“ ताप नाही ना ? ”

“ वाटेतच ताप उतरला. ”

घरात जाताना मंजुळाने जमलेल्या लोकांकडे एकवार पाहिलं. त्यात, मागे एकदा शेताजवळ आपाकडे कडाक्याचं भांडण करणारा सदाशिवअण्णासुद्धा होता.

आपाने बायूलाला नेऊन खोलीत झोपवली. मंजुळाला पण झोप अनावर झाली होती. तिच्याजवळच चटई टाकून क्षणार्धात ती गाढ झोपून गेली.

भाताच्या मडकीतलं एक शीत काढून मंजुळाने दाबून पाहिलं, भात शिजला होता. तो वेळण्यासाठी आपाला बोलवावं म्हणून ती माजघरात आली.

आपा तासणी घेऊन नांगरासाठी लाकूड ताशीत होता. मंजुळा आत आली आणि तिने स्वतःच पंचा हातात घेऊन भाताची मडकी खाली उतरवली. ती वेळण्यासाठी वाकडी करताना हातातून निसटली आणि खाली पडली. मडकी फुटून ठिकऱ्या झाल्या. भात आणि पाणी सांडून जमिनीवर पसरलं. थोडं गरम पाणी तिच्या पायावरही पडलं आणि पायाची आग आग व्हायला लागली. तरी ती गप्प राहिली. आता आपा आत आला तर मला ठेवणार नाही. ती घाबरून गेली. किती चांगली मडकी फोडली मी!

आत काहीतरी पडल्याचा, फुटल्याचा आवाज गणेशला ऐकू आला होता. त्याने विचारलं, "काय झालं ग?" मंजुळा गप्पच राहिली.

"काही फुटलं का ग आत?" आवाज नव्हता. ती घाबरून गप्प.

गणेश लगबगीने आत आला. वेळणीजवळ भाताची मडकी फुटून पडली होती. पाणी सांडलं होतं आणि त्यातून गरम वाफ येत होती. "किती वेळा मी सांगितलं तुला, चुलीवरच्या मडकीला तू हात घालू नकोस म्हणून. पण तू ऐकत नाहीस." मग त्याने प्रेमळ आवाजात विचारलं, "बाळ, अंगावर वगैरे पाणी नाही ना ग पडलं तुझ्या?"

"नाही आपा." तिने पाय लपवला.

त्याने त्या सगळ्या ठिकऱ्या गोळा करून बाहेर नेल्या. तो भात वाडग्यात भरून ठेव. मग बैलांच्या पुढ्यात ठेवता येईल."

बाहेर जाताना तो स्वतःशीच पुटपुटत होता, "तुमची आई आपल्याला इथं त्रासात टाकून आपण सुखाने उठून गेली. लोक म्हणतात, तिला अहेवपणी मरण आलं. आम्हाला मात्र दगदग." त्याने घरभर एक नजर टाकली, घराला काही घरपण उरलं नव्हतं. बुटला, चोबे, सूप, दावे, दोरी कुठलीही वस्तू धड जागेवर नव्हती. पायाखालच्या जमिनीचे पोफडे निघाले होते. सारवणं-लिपणं कितीतरी दिवसात काहीच झालं नव्हतं. "नवरा जाऊन बाई राहिली तर चालेल, पण बायको जाऊन पुरुष कधीच राहू नये रे, देवा! विधुराचं जिणं कस्पटाहूनही कमी!"

रात्री आडवा झाल्यावर गणेशला एकदम आठवलं, मघाशी मडकी फुटली तेव्हा मंजुळाचा पाय पाहिलाच नव्हता. लंगडत होती का? पायावर भाताचं पाणी वगैरे पडलं नव्हतं ना?

तो उठला आणि चिमणीचा दिवा घेऊन आत गेला. मंजूळ जागीच असावी. उजवा पाय पुनः पुन्हा झटकत होती. गणेशने जवळ जाऊन दिव्याच्या उजेडात नीट पाहिलं. उजव्या पायाचं पाऊल भाजून लाल झालं होतं आणि

त्यावर बेदाण्याएवढे फोड उठले होते. मुकाट्याने अश्रू ढाळीत तो काही वेळ तसाच पायाकडे बघत राहिला. मग गेला आणि सहाणीवर गंध उगाळलं. तशीच सहाण हातात घेऊन तो तिच्याजवळ गेला आणि थोड्या थोड्या गंधाचा लेप पायावर लावू लागला. “खूप आग आग होते का ग बाळे?”

ती रडल्यासारखी हुंकारली.

“मघाशीच सांगायचं नाहीस का ग पोरी?”

तिने पुन्हा नुसतंच ‘हूं’ म्हटलं. तिला कुशीत घेऊन खूप रडावंसं वाटलं त्याला.

तेवढ्यात त्याची नजर कुशीत गाढ झोपलेल्या आठ-नऊ महिन्यांच्या बायूलावर गेली. जगाच्या साऱ्या कटकटींपासून मुक्त अशी ती गाढ झोपली होती. गणेशने मनात म्हटलं, “हिचं बरं आहे, मंजुळाच्या रूपाने हिला आई लाभली आहे. मी आणि मंजुळा मात्र पुरते अनाथ झालो आहोत!”

यशवंत भास्करच्या घरावरनं कुंतरी जायला निघाला होता. गणेश नवीनच आणलेल्या घोंगडीच्या दशा वळत बसला होता. “बघ, कसा तोंड चुकवून मुद्दाम लांबच्या वाटेने चालला आहे. मागे तर दोघंही नवरा-बायको येऊन लग्न करच म्हणून मागे लागली होती!” तरी पण त्याने हाक मारलीच. “अरे, यशवंत कुठे चाललास? ये ना इकडे जरा!”

यशवंत येऊन मुकाट्यानेच गणेशजवळ बसला. गणेशने तिरक्या नजरेने त्याच्याकडे पाहिलं, चेहऱ्यावर कोणतीही उत्सुकता नव्हती. उगाच नजर चुकवीत होता, आवाजातही मोकळेपणा नव्हता. उगाचच नांगर, ऊस वगैरे विषयावर इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्या.

“गणेश, समोरच्या पाख्याचे ओढ अगदीच पोखरले आहेत. दुसरे घाल नाहीतर कधीपण मोडून पडतील.”

“पडू दे. इथं सगळंच मोडकळीला आलं आहे, आढ्याचं कुणाला पडलं आहे?”

यशवंत उठला. त्याने त्या आढ्यावर दोनदा धप्प धप्प हात मारला. त्यातून मोहरीसारखी अंडी सरसर खाली पडली.

“पाहिलंस?”

गणेश चिडला. “यशवंत, येऊन बस बघू तू!”

यशवंत येऊन बसला. जरासं खाकरून आवाज सैल केला.

“आजकालच्या या पोरी. स्वतः दिसायला यथातथाच. पण यांना नवरे

मात्र नोकरीवाले शिपाई हवेत. ''

"तू पुन्हा गेला होतास, यशवंत ? ''

"अबोल्याने तीन खेपा टाकल्या पण त्यांचं आपलंच म्हणणं. ''

"काय म्हणतात ? ''

"दोन्ही मुलीच आहे म्हणतात. शिवाय तेवढीशी ऐपतही नाही म्हणतात. ''

गणेश तडकला. "ऐपत नाही होय ? स्वतःचं सात खंडीचं शेत लावतो मी, दुसऱ्यांच्या शेतात जाऊन पोट नाही भरत मी. माझ्या दारातले हे दहा बारा माड एखादं घर सहज पोसतील. ''

"अलीकडे शेतीला विचारतंय कोण, गणेश ? शेत असल्यावर तिथं राबायला हवं. उन्हा-पावसात होरपळायला –भिजायला हवं. हल्लीच्या मुलींना चाकरमान्याबरोबर जाऊन अलगद बसून खायला हवं. ''

मग थोडा वेळ दोघेही गप्पच बसले.

"मुलगी बरी आहे का रे, यशवंत ? ''

"आहे, बांध्याने घट्टमुट्ट आहे पण काळी. अनसूयावैनीच्या नखाची सर नाही. ''

"चालली असती. घरदार तरी सांभाळलं असतं. या दोघीही अजाण पोरी पुढेमागे त्यांना आधार हवा. मी काय काय म्हणून करणार ? ''

यशवंत काहीच बोलला नाही.

गणेश मध्येच तणतणला. "म्हणे दोन्ही मुलीच आहेत ! आता मी काय त्यांना नेऊन समुद्रात बुडवू ? सगळे तिची तारीफ करतात. प्रेमळ गुणांची लक्ष्मी म्हणतात. पण दोन मुली माझ्या पदरी घालून आपण सुखाने उठून गेली ! आता माझ्या जिवाला घोर. ह्या मुली नसत्या तर ऐन भरतीच्या वेळी जाऊन काळ्या नदीत जीव दिला असता. ''

यशवंतला आपलं बोलणंच खुंटल्यासारखं वाटलं. "येतो रे'' म्हणून तो जायला निघाला.

"सून महिना जवळ आलाय, यशवंत, 'धालां'च्या मांडवातला शिवशंभू बांधव तू. ह्या वर्षी मांड पडणार आहे ना रे ? ''

"देव यायचा म्हटल्यावर थांबतो का ? घरातून बोलावून नेईल. पण तुला सांगतो, गणेश, अनसूयावैनी मांडावर आली की तिथलं पावित्र्य आणि शोभा न्यारीच असायची. चक्रायवंत बहीण ती आमची. या वर्षी चक्रायवंत कुणाच्या कुडीवर येते पाहायचं ! ''

सून (पौष) महिना सुरू झाला. या महिन्यात इकडच्या परिसरातला सगळा व्यवहार ठप्प होऊन जातो म्हटलं तरी चालेल. या महिन्यात झाड-झुडूप लावायचं नसतं, घराचा पाया घालायचा नसतो, सोयरीक-संबंधाविषयी बोलायचं नसतं. असा वाडवडिलांचा दंडक असतो. या महिन्याला काहीजण 'सून' महिना म्हणतात. कारण या दिवसांत सुनांना कामातून फुरसत मिळते. धान्य-गवत मळून झालेलं असतं, ओली शेतं जोत बांधायची वाट बघत असतात; पुरुष मंडळी सैलावून शेकोटीजवळ, उन्हात किंवा अंगणातल्या मांडवात चकाट्या पिटत बसलेले असतात. बायका मात्र या दिवसांत 'धालो' खेळतात. नाहीतर माहेरी जातात.

शिद्दरच्या या खालच्या वस्तीत गेली चार वर्षं 'धालो' पूजतात. नेमाने चार वर्षं 'धालो' खेळतात आणि 'मांड' पडतो. एकदा पूजलेला मांड सात वर्षं व्हायच्या आधी बंद करायचा नाही असा दंडक असतो.

वस्तीच्या पूर्व दिशेला मोकळ्या शेतात एक मांडव घातला होता. 'मांड' सारवून स्वच्छ केला होता. मधे एक तुळस. या तुळशीभोवती कोंडाळं करून त्या देवसभेतल्या एकवीस रंभा 'कुदत' आणि देवाला आळवीत.

रात्र पडल्यावर एक गॅसबत्ती पेटवून मेढीला लोंबकळवून ठेवीत. बत्तीच्या उजेडात बायका धालो खेळत; तऱ्हेतऱ्हेची गाणी म्हणत. गाणं तालावर आलं की ढोल वाजे, क्षणाक्षणाला ढोलाचा जोर वाढे. मग एकेक बाई गायचं सोडून कुदायला लागायची, कुदत कुदत मांडाकडे यायची, आपलं नाव, ओळख सांगायची. कोण तुळसायवंती, कोण नागायवंती, कोण चक्रायवंती, कोण माणकायवंती. सगळ्या एकवीस बहिणी. सगळ्यात मोठी तुळसायवंती नि सगळ्यात धाकटी माणकायवंती. याशिवाय दोघे भाऊ - पुंडलिक बांधव आणि शिवशंभू बांधव. एक मांडाचा धनी, एक राखणदार. मांडावर कुणी भुतंखेतं येऊ नये म्हणून त्याने राखण करायची. अंगात अवसर आला की तो "शोऽऽशोऽऽ" करून कुदत धावतो आणि परत परत मांडाच्या सीमा बघतो. मांडाला प्रदक्षिणा घालतो.

आणि 'नागबाळ' म्हणून एका लहान मुलाच्या अंगात अवसर येतो. तो नागासारखा सरपटत, सरपटत मांडाला प्रदक्षिणा घालतो. मांड संपेपर्यंत त्याचं हे चालूच असतं. असं सांगतात की एकदा नागायवंतीचं सौंदर्य बघून एक नाग मागे लागला. नागायवंती पळता पळता चक्कर येऊन पडली. नागाने तिच्या सर्वांगाला वेटोळं घातलं आणि तिला कवटाळून आपल्या अंगावर घेतलं. बाकीच्या वीसही बहिणी आक्रोश करू लागल्या. काही वेळाने नागाने तिला

सोडलं पण सोडायच्या आधी तिच्या तोंडात आपलं विष सोडलं. त्या विषापासून 'नागबाळ' जन्माला आला.

या नागबाळावर जन्मल्यापासून तिने नजरसुद्धा टाकली नाही. त्याचं पालन इतर बहिणींनी मोठ्या मायाममतेने केलं. आतासुद्धा नागबाळ यायला जरा उशीर झाला तर या बहिणी आक्रोश करतात पण नागायवंती मात्र गप्प असते. कितीही गोरापान मुलगा असला तरी एकदा का त्याच्या अंगात नागबाळाचा अवसर आला की तो काळा-निळा होतो म्हणतात.

मांडाजवळ बत्ती पेटली होती. कुणीतरी हळूहळू ढोल वाजवीत होतं. अजून बायका न्हाऊन धुऊन आलेल्या नव्हत्या, गाणी सुरू झाली नव्हती. गणेशच्या दारातून बत्तीचा उजेड दिसत होता. अमावास्येचा काळोख कापीत बत्तीच्या उजेडाची तिरीप माजघरात बसलेल्या गणेशच्या डोळ्यांवर पडत होती. दाराबाहेरचा तो गडद अंधार आणि पलीकडे ते क्षीण किरण. यांच्यामध्ये नुसती भुतं नाचताहेत असं त्याला वाटत होतं. या वर्षी अनू मांडावर नसणार, तिची गाणी ऐकू नाही येणार!

मंजुळाला धालांचा मांड पाहायची खूप उत्सुकता होती. आज तिने आपाला लवकर वाढलं, आपणही जेवून घेतलं. पण सुमन कशीच झोपेना, उगाच कुसकुसत होती. आपानेच विचारलं, "मांडावर जातेस का बाळ? आण, बायूलाला इकडे माझ्याजवळ आणून घाल. मी थोपटतो तिला."

तिने बायूलाला नेऊन माजघरात आपाजवळ घातली. आतून चिमणी आणून ती बाहेर ठेवली. अंगणात आली आणि ती मांडाच्या दिशेने पळत सुटली. मागून आपा सांगत होता, "अग चादर तरी ने जाताना, थंडी आहे बाहेर. आणि उगाच मांडावर खेळायला वगैरे जाऊ नकोस, लहान आहेस तू अजून."

मांडाभोवती बरेच लोक जमले होते, डोक्यावरून चादर, कांबळ वगैरे घेऊन बसले होते. त्यात मुलंही घुसली होती. चारी बाजूंनी अमावास्येचा अंधार आणि मधेच मांडवाचा उजेड. त्यात गाण्यासाठी बायका उभ्या राहिलेल्या, हळूहळू वाजणारा ढोल, त्यामुळं त्या मांडाला देवसभेचं स्वरूप आलं होतं. मंजुळा लोकांमध्ये कुठल्या तरी आवशी-मावशीच्या उबेला बसली होती. आपा म्हणत होता, चादर ने म्हणून. आणायला हवी होती असं तिला वाटलं.

आता बायकांनी गाणी सुरू केली. आंब्यांच्या फांद्यातून, माडांच्या झावळांतून निघून ती गणेशच्या कानावर येऊन पडत होती. अनसूया किती छान, गोड गायची घणघणीत पण गोड आवाज. सगळ्यात वरच्या पट्टीत.

मध चाखत राहिल्यासारखं वाटायचं. इथं बसूनसुद्धा तिचा आवाज मी नेमका ओळखत असे.

मांडावरच्या गाण्यांना आता हळूहळू वेग, लय, ताल येऊ लागला. आधी अठरा गावच्या अठरा बायका एकत्र येतात. ते गाणं....

*कोण कोण गावच्या नारी गे तुम्ही*
*कोण कोण गावच्या नारी।*
*आम्ही माजाळे गावच्या नारी गे*
*आम्ही माजाळे गावच्या नारी गे*
*तुम्ही कशावर बसून आला ग*
*तुम्ही कशावर बसून आला।*
*आम्ही रथावर बसून आलो ग*
*आम्ही रथावर बसून आलो ग।*
*तुम्ही कोण कोण गावच्या नारी गे*
*तुम्ही कोण कोण गावच्या नारी।*
*आम्ही खारगे गावच्या नारी गे*
*आम्ही खारगे गावच्या नारी।*
*कशावर बसून आला ग*
*तुम्ही कशावर बसून आला।*
*आम्ही घोड्यावर बसून आलो ग*
*आम्ही घोड्यावर बसून आलो।...*

अशा तऱ्हेने बायका भोवतालच्या सगळ्या गावांची नावे गुंफतात. त्या त्या गावच्या लेकी आपल्या माहेरचं नाव घ्यायला मोठ्या उमेदीने पुढे येतात.

गणेश कान देऊन ऐकत होता. बायकोच्या आठवणीने तो वेडापिसा झाला. रडायचाच काय तो बाकी होता!

मग बायका गावातल्या सगळ्या देवांना नमन करतात –

*रान मारू रान मारू फळसाचे गे फळसाचे*
*रामनाथ देवा देऊळ बांधू कळसाचे गे कळसाचे।*
*रान मारू रान मारू आंब्याचे गे आंब्याचे*
*सातेरी देवी देऊळ बांधू खांब्याचे गे खांब्याचे।*
*रान मारू रान मारू किनळेचे गे किनळेचे*
*महादेवा देऊळ बांधू माळयेचे गे माळयेचे।*

*साडेतीनशे दाणयो रथा तुज्यो घुड्यो*
*रथात कोण देव बसे गे, रथात कोण देव बसे।*
*रथात बसे नाराण देव*
*देवात देव तो सोबे गे, देवात देव सोबे।*
*साडेतीनशे दाणयो रथा तुज्यो घुड्यो*
*रथात कोण देव बसे गे, रथात कोण देव बसे।*
*रथात बसे नरसिंह देव*
*देवात देव तो सोबे गे, देवात देव सोबे।...*

आता धालांच्या वाजण्याला जोर चढला. देवाला नमन घालता घालता त्या कुदायला लागल्या आणि ''शोऽऽ शोऽऽ'' करीत तुळशीजवळ धाव घेऊ लागल्या, देवता, मल्लिकार्जुन, निरंकार, क्षेत्रपाळ वगैरे देवांना नमन होईपर्यंत सगळ्या बहिणी, बाजूला बसलेल्या पुरुषांमधून दोघे भाऊ मांडाचे धनी कुदत मांडावर आले. मांडाचा धनी मोठ्याने गर्जना करीत मांडाभोवती फेऱ्या मारतो. नागबाळ साष्टांग, जमिनीवर सरपटून फेऱ्या मारतो.

अजून चक्रायवंती पोचलेली नव्हती. सगळ्या बहिणी मोठमोठ्याने आक्रंदून तिला साद घालीत होत्या....

*चक्रायवंती बहिणी गे।*
*कुठे नि का बहिणी गेली गे।*
*झडकरी, लवकरी येई गे।*
*फुलांची आमची बहीण गे।*
*मायेची आमची बहीण गे।*
*रानी नि वनी हरवली गे।*
*चक्रायवंती बहिणी गे।*
*चक्र तुझे सोडी गे।*
*ढगातून उडून ये गे।*
*समुद्र डोंगर तुडवून ये गे।*
*झडकरी लवकरी ये गे।*
*शोऽ शोऽ शोऽऽ*

पुंडलिक आणि शिवशंभू बांधव तिला शोधायला धावल्यासारखे मांडाला जोरात फेऱ्या घालीत होते आणि बहिणींना धीर देत होते.

*ब्रह्म्याची तिला राखण गे।*
*इंद्राची तिला राखण गे।*
*देवतेची तिला राखण गे।*
*काळजी तिची सोडा गे।*
*शोऽ शोऽऽ शोऽऽ*

मांडाच्या धन्याची तऱ्हा जरा वेगळीच होती. अंगात आल्यासारखा तो शोऽऽ शोऽऽ करीत धावत होता आणि मोठ्याने ओरडून म्हणत होता –

*तेत्तीस कोटी देवा गा।*
*बाळक माझे कुठे गा।*
*माझ्या मांडीवर आणा गा।*
*शोऽ शोऽऽ शोऽऽ*

इज्जायवंती जगावर वीज टाकायला गेल्यासारखी मांड सोडून क्रोधाने तांडव करीत होती. नागायवंती नागिणीसारखी शरीराला विळखे देत हाताचा फडा करून गिरक्या घेत होती. माणकायवंती उगाचच रडल्यासारखी देवाचा धावा करीत होती. ओवळायवंती, कांदळायवंती आपापल्या परीने बहिणीला साद घालीत होत्या.

अचानक मांडाच्या उजव्या बाजूला बसलेल्या लोकांमधून हालचाल दिसू लागली. गडबड झाली, " बाजूला सरका, वाट द्या... " ढोल वाजवणारे जोरजोरात ढोल बडवू लागले मंजूळ बसल्या ठिकाणी अंगात येऊन कुदू लागली. ती शोऽ शोऽऽ शोऽऽ करीत होती, डोकं हलवीत कुदत होती. थोड्या वेळाने ती तशीच कुदत मांडावर आली. दोन्ही हात आणि डोकं चक्राकार फिरवीत ती कुदत होती. अकरा-बारा वर्षांची एक सडपातळ पोरगी ती पण आज अंगात अवसर आल्यावर तिची रया, तऱ्हा, ऐट, पार बदलून गेली. पटाईत बंटीण असल्यासारखी ती कुदत होती. ती मांडावर आल्यावर मांडाच्या धन्याने तुळशीजवळचा तांब्या उचलून तिच्यावर पाणी शिंपडलं. अचानक तिला कंठ फुटला. खणखणीत आवाजात तिने आपली ओळख सांगितली –

*तुळसायवंती बहिणी गे।*
*चक्रायवंती तुझी बहिणी गे।*
*नमन तुला आधी गे।*
*कुडीच्या शोधात फिरले गे।*

*आकाश धरती धुंडली गे।*
*शोऽ शोऽऽ शोऽऽ*

मग चक्रायवंती गावातल्या अठरा देवांना नमन करू लागली. हात तसेच चक्राकार फिरवीत –

*रामनाथा देवा तुला दंडवत शोऽ दंडवत शोऽ*
*मलकार्जुना देवा तुला दंडवत शोऽ दंडवत शोऽ*
*नरसिवा देवा तुला दंडवत शोऽ दंडवत शोऽ*
*म्हादेवा देवा तुला दंडवत शोऽ दंडवत शोऽ*

गणेश मांडावरची गाणी, आळवणी ऐकत माजघरात बसला होता. समोरचा दिवा कधीच विझला होता. मांडावरच्या उजेडात एक सोहळा चालला होता. उजेडाच्या किरणांवर स्वार होऊन गाण्याचे सूर येऊन कानांवर पडत होते. केशवने अंगणात येऊन त्याला सांगितलं की, चक्रायवंतीचा अवसर मंजुळाच्या अंगात आला आहे. गणेशने पुन्हा दिवा पेटवला आणि थोडा वेळ तो तसाच गप्प राहिला. मग म्हणाला, ''चक्रायवंतीला आधी आईची कूड हवी होती, आता लेकीची. कडक अवसर तो.''

''हो, चक्रायवंती आणि नागायवंती - कडक म्हणतात.''

गणेशने समोरचा दिवा उचलीत म्हटलं, ''केशव, जरा इथं बैस. छोटी झोपली आहे.''

''तू कुठे चाललास, गणेशबाब ?''

''इंद्रसभेतील रंभा ती. घरी आल्यावर तिला फुलं माळायची असतात. मी जरा फुलं तोडून आणतो. तिच्या आईला या दिवसात मांड संपेपर्यंत ढीगभर फुलं लागायची.''

तीन-चार वर्षांची होईपर्यंत सुमन रोगट आणि हडकुळी होती. पोटाचा नगारा तेवढा दिसायचा. छातीवरची कातडी बरगड्यांना चिकटली होती आणि मानेत तर जीवच नव्हता. गोरा रंग दुधासारखा फिकट दिसत होता. आणि ती कधी आजारी पडेल याचा नेम नसायचा. मंजूळ नेहमी त्याच काळजीत असायची. आईची माया मिळाली नाही म्हणून तिची अशी गत झाली असं मुळीच म्हणता आलं नसतं. मंजूळ फक्त आईचा स्तन तेवढा तिच्या तोंडात देऊ शकत नव्हती. पण आईची सगळी माया ममता, वात्सल्य ती तिला देत होती. नऊ-दहा महिन्यांची असल्यापासूनच सुमनने मंजुळामधील मातृत्व

जागवलं होतं. मुळातच तिच्यातलं मातृत्व इतकं प्रखर होतं की आईचं एक विश्वरूप सुमनसमोर उभं होतं. आता या बाबतीत आपाची तिला हवी तशी मदत मिळाली असंही म्हणता आलं नसतं. बायको गेल्यावर त्याचं काळीज विदीर्ण झालं. त्याला जो तडा गेला तो पुन्हा सांधलाच नाही. आधीच तो आतून जरा हट्टी माणूस, सुमनला दोषी ठरवून त्याने तिच्यावरच राग धरला होता.

वस्तीवरचे लोक हाकेसरशी धावून येत होते, तो एक धीर होता म्हणून मंजूळ नेटाने सगळं करीत होती. पण त्यांना देखील आपापले व्यवहार, उद्योग असायचे. हे सगळे लोक मुळात कसल्या ना कसल्या उद्योगात गुंतून राहणारे. सर्द झालं की थोडं फार वायंगण पीक; मग परसू, मग ऊस, त्यात गवत, गुरं, दूध-दुभतं... कामाचे डोंगरच. इतकं मरणाचं काम करून देखील हे लोक खाऊन पिऊन सुखी होते असंही म्हणता येत नव्हतं. त्यामुळं त्यांची बारीक-सारीक बाबतीत इतकी काटकसर की खळ्यावर साळीचा एक दाणा, गवताच एक पानदेखील वाया जाऊ द्यायचे नाहीत. बाहेर उडून गेलेली फोलपटंदेखील पुन्हा आणून, उकडून कांडायचे. तरीही वर्षभर पोटापुरतं मिळायची मारामारच !

मंजुळाने आईच्या मायेची पाखर सुमनवर धरली होती. वस्तीवरचे लोकही हाकेसरशी धावून यायचे. बापाचाही तसा आधार होता. तरी देखील सुमन अशी रोगट का व्हावी, कदाचित आईच्या पान्ह्याची थोरवी जास्त असावी.

लीला लग्न होऊन सासरी गेल्यावर एक वर्षाने पहिल्यांदाच माहेरी आली होती. ती लग्न होऊन गेल्यानंतर कितीतरी महिने मंजुळा तिच्या आठवणींनी व्याकुळ व्हायची. लीलाताईबरोबरच्या कितीतरी सुखदुःखाच्या स्मृती निगडित होत्या. नदीत जाऊन कोंड्या काढायला, कालवं फोडायला तिला लीलाताईनेच शिकवलं होतं. त्या दोघीही वल्ही घेऊन नदीवर जायच्या. अर्ध्या वल्हीत कोंड्या, त्यावर कांदळांची फुलं खच्चून भरायच्या. मग दिवसभर साऱ्या वस्तीत कांदळांचा घमघमाट. प्रत्येकीच्या केसांत कांदळांचा एकेक सर.

लग्न होऊन लीलाताई नवऱ्याबरोबर जाताना मंजूळ पुष्कळ रडली होती. अर्धा तास फाटकापाशी उभी राहून ती स्फुंदून स्फुंदून रडत होती. मग कुणीतरी ओढून आणून तिच्या डोळ्यांना पाणी लावलं.

मंजुळाला लीलाताईचा नवरा मुळीच आवडला नव्हता. तो काळसर आणि खूपच उंच होता. त्याची गालफडं आत गेली होती, मान वाकडी होऊन

तोंड घोड्यासारखं पुढं आलं होतं. 'भावोजी' म्हणून हाक मारल्यास त्याच्या चेहऱ्यावरची सुरकुतीदेखील हलत नव्हती. मुक्यासारखा नुसतं 'हूं' करायचा.

तो जंगलामध्ये रखवालदार होता. यल्लापूरजवळच्या एका अटंग्या रानात नाक्यावर राहायचा. लग्न झाल्यावर लीलालाही त्याने तिथंच नेलं होतं.

लीला सांगायची, "घनदाट जंगल ग बाई. चारी बाजूंनी आकाशाला भिडणारे वृक्ष. मधेच नाका. त्यात दोनच बिऱ्हाडं. दिवसासुद्धा तिथं गवे येतात चरायला. एके दिवशी मी विहिरीवर पाणी आणायला गेले होते तर एक मोठ्ठं अस्वल नाकपुड्या फुलवत झुडपांच्या झाळीतून बाहेर येत होतं. मी कळशी तशीच विहिरीत सोडून पळत घरी आले."

मंजुळा घाबरून ऐकत होती.

"एक दिवस तर मी अगदी मेलेच असते. मी एक कोंबडी पाळली होती. वर दोरीला पाटी टांगून आत तिला 'उबवायला' बसवली होती. एक दिवस ह्या तिची बोंबाबोंब. पुढे जाऊन अंडी चाचपडून पाहावी म्हणून हात वर केला पण मला जरा संशय आला म्हणून मी खिडकीवर चढले. बघते तर काय? एवढी मोठी नागीण अंड्यावर वेटोळं करून बसली आहे. नाक्यावर आम्ही दोघीच बायका. पुरुष कामाला जंगलात गेले होते. पलीकडे कुळब्यांची दोन-तीन घरं होती. मोठमोठ्याने हाका मारून त्यांना आम्ही बोलावलं. दोन पुरुष आले. त्यांनी ती पाटीच खाली टाकून ती नागीण मारली. नागीण म्हणजे काळच ग बाई, तिला आणि हातसुद्धा लावयला गेले नाही बघ मी."

"नशिबानेच बचावलीस तू, ताई!"

"चांगली नऊ अंडी ठेवली होती ग उबवायला मी, सगळी फुटून गेली."

लग्नाआधी लीला अंगाने चांगली धिप्पाड होती. आता मात्र अगदीच रोडावली होती. पण त्यामुळं ती सडपातळ आणि सुरेख दिसायची. पण पूर्वीचं ते लालसर तेज मात्र नव्हतं.

"अगदीच रोडावलीस ग तू, ताई."

"अग, माशांशिवाय मला अन्न जायचं नाही. हा तर फक्त रविवारी एकदाच यल्लापूरला जाऊन मासळी आणतो."

"इथं तरी पूर्वी कुठं जास्त मासळी खायचीस तू? एक कोलंबी घेऊन ताटभर भात जेवायचीस."

"रात्रीचा तो काळोख, इतक गडद आणि थिजल्यासारखा. नेहमीच भीती आणि दडपण."

"नवरा बरोबर असताना कसली ग भीती?"

"ही तर जंगलची माणसं. रानात गेले की त्यांचेही जणू वृक्षच बनतात. सकाळी हातात कोयती नि शिदोरी घेऊन जायचं आणि एकदम संध्याकाळी परत यायचं. माझ्या शेजारची ललितव्वा, नुकतीच लग्न होऊन आली होती. – घे रक्ताचे पाट. ती स्फुंदून स्फुंदून रडू लागली. मला मिठी मारली आणि सोडेचना. कुणीतरी जाऊन एका बाईला बोलावून आणली. तिने खूप उपचार केले. हुशार बाई. झाडपाल्याची कितीतरी औषधं होती तिच्याकडे. आम्ही ललिताव्वाला म्हटलं, तू आता गावी जा. पण नवऱ्याला रानात सोडून जायला ती कशीही तयार होईना. मीसुद्धा एकटी राहिले नसते ग बाई! ते रान खायला येतं मला. तिचं बघितल्यापासून भीतीने थरकाप व्हायचा माझा."

मग बराच वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्या. मधेच लीलाने विचारलं, "मंजूळ पदर आला का ग तुला?"

लाजत लाजत मंजुळाने होकारार्थी मान हलवली.

"पहिल्याच वेळी कोण जवळ होतं?"

मंजूळ आधी खूप हसली. मग लाजून चूर झाली. "लावणीचे दिवस. वस्तीवर कुणीच नव्हतं. मी विळीवर बसले हाते भोपळा चिरायला. तशीच उठले. सारखं रडूच येत होतं. मला रडताना बगून बायूलदेखील रडायला लागली. पण तू आधी कल्पना दिली होतीस ना मला?"

लीलाने यल्लापूरहून बरंच सामान आणलं होतं. केळी, सुपारी, वेलदोडे आणि मध. मधाची एक मोठी बाटली तिने सुमनकरिता दिली. म्हणाली, "रोज एक चमचा देत जा तिला आणि बघ सगळे आजार कसे पळून जातात ते."

मंजुळाने न चुकता तिला रोज एक मोठा चमचा मध द्यायला सुरुवात केली आणि खरंच सुमनला एक वेगळीच टवटवी आली. एकदा प्रकृती सुधारली ती सुधारतच गेली.

तिला पाहून लोक म्हणायचे, "वय वाढतं तशी मुलं आपोआप अंगाने भरतात असं म्हटलं जातं. खरंच असावं ते!"

मृग नक्षत्र संपून आर्द्रा लागलं होतं. आकाश काळ्या ढगांनी आच्छादून गेलं होतं. सोसाट्याचा वारा सुटला होता आणि रात्रंदिवस पाऊस ओतत होता. न थांबता नुसत्या सरीवर सरी. हळूहळू शेतं बुडू लागली. पाणी वस्तीत शिरलं. आता या गावातच पडणारा पाऊस तरी नदीत वाहून जावा की नाही? पणं कुठून कुठून ढग कोसळत होते देव जाणे! एक दिवस संध्याकाळी वरच्या वाटेने पाण्याचे लोट येऊ लागले. त्यातच पाण्याला बांध घातल्यासारखा वारा

उलट्या दिशेने फोफावू लागला. वाटत होतं, पाणी वाहायचं थांबलं आहे. बघता बघता शिद्दरचा डोंगर, हळगे, हुळगे, केरवडीपर्यंतचा सगळा परिसर पाण्याने भरून गेला. जणू अख्ख्या पृथ्वीचा सीमा, हद्द नसलेला एक तलावच बनत होता.

वस्तीतल्या लोकांची नुसती बोंबाबोंब. घरदार टाकून मुलाबाळांना घेऊन लोक डोंगराच्या दिशेने पळू लागले. सुदैवाने सगळ्यांचे गोठे डोंगराकडे होते. सदाशिवने एकट्यानेच फक्त आपला गोठा खाली बांधला होता, वस्तीच्या जवळच त्यातल्या त्यात उंचशी जागा पाहून. कुणाचंही न ऐकता तो गुरांना सोडायला गोठ्याकडे धावू लागला तसं लोकांनी त्याला अडवून सांगितलं, "आधी तुझा आणि तुझ्या बायको-पोरांचा जीव वाचव." एकमेकांना मोठमोठ्याने हाका मारीत, पाणी कापीत सगळे जण पळत होते.

पाणी कमरेएवढं असताना ते पाण्यात उतरले होते. मधलं शेत पार करून येईपर्यंत पाणी गळ्यापर्यंत वाढलं. शेवटी तर गणेश सुमनला उचलून पाण्यावरून ओढतच नेत होता. काही लोकांनी आपापलं किडूकमिडूक एक गाठोडं बांधून बरोबर घेतलं होतं, कुणाकुणाची गाठोडीही वाहून गेली. पण वाईट वाटत होतं विष्णूच्या बायकोचं– दसमतीचं. तिची एक ट्रंक होती, मरायच्या आधी वडिलांनी तिला दिलेली. त्या ट्रंकेत ती आपल्या आवडीच्या प्रिय वस्तू ठेवायची. भावाने मुंबईहून आणलेला शालू, पाच वर्षांचा होऊन गेलेल्या मुलाचा चांदीचा करगोटा, नवऱ्याचं देवपूजेसाठी वापरायचं पीतांबर. सगळं त्या ट्रंकेत होतं. घरात जाऊन आधी तिने ती ट्रंक डोक्यावरून आणली पण नवऱ्याने ती ओढून तिथंच टाकून दिली आणि तिला ओढीत पळू लागला. बिचारी परत परत मागं वळून बघत होती.

वस्तीवरचे सगळे सत्तर-ऐंशी लोक एकेक करून धडपडत डोंगराकडील उंचीवर येऊन उभे राहिले आणि एकमेकांचा शोध घेऊ लागले. लहान मुले किंकाळत होती तर मोठी माणसंही देवाचा धावा करीत आक्रोश करीत होती. अंबिकेला आपला मुलगा मनू कुठेच दिसेना. ती बोंबलत पुन्हा पाण्यात उडी मारायला धावली. तेवढ्यात कुणीतरी तिला अडवलं आणि म्हटलं, "हा बघ ना, तुझा मनू इथंच आहे."

अंगावरचे सगळे कपडे भिजून चिंब! कोरड्या वस्त्राची एखादी चिंधीही कुणाजवळ नव्हती. ओले कपडे बदलावे म्हटलं तर रात्री कुठं जाऊन पडावं, काय खावं हीदेखील काळजी होतीच. भरलेल्या आकाशातून सतत संततधारा कोसळत होत्या. अंगावर ओले कपडे. पायाकडून समोर सगळं पोटात घेऊन

पाण्याचा एक सागर पसरला होता. महापुराचे लोट थांबले आहेत का अजून वाहतात काहीच कळत नव्हतं. लोकांना वाटत होतं हाच अखेरचा संहार! आता इथं एक दाणादेखील उगवायचा नाही!

सगळी वस्ती महापुराने गिळून टाकली होती आणि झाडा-माडांचे शेंडे तेवढे दिसत होते. बंदराजवळचा तो आकाशाला भिडणारा पिंपळाचा वृक्ष आता जणू पाण्यावर छत्र धरून उभा आहे असं वाटत होतं. वयस्कर माणसं भांबावून म्हणत होती, " असला महापूर कधीच पाहिला नाही. "

हळूहळू अंधार पसरू लागला आणि लोकांच्या मनातील उमेद पार मावळली. ओल्या कपड्यांनिशीच ते डोंगराच्या पायथ्याशी दाटीवाटीने बसले. सगळेच गोठून गेल्यासारखे थंडगार! कुणाच्याच अंगी एवढंसुद्धा त्राण नव्हतं, हुरूप नव्हता, होती फक्त काळजी! सगळेच इतके गपचिप बसले होते, जणू म्हणत होते सर्वस्व जिथं लुटलं गेलंय तिथं रडायचं तरी कशासाठी?

काही वेळाने आजूबाजूच्या वस्त्यांवरनं शोधत शोधत काही लोक आले. त्यांनी आपापल्या सग्या-सोयऱ्यांना, ओळखीच्या लोकांना आपापल्या घरी नेले. गणेश आणि त्याच्या मुलींना मुकुंद घेऊन गेला. उरलेले काही जण चालत चालत देऊळवाडीवर, सुतारवाडीवर गेले, कुणाच्या तरी ओसरीवर पडता येईल का पाहावं म्हणून. सोयरू मात्र आपल्या बायकोपोरांना घेऊन त्याच्या गोठ्याकडे गेला. म्हणाला, " नको कुणाचे उपकार, स्वतःच्याच गोठ्यात राहीन. "

मुकुंद तसा गणेशचा कुणी नातेवाईक नव्हता. पण बायको मरण्यापूर्वी तो दरवर्षी म्हाळाला मुकुंदच्या घरी जेवायला जायचा. कधी दुकानात, गोठ्याजवळ वगैरे गेल्यास त्याच्याकडे जाऊन बसायचा. मुकुंदचा एक मुलगा मुंबईला नोकरी करीत होता, दुसरा कारवारला पोलिसात होता. मुकुंद अगदी मितभाषी. चेहऱ्यावर एक प्रकारची तृप्ती दिसायची. बायको अगदी साधी भोळी. सतरा बोंगे काढून लुगडं नेसायची आणि अघळपघळ बोलायची. पण मुकुंदच्या नजरेत अशी काही जरब होती, त्याने नुसते डोळे वटारून पाहिलं तरी ती गप्प बसायची. पण त्या दोघा नवरा-बायकोनं गणेशला आणि त्याच्या मुलींना खूप चांगलं वागवलं. बायकोने आपलं जुनं लुगडं फाडून त्याचे दोन तुकडे केले आणि मंजुळाला व सुमनला नेसायला दिले. त्या गुंडाळलेल्या कपड्यात त्या दोघी बहिणी मजेशीर दिसत होत्या. मंजूळ तर लाजून चूर झाली होती.

तब्बल तेरा दिवस पाणी तसंच भरून राहिलं होतं. लोक बांधावर येऊन बसायचे आणि वस्तीच्या दिशेने बघत राहायचे. सुरुवातीला जरा बोलाबिलायचे

पण आताशा मुकाट्यानेच बसायचे.

भास्कर घुसमटल्यासारखा म्हणाला, “ घरादाराला आग लागली असती तर निदान ती विझवण्याकरता धडपड तरी केली असती. इथं तर सगळंच गिळून टाकलं आहे. ”

रामआजोबाने म्हटलं, “ आता हे पाणी कधी उतरणार आणि ही वस्ती पुन्हा वसणार! किती पिढ्यांची मिळकत ही! पोरासोरांना वाऱ्यावर टाकलं रे! ”

“ तरी बरं रामआजोबा, वाडवडलांनी एक उदाहरण घालून दिलं होतं. नदीकाठची घरं म्हणून भिंती दगडांच्या बांधल्या गेल्या. नाहीतर पहिल्या झटक्यातच सगळं मातीमय झालं असतं. ”

“ आता तरी काय झालंय म्हणून कुणाला कळणार? दगडांच्या भिंती खऱ्या पण बांधल्या आहेत मातीनेच ना? सिमेंट कुठं घातलंय? ”

“ काय होईल ते पाहायचं आता. घरं तरी शाबूत राहू दे रे, देवा! पोटाला चिमटा घेऊन पुन्हा सगळं उभारू! घरं पडली तर मात्र सर्वस्व संपलं! ”

“ ह्याच बुडून कुजू लागलेल्या वीतवीत जमिनीसाठी हाणामारीने भांडत होता ना रे तुम्ही, आता कुठं आहे ती? ”

“ देवा-धर्माच्या नियमाबाहेर लोक जाऊ लागले की ही अशीच एकेक संकटं यायची! ”

आपल्या गोठ्यात बांधलेल्या रेड्यांच्या आठवणीने व्याकुळ होऊन सदाशिव रडत होता, “ किती गुणी माझी रेड्यांची जोडी रे देवा! मी दावं तरी काढून यायला हवं होतं. बुडून मेले असते तरी चाललं असतं. ”

नदीपलीकडचा, समोरचा हुळगे गाव नदीच्या काठावरच वसला होता. तो इतका बुडाला होता की इथं गाव होता हे सांगूनही खरं वाटलं नसतं.

एक दिवस कारवारहून काही सरकारी माणसं बैलगाड्यांवर काही सामान घेऊन आली. सर्वांना शोधून शोधून त्यांनी खाऊच्या पुड्या सगळ्यांच्या हातावर ठेवल्या पण लोकांमध्ये कसलाही उत्साह नव्हता. सोयरू तेवढा आपल्या गोठ्याकडून त्यांना हाका मारून सांगत होता, “ इथं पण आम्ही काही जण आहोत रे! ”

तेराव्या दिवशी पाणी उतरलं आणि सगळं उघडं पडलं. एकेक करून सारे जण आधी काठावर येऊन उभे राहिले. आणि मग वस्तीच्या दिशेने चालू लागले. वाटेत शेतांमध्ये गुडघाभर राडा साचला होता. शेतं कुजून गेली होती. गवताचं एक पातंदेखील शिल्लक उरलं नव्हतं. सगळीकडे कुबट वास

पसरला होता. छोट्या छोट्या झुडपांच्या साली आणि फांद्यादेखील कुजत चालल्या होत्या. जणू धरतीची एक उघडी समाधीच!

नदी मात्र, दंश करून विळखा सोडून गेलेल्या नागिणीसारखी संथ वाहत होती.

आल्या आल्या सदाशिव आपल्या गोठ्याकडे धावला. गोठा सगळाच जमिनीवर कोसळला होता. त्याच्या खाली रेडे आणि रेडकं पोटाचे नगारे होऊन मरून पडले होते. सदाशिव आणि बायको तिथंच बसून कपाळावर हात मारीत मोठमोठ्याने रडू लागले. पण त्या घाणीत बसणार तरी कुठं?

आश्चर्य म्हणजे एक नीळकंठाचं घर सोडल्यास वस्तीतलं एकूण एक घर उभं होतं! तशी पडझड बरीच झाली होती. कुणाचं छप्परच उडून गेलं होतं, कुणाची भिंत कोसळली होती, कुठं भिंतीला तडे गेले होते. पण घरांचे सांगाडे नीट उभे होते. घरातला दाणागोटा कुजून गेला होता. गोणी भिजून तांदूळ आतल्या आत फुगून खराब झाले होते. मूग, उडीद वगैरे मोड येऊन कुजले होते.

आपा, मंजुळा आणि सुमन अंगणात येऊन उभे राहिले आणि त्यांनी एकवार सभोवती पाहून घेतलं. सगळी वस्ती जणू शेकडो वर्षं भूमिगत राहून वर आल्यासारखी जुनाट आणि पोखरून गेल्यासारखी वाटत होती.

मंजुळाने लावलेला घोसाळ्याचा वेल माडाला लपेटून छानपैकी चढला होता. तो कुजून मुळावर चिखल होऊन पडला होता. तळहाताएवढी फुलं देणाऱ्या जास्वंदीच्या आता नुसत्या कांड्या शिल्लक राहिल्या होत्या. न्हाणीघर उडून कुठं गेलं होतं देव जाणे! तिथं नुसत्या मेढी उरल्या होत्या.

घाबरत घाबरतच ते आत गेले. माजघरातली एक भिंत कोसळली होती. गणेशला माहीत होतं, ती भिंत मातीचीच असल्यामुळं कोसळणारच. तरीपण त्याला हायसं वाटलं.

बिचारी दसमती, पायऱ्यांवर सोडून गेलेली आपली ट्रंक आठ दिवस हुडकत फिरत होती. शेवटी लांब एका शेतात तिला ती सापडली. आतला ऐवज काढून ती सतत वाळवायचा प्रयत्न करीत होती.

अवघ्या वस्तीत जरासुद्धा तडा न गेलेलं एकच घर शाबूत होतं. ते म्हणजे भास्करचं. मोठ्या माडीचं किल्ल्यासारखं घर ते! खालून वरपर्यंत चिऱ्यांनी गडगंज बांधलं होतं.

घरातला एकूण एक दाणा कुजून गेला होता. लावलेली शेतं मातीमय नि ओसाड झाली होती. कपाळाला हात लावून सगळे चिंतातुर होऊन बसले

होते. सरकारकडून घरटी पन्नास रुपये आणि आठ पायल्या तांदूळ दिले गेले. घरदार तसंच टाकून कुठूनतरी बियाणं, रोपं आणावी आणि पुन्हा शेती करता आली तर बघायला लोक हणकोण, असनोटी, माजाळी वगैरे गावात गेले. कुणी कुणी वाढीव व्याजाने बियाणे आणलं. शेतात नांगर धरणं शक्य नव्हतं. नुसता राडा साचला होता. आणि बैलांचे पाय आत रुतत होते. लोकांनी हलकेच खोऱ्यांनी कणून बी टाकलं. रोपे मिळालेल्या लोकांनी रोपे लावले. त्या अवघ्या परिसरातल्या सहा सात गावातली शेतं कुजून गेली हाती. गणेशने माजाळीला जाऊन आपला मावसभाऊ सदाकडून पाच पाट्या रोपे आणले होते. सदाने आपला एक कुणगाच उपटून दिला होता पण तो पाव वाट्यानेही उरला नव्हता.

या महापुराने त्या परिसराचं रूप आणि रयाच बदलून टाकली होती. हुळगे गावातले सगळेच डोंगरावर राहायला गेले होते. नीळकंठसुद्धा पुन्हा वस्तीत घर बांधायला तयार नव्हता. त्याने आपल्या वस्तीतल्या बागेभोवती वई घातली आणि आपल्या पडलेल्या घराची सामग्री गोळा करून वर गोठ्याशेजारी नेली आणि तिथंच सरकारी जागेवर दोन खणी घर बांधलं.

तो अवघा पावसाळा लोकांनी फक्त पावसापासून डोकं लपवीत नुसती पेज जेवून काढला.

सगळी पडझड डागडुजी करून या धक्क्यातून बाहेर यायला त्यांना वर्ष दीड वर्ष लागलं. गणेशने कोसळलेली भिंत आपण स्वतःच बांधली. बापाने आणि लेकीने मिळून शेतातून चिकणमाती आणली. ती नीट कालवून मंजुळाने गोळे करून दिले आणि गणेशने ते थापले.

"आपा, बायूलाला शाळेत घालायला हवी ना?"

"वरच्या वस्तीत देवळाजवळ शाळा. पावसाळ्यात नाला, शेतं पाण्याने भरतात."

"जयरामअण्णा वस्तीतच शाळा काढतो म्हणे ह्या वर्षापासून. भास्करबाबच्या माडीवर उद्या मुलांना बोलावलं आहे."

आपाने उत्तर दिलं नाही.

"महिन्याला दोन पायल्या भात नाहीतर एक पायली तांदूळ."

"का, सरकार पगार नाही देणार?"

"दोन वर्षं पगार नाही मिळणार म्हणे."

आपा पुन्हा गप्प.

" शिकू दे ना तिला चार पुस्तकं. लिहा-वाचायला उपयोगी पडेल."

मंजुळाने दुकानात जाऊन पाटी-पेन्सिल आणली. दुसरे दिवशी सुमनला घेऊन ती भास्करअण्णाच्या माडीवर गेली.

माडीच्या दरवाज्यात आंब्याच्या पानांचं भलं मोठं तोरण बांधलं होतं. त्यात फुलं खोचली होती. नुकतीच पूजा आटपून उठल्यासारखं जयरामअण्णाने कानावर फूल लावलं होतं, कपाळावर गंध. समोर दहा-बारा मुलं बसलेली. त्यांच्याही कपाळावर गंध. एका ताटात, गुळाने कालवलेले खोबऱ्याचे तुकडे होते, आल्या गेल्याला ते वाटले जात होते. नंतर ते तुकडे दुसऱ्या एका ताटात घालून, त्यातल्या त्यात मोठ्या मुलाला बोलावून ते तुकडे वस्तीवर सगळ्यांना वाटून यायला सांगितलं. मोठ्या आनंदाने तो मुलगा निघाला.

मंजुळाने आणि सुमनने प्रसाद खाल्ला. पण शाळेत बसायला सुमन बिलकुल तयार नव्हती. पुनःपुन्हा रडत मंजुळाच्या मागे यायची. जयरामअण्णा म्हणाला, " मंजुळा, तू पण बैस तिला घेऊन. मग आपोआप रमेल ती." त्यांच्याजवळ एक मुलगा बसला होता. गोरा, हसतमुख, अंगावर स्वच्छ शर्ट. मंजुळाने त्याला ओळखलं नाही. कोण बरं हा, कुठला ?

" नाव काय रे तुझं ?"

" गोविंद."

" कुठला, कुणाकडचा रे तू ?" तो काहीच बोलला नाही.

" जयरामअण्णा, हा मुलगा कोण ?"

" भास्करअण्णाचा भाचा ना ग तो. त्याला इथेच आणून शाळेत घातलं आहे. या लाडक्या भाच्यामुळेच तर भास्करदादाने शाळेला आपली माडी दिली आहे." जयराम स्वतःच हसला.

आणि थोड्या वेळाने सुमन खरंच गोविंदशी खेळण्यात मग्न झाली. मंजुळा हळूच उठून खाली आली.

इतक्यात शिव्या हासडीत सोयरूदादा अंगणात आला.

" अरे जयराम, फार शहाणा, दीड शहाणा झालास तू. तुला उखडूनच टाकतो बघ. गावाला सांगायचं नाही, सवरायचं नाही. उठला आणि काढली शाळा. ही वस्ती म्हणजे बापाची जहागिरदारी वाटली होय तुला ?"

जयराम त्वरेने माडीवरून खाली आला. " काय झालं, सोयरूदादा ?"

" काय झालं म्हणून विचारतोस काय आणखी ? शाळा सुरू करायच्या आधी गावकीला बोलावून दहा जणांना सांगितलं होतंस तू ? या वस्तीवर लग्न-मंडपाची मेख पुरताना देखील दहा जणांना सांगितलं जातं. आणि एवढी

मोठी शाळा तू गुपचूप काढलीस, चोरासारखी ? ''

"चांगलंच काम आहे सोयरूदादा. दोन पुस्तकं शिकल्यास मुलं सुधारतील, त्यांची प्रगती होईल. ''

"मला नको सांगूस तुझा शहाणपणा. कधीचा रे तू? सात इयत्ता शिकलास आणि लंगोटी सुटून ढुंगणावर चड्डी आली म्हणजे शहाणा झालास होय ? शाळा वगैरे ते सरकारचं काम. तुला सांगून ठेवतो, उद्यापासून एकही मूल येणार नाही शाळेत. ''

"तुला हवं तर बोलावतो मी दहा जणांना. चांगल्या कामाला कुणी अडथळा आणणार नाही. ''

त्याच्या बोलण्याकडे लक्ष न देता सोयरू म्हणाला, "मुलांकडून तांदूळ घेणार आहेस म्हणे. लुटायला बसला आहेस इकडे. बघतो ना, कोण कसं देतो ते ? ''

भास्करअण्णा आतच होता. हे बोलणं ऐकून त्याला चीड आली. तसाच बाहेर येऊन तो म्हणाला, "सोयरू, तुझं अतिच झालं हं. शाळा आहे माझ्या माडीवर. मी माझ्या माडीवर शाळा काढेन नाहीतर घाणा घालेन. तुला काही लागायला नको. ''

"पण शिकायला येणार ती वस्तीतलीच मुलं ना? कोण येतात ते बघतो. तंगडीच मोडून टाकतो एकेकाची. ''

"नका पाठवू तुमच्या मुलांना. माझ्या भाच्याला एकट्यालाच घेऊन शाळा चालवीन मी. मास्तरचा पगारदेखील मी एकटाच देईन. ''

"म्हणे भाच्याला. सगळं करून झालं, आता आणलं भाच्याला, इस्टेट वाऱ्यावर पडेल म्हणून. ''

"चालता हो बघू इथन. नाहीतर दोन्ही तंगड्या मोडून टाकतो. ''

भास्करने आत जाऊन काठी आणली. सोयरू झटकन निघाला. तिथून जाता जाता ओरडून म्हणाला, "तुझ्या आज्याने आणि बापाने अडलेल्या भाऊबंदांना लुटलं, त्यांच्या जमिनी हडप केल्या. बरं होणार नाही बघ. तिसराच खाऊन जाईल. ''

तो गेल्यावर तिथं जमलेल्या लोकांना भास्कर सांगत होता. "ह्याचा मुलगा यंदा सातवीत बसतोय. त्यालाच शाळा काढून द्यायचा विचार होता त्याचा. ''

ह्यांचं ऐकून मंजुळा भांबावून गेली. सुमनला शाळेत ठेवायचा तिचा उत्साह पार मावळला. तिने माडीवर जाऊन सुमनला आणलं नि थेट घरी

आली. जयराम कुणाशी तरी बोलण्यात गुंतला होता. त्याला सांगितलं पण नाही. मग हळूहळू एकेक मूल जायला लागलं. माडीवर आता फक्त पूजेचं ताट, तांब्या आणि दिवा. एकटा जयराम नि त्याच्यासमोर बसलेला गोविंद - भास्करचा भाचा.

जयराम काळा-सावळा, बुटका सतरा-अठरा वर्षांचा एक मुलगा होता. त्याचं बोलणं गोड, वागणं नम्र. कधी कधी तो इतक्या नम्रतेने बोलायचा की त्याच्या खरेपणाविषयीच संशय वाटावा. दादा, अण्णा, मामा याशिवाय कुणाला हाक मारीत नसे. त्याचा एक भाऊ मिलिटरीत होता, तो महिन्याकाठी काही पैसे पाठवायचा. त्याची आई या मुलाला कुठे बाहेरगावी पाठवायला तयार नव्हती. जयरामला देखील आईविषयी, गावाविषयी खूप ओढ होती. जन्मल्यापासून तो गावाबाहेर कुठंच गेला नव्हता नि आतासुद्धा कुठे जायची त्याची इच्छा नव्हती.

तो आता नेहमी सकाळी आपली खाकी चड्डी नि वर पैरण घालून मुलांना गोळा करायला बाहेर पडायचा. अंगणात वगैरे खेळणाऱ्या मुलांना न्हाणीघरात नेऊन त्यांचं तोंड-बिंड धुवायचा, त्यांचे कपडे मागून घेऊन आपणच त्यांना घालायचा आणि त्यांना शाळेत घेऊन जायचा. बरीचशी मुलं सकाळी उठून शेतावर चहा, भाकरी वगैरे घेऊन जायची. जयराम कधी फाटकापाशी उभा राहून, तर कधी बांधावर उभा राहून त्यांना हाका मारायचा. मास्तरला पाहिलं की मुलं पळून जायची. आत्ता अंगणात, माजघरात बसलेला मुलगा नाहीसाच व्हायचा. मग हातात दिवा घेऊन माळ्यावर वगैरे लपून बसलेल्या मुलाला शोधून काढावं लागायचं. जेव्हा मुलांना शोधून घेऊन जयराम शाळेत यायचा तेव्हा त्याच्या दोन्ही हातात दोन मुलं, अंगावर घेतलेलं एक व पुढे मागे एक-दोन अशी मुलं असायची. त्यांची पाटी-पेन्सिलपण त्याच्याच कडे असायची. त्यातल एक तरी मूल रडत चालायचं.

रोज धरून पकडून आणलेली पाच-सहा आणि स्वखुशीने आलेली पाच-सहा मुलं मिळून तो शाळा चालवायचा. त्याने आणखीन एक योजना केली होती. किलोभर गूळ आणून त्याचे बारीक बारीक तुकडे करून ठेवले होते. शाळा सुटायच्या आधी तो एकेक तुकडा मुलांच्या हातावर ठेवायचा.

त्याने तांदूल किंवा भात द्या म्हणून पालकांना सांगितलं होतं खरं पण कुणीसुद्धा त्याला कधी शेरभर तांदूळ आणून दिले नाहीत. मळणी झाल्यावर भास्करने मात्र एक खंडी भात बाजूला काढून ठेवलं. ते जयरामने स्वतः खळ्यावर जाऊन ओझं डोक्यावर वाहून आणलं. एके दिवशी अचानक शाळा-इन्स्पेक्टरने

शाळेला भेट दिली आणि तेव्हापासून शाळा नावारूपाला आली. जयरामचा जयराममास्तर झाला आणि सरकारकडून त्याला थोडे पैसेही मिळू लागले. पहिल्यांदाच त्याला जेव्हा तीनशे रुपये एकगठ्ठा मिळाले तेव्हा त्याने शाळेच्या माडीवर सत्यनारायणाची पूजा केली. गावातल्या लोकांना बोलावून सगळ्यांना प्रसाद वाटला. शाळेकरता फळे, नकाशे वगैरे सामान आणलं.

सोयरूची सून शोभा तडक आत आली आणि बावरल्यासारखी उभी राहिली. " काय ग शोभावैनी ? "

शोभा खुदकन हसली. तिच्या सुदंर डोळ्यांतून, पातळ पातळ ओठांतून बरंचसं हास्य सांडलं. इतकी सुरेख ही शोभावैनी आणि तिचं इतकं निरागस, समाधानी हास्य बघून मंजुळाला तिच्याविषयी खूप आपुलकी वाटली. पाहिलं तर तिचं पोट जरा वरती आलेलं दिसलं. हळूच तिच्या पोटावरून हात फिरवीत मंजुळा म्हणाली, " शंकरभाऊ जाताना तुला कोडं घालून गेला का ग ? "

शोभा पुन्हा हसली. फुललेली वेल वाऱ्याने हलल्यासारखी वाटली. आपली साडी तिने जरा सैल करून झटकली त्याबरोबर धपकन एक पुडकं तिच्या साडीतून खाली पडलं. " हे काय ग वैनी ? "

" शेरभर तांदूळ आणले आहेत, दळून थालीपीठ करू. " मग तिने दोन रुपये काढून देत म्हटलं, " याचा गूळ आणि नारळ आणू. "

" असू दे ग, पैसे नकोत. नारळ, गूळ आहे घरात. पण पार्वतीमावशी तुला पोटभर जेवायला घालते ना ग ! "

" कसलं ग ते जेवण ? उकडे तांदूळ शिजवून घालते. त्यांचं कालवण, भाजी कधी खाल्ली आहेस तू ? सासूबाईंकडे तरी काय आहे ? सासरा किल्ली कमरेला लावून फिरत असतो. माझी आई कसा छान, चमचमीत स्वयंपाक करायची, आठवण येते ग ! "

छोटीशीच, सडपातळ बांध्याची शोभावैनी खाऊ मागणाऱ्या लहान मुलासारखी मंजुळाच्या समोर उभी होती.

तसं तिचं वयदेखील मंजुळा एवढंच असावं. कारवारजवळच्या बाड गावची ती. गेल्याच वर्षी शंकरशी —सोरूच्या— मुलाशी. लग्न होऊन ती या गावात आली. शंकर मिलिटरीत होता. शहरातल्या मुलीच्या अंगावर एक प्रकारचं तकतकीत तेज असतं, तसलं तेज शोभाच्या अंगावर होतं. नाजुक सावळा बांधा, भिजल्यासारखे लिक लिक डोळे, सदाफुलीच्या पाकळ्यां- सारखे हसरे ओठ. धड मुलगी नाही, धड बाई नाही— असं मधलंच अप्रुप रूप !

मंजुळाने तिला स्वयंपाकखोलीत जातं मांडून दिलं. शोभा आणि सुमन दोघींनी मिळून ते तांदूळ दळले. मंजुळाने कांदा, गूळ, खोबरं घालून पीठ तयार केलं. तवा चुलीवर ठेवला आणि भरपूर तेल घालून थालीपिठं भाजली.

" एक कोडं घालू का वैनी ? "

" घाल ना. तू सुद्धा तुझ्या शंकरभाऊसारखीच. तो ना माझ्या गालांना साखरआंबा म्हणतो आणि वेणीला बैलांच्या गळ्यातली कानी, आणि धरून ओढतो ग ! "

" मग तू त्याला साखरआंबा चोखून खायला देतेस ना ? "

" तुझं आपलं काहीतरीच हं, मंजूळ " ती लाजत, लाजत हसली. " पत्रं तरी किती लिहितो ग, मी गवताच्या गंजीमागे धरून वाचते. लाज वाटते ग ! "

" तुझे केस मात्र खरंच लांबसडक, रेशमासारखे बघ. अंगाभोवती पसरले आणि साडी-पोलकं काढून टाकलं तरी कुणाच्या लक्षात येणार नाही. "

" हट, लबाड कुठची ! कोडं घाल ना तुझं. "

" नको, तुझ्याच कोड्यानं पोट भरलं. "

थालीपीठ खाता खाता शोभाने हळूच मंजुळाच्या छातीवरून हात फिरवला. " किती गुबगुबीत उरोज आहेत ग तुझे ? माझे बरोबर नाहीत. म्हणून तक्रार करीत असतो तो. "

" थालीपीठ खा ना ग. "

बाहेर कुणाची तरी सावली हलली. मंजुळा घाईघाईने बाहेर आली. शोभाची सासू, पार्वतीमावशी दारात आली होती. " अग शोभा, इथं आहेस का तू ? किती वेळ झाला, कुठं गेली कोण जाणे ! "

" अग ती पाटी घेऊन शेण गोळा करायला गेली आहे ना. "

" पाटी तर अंगणातच आहे. "

" माझी पाटी होती इथंच माजघरात, उचलून घेऊन गेली. सांगणं नाही, सवरणं नाही, कुणाचंही काहीही उचलून न्यायचं. बोलले तर म्हणते कशी, तुझा शंकरभाऊ आल्यावर सांगेन बघ ! "

" असू दे ग. देईल हं आणून ती. " पार्वतीमावशी चार पावलं गेली आणि मागे वळून म्हणाली, " काय भाजलं आहेस ग, छान रुचकर वास येतोय तेलाचा. "

" काही नाही ग, आपाकरता चार घावन काढीत होते. "

" छान, चमचमीत स्वयंपाक करतेस ग तू. उद्या काठीसारखा नवरा

मिळाला तरी त्याला मुसळाएवढा करून टाकशील तू. ''

'' माझा नवरा मुसळाएवढाच आहे, पार्वतीमावशी. ''

'' मग तो तुझी चांगलीच मस्ती जिरवेल. ''

पार्वतीमावशी जायला निघाली. सुमन तिथेच, मंजुळाच्या मागे उभी होती. ती काही बोलेल मंजुळाला भीती वाटत होती, पण ती शहाण्यासारखी अगदी गप्प राहिली. ''

आत आली तेव्हा शोभा खूप हसत होती. '' सासू चांगली आहे ग माझी, अगदी साधी भोळी. लेक तिच्यावरच गेला आहे. पण सासऱ्याला मात्र मी जाम घाबरते. ''

'' का ग ? ''

'' चांगला माणूस नाही आहे ग तो. तुझी पाटी दे बघू, मी खरंच चार गोवऱ्या गोळा करून नेते. ''

दुसऱ्या वर्षी स्नेहसंमेलनाकरता जयराम मास्तरने मुलांकडून एक छोटंसं नाटक बसवून घेतलं. एक कूळ आणि दुसरा जमीनदार. जमीनदार धोतर, कोट, फेटा घालून खुर्चीत बसलेला असतो. कूळ पंचा नेसून, कांबळं खांद्यावर टाकून उघड्या अंगाने आपलं दारिद्र्य आणि दुर्बलता प्रगट करीत सांगतो, '' या वर्षी तुझा खंड देणं मला शक्य नाही. ''

*'' कसा खंड देऊ धन्या, कसा खंड देऊ ?*<br>
*ऐरणीच्या वेळी बैल माझा,*<br>
*रानात मारला वाघाने,*<br>
*कसा खंड देऊ ?*<br>
*वेणणीच्या वेळी बायको माझी*<br>
*फणफणत पडली तापाने,*<br>
*कसा खंड देऊ ?*<br>
*मघाचा पाऊस पडलाच नाही*<br>
*दगा दिला त्याने,*<br>
*कसा खंड देऊ ?*<br>
*संपले माझे भाताचे कण*<br>
*पुरले नाहीत पोटाला,*<br>
*कसा खंड देऊ, धनी ? ''*

मग जमीनदार उठतो. हातातली काठी जमिनीवर आपटतो नि म्हणतो, "भात नाही तर ब्री दे!"

*"बी पण नाही, धनी"*
*"बी नाही तर गवत दे"*
*"गवत पण नाही, धनी"*
*"गाडगी दे, मडकी दे"*
*"गाडगी नाही, मडकी नाही"*
*"ती पण नाही, तर कर्ज काढ"*
*"मुद्दलाच्या दुप्पट व्याज, धनी.."*

"तसं असेल तर ही बघ, माझी जमीन घेऊन चाललो मी." जमीनदार जमीन गुंडाळल्याचा अभिनय करतो आणि काखोटीला मारून चालायला लागतो. कूळ डोक्यावर हात मारून घेत रडत बसतो.

नाटुकलं खूप छान रंगलं. खूप टाळ्या पडल्या. पण तिथं तालुका शाळा बोर्डाचा अध्यक्ष मुख्य पाहुणा म्हणून आला होता. तो रागाने लाल होऊन नुसता खालीवर होत होता.

त्या वर्षाचे शाळेचे पैसे आणायला गेला तेव्हा ऑफिसमध्ये इन्स्पेक्टरने त्याला विचारलं, "मास्तर, तू कम्युनिस्ट ?"

"काय म्हटलं साहेब ? मला समजलं नाही."

"शाळा बोर्डाचा अध्यक्ष, कारवारचा मोठा जमीनदार. त्याची जमीन कारवार, बाड ते हळगे, हुळगेपर्यंत पसरली आहे. तू त्याच्या विरुद्ध नाटक करून लोकांना चिथावतोस ?"

"मला हे काहीच माहीत नाही, साहेब. मी आपलं असंच नाटक केलं गावात पूर्वीपासून चालत आलं आहे ते."

"ते तुझं तू बघ. अध्यक्षांनी यापुढे तुझ्या शाळेची ग्रँट बंद केली आहे. आता तू आणि अध्यक्ष. आमच्याजवळ यापुढं यायचं नाही."

जयराममास्तर अचानक कोसळलेल्या संकटाने भांबावून गेला. करायला गेला गणपती पण झालं माकड. आता काय करू रे देवा!

जमीनदार कारवारलाच राहायचा. तसाच उठून तो जमीनदाराच्या घरी गेला. त्याचं ते किल्ल्यासारखं घर, सभोवती कंपाऊंड, आतला झगमगाट बघून तो घाबरला. तसाच संध्याकाळची लाँच पकडून परत आला.

त्याने सगळं आईला सांगितलं. आईने म्हटलं, "अरे तो घनश्याम

शणे, तुझा मामा त्याची पाच खंडी जमीन खंडाने करतो. दर वर्षी न चुकता त्याचा खंड होडीने नेऊन पोचवतो. मामाला जाऊन सांग, तुझ्या धन्याने असं केलं म्हणून. ''

दुसरे दिवशी तो हळग्याला मामाकडे गेला. मामाने म्हटलं, ''मी चार दिवसांनी तांदूळ घेऊन त्याच्याकडे जाणारच आहे, तू ये माझ्याबरोबर. सांगू त्याला. मी सांगितलं तर नाही म्हणणार नाही तो. ''

मामा आणि भाचा, दोघे मिळून कारवारला गेले. तांदळाची गोणी व्हरांड्यात ठेवून त्याने त्याला देवा, धनी करून विनवलं, मनधरणी केली आणि शेवटी तयार केलं!

या शाळेत सुमन चौथीपर्यंत चार वर्षं राहिली. मग ती, गोविंद आणि वस्तीवरचे आणखी दोन-तीन मुलगे वरच्या देवळाकडच्या शाळेत जाऊ लागले. कानडी शाळेत पाचवीला ती एकटीच मुलगी. मुलं सगळी बाकावर बसायची. सुमनला एकटीलाच स्टुलासारखं काहीतरी देऊन बाजूला बसवीत. लहानपणापासून बरोबर खेळत आलेला गोविंद बाकावर इतर मुलांबरोबर आणि सुमन मात्र बाजूला. आपल्याला वेगळं का बसवतात ते सुमनला आधी कळलंच नाही. जयराममास्तराच्या शाळेत बरं होतं. सगळे चुलतभाऊ आणि गोविंदा भाचा. कुणाच्याही शेजारी जाऊन बसायचं आणि चिमटे काढायचे. असं हे वेगळं बसणं तिला मुळीच आवडत नव्हतं. त्यापेक्षा शाळाच सोडून द्यावी असं वाटायचं.

सुरुवातीला वयाच्या पाच-सहा वर्षांपर्यंत साधी अवखळ दिसणारी सुमन जराशी अंगाने भरल्यावर एकदम उनाडटप्पू झाली. जयराममास्तराच्या शाळेच्या माडीवरून ती धडधड एकाच धावेत जिना उतरायची आणि चढायची. मास्तर मग मंजुळाला कागाळी सांगे.

पाचवीची शाळा सुरू झाली. गोविंदची पुस्तकं आणायला भास्करअण्णा गेला तेव्हा मंजुळानेही त्याच्याकडून सुमनसाठी पुस्तकं आणून घेतली. आपल्या हाताने एक पिशवी शिवली. सुमन त्या पिशवीतून पुस्तकं घेऊन जाऊ लागली.

एक दिवस गोविंद आणि सुमन दोघेही शाळेत जात होती. गोविंद साकवावरून पहिला नाला पार करून गेला तेव्हा मागून येणारी सुमन एकदम म्हणाली, ''बघ रे गोविंद, बघ.'' तो 'अग, अग' म्हणून ओरडत असतानाच ती साकवावरून पळत सुटली. अर्ध्यावरच पोचली असेल, इतक्यात तोल सुटून धप्पकन नाल्यात पडली. नाल्यामध्ये तुडुंब पाणी भरलेलं. पाण्यात पडली आणि दोन-तीन गटांगळ्या खाऊन वर आली. पण पुस्तकांची पिशवी वाहून

कुठं गेली, कळलंच नाही. कुणाला काही सांगावं तर दूरवर शेतात हा नाला, जवळपास कुणी नव्हतं.

सुमन वर आली आणि पुस्तकं गेली म्हणून मोठमोठ्याने रडू लागली. गोविंदने म्हटलं, " माझी पुस्तकं देतो मी तुला. मामाला सांगेन माझीच पुस्तकं पडली. मग तो मला नवीन पुस्तकं आणेल. "

सुमन म्हणाली, " नको, तू जा शाळेत. " आणि त्या ओल्या कपड्यांनिशी ती थेट घरी आली, घाबरत, लपत.

घरी आली तर मंजूळ नव्हती, आपाबरोबर शेतात गेली होती. वस्तीच्या कडेला लोकांच्या गवताच्या गंजी होत्या. ती तिकडे गेली, अंगावरचे ओले कपडे उन्हात वाळत टाकले व गंजीच्या आडोशाला गप्प बसून राहिली. एकीकडे रडू पण येत होतं आणि भीतीही वाटत होती, बायची, आपाची, मास्तराची.

'आता शाळेत पुस्तकं कुठली नेणार? नकोच ती शाळा आणि तो मास्तर किती शिव्या देत असतो सारखा. जागेवरनं जरासुद्धा हलू देत नाही. नेहमी लिही आणि वाच म्हणतो. परवचा नीट येत नाही म्हणून खेकसतो. माझं आणि गणिताचं तर नेहमीच वावडं. तो सुरेश काय ऐट दाखवतो. आपण गणितात हुशार म्हणून. पण परीक्षेच्या वेळी काही विचारलं तर जरासुद्धा सांगत नाही.

'...बायला मी परवा म्हटलं, मी केरवडीला मामाकडे जाते जत्रेला, तर नको, शाळा चुकेल म्हणाली. मामाकडच्या झाडांवरचे रातांबे पिकले असतील, गोड साखरेसारखे रातांबे. आता शाळेत जाणारच नाही मी. बायने मारलं तरी नाही जाणार. गोविंदाला एकट्यालाच जाऊ दे. पण तो आणखी कुणाबरोबरही जात नाही. शाळेची वेळ झाली की पाटी-पुस्तकं घेऊन येतो आणि मलाच बोलावतो. बाकीची मुलं त्याला बाईलवेडा म्हणून चिडवतात पण तो ऐकत नाही.'

कपडे जरा वाळले तसे तिने ते अंगात घातले आणि ती तशीच गवताच्या गंजीत बसून राहिली. बसल्या ठिकाणाहून तिला आपलं अंगण, माजघर दिसत होतं. वस्तीवरचे आवाज – काहीतरी हाणल्याच्या, फोडल्याचा, बोलण्याचा – ऐकू येत होते. पण घरी जाणं नकोच वाटत होतं. हळूहळू तिला डुलकी येऊ लागली. ती तिथेच गवतात झोपून पडली.

...स्वप्नात पाण्याचा प्रवाह उन्हात चमकत होता. अचानक ती पाण्यात पडते आणि वाहत जाते. पाण्याच्या भोवऱ्यात गुरफटते, खळखळत्या पाण्याचा फेस कापीत लांब लांब जाते. चारी बाजूंनी झाडं, डोंगर, शेतं तिच्याबरोबर

पळत असतात. नाल्यातून वाहत जाऊन ती काळी नदीत पोचते आणि एकदम कांदळीच्या झाडाची फांदी हातात येते. तिला घट्ट पकडून ती तशीच राहते. तिच्यावरून पाण्याचा प्रवाह वाहत असतो, कशीच वर येऊ शकत नाही... मग तिथे गोविंद येतो. किनाऱ्यावरच्या खडकावर पाय ठेवीत तिला हात देतो.... ''

जाग आल्यावर डोळे उघडून पाहिलं तर ती तशीच गवतात पडून आहे. कुणीतरी गवत सरकवल्याचा सर्रसर्र आवाज येत होता. ती दचकून उठली. जरा मान वाकडी करून पाहिलं तर बाय गवतातून वाट काढीत येत होती. ती गप्प लपून बसली.

मंजुळाने गवत नेऊन बैलांना घातलं. बैलांशी बराच वेळ ती काहीतरी बोलत होती. मग घरात जाऊन कामाला लागली. सुमन आडोशाला उभी राहून सगळं बघत होती. बाय येतानाच बैलांना हाकीत घेऊन आली असावी!

तिला पण गव्हाणीत बैलांच्या शेजारी जाऊन बसावंसं खूप वाटत होतं. तिथं कुंपणाशीच मोठ्या चोचीचा आंबा होता. त्याची शीतल छाया गव्हाणीवर पडत होती. ती छाया, बैलांच्या अंगाचा वास तिला खूप आवडायचा. चांदू तर अगदी साधू बैल. त्याच्या मऊ मऊ मानेवर ती कितीही वेळ पडून राहिली तरी तो शिंगसुद्धा हलवीत नसे.

ती गवतातून बाहेर आली आणि पळतच गव्हाणीत गेली आणि तिथं बसली. तिथून थेट घरावर नजर पडत होती. बाय अगदी कामात बुडून गेली होती... आता शाळा सुटली असणार, थोड्या वेळाने गोविंद येईल. बापरे, तिच्या पोटात भीतीचा गोळा. आज बाय ठेवणार नाही. आपाला कळल्यावर तर....

पाटी-दप्तर खांद्यावर घेऊन गोविंद आधी सुमनची चौकशी करायला आला.

'' मंजूळताई, सुमन कुठं आहे ग ? ''

'' अरे, तुझ्याबरोबरच तर ती शाळेत गेली होती आणि मलाच विचारतोस ? ''

'' जाताना ती नाल्यात पडली होती ना ? ''

'' काऽऽय ? ''

'' साकवावरून जाताना नाल्यात पडली होती मग वर येऊन तशीच घरी आली. ''

'' मग कुठं गेली तर ती ? अरे देवा... ! ''

मंजुळा जोरजोरात रडू लागली. रडत रडतच तिला हाका मारू लागली,

“ अग बायूल, बायूल कुठं गेलीस ग ? ”

“ तिची पुस्तकं वाहून गेली, ताई ! ”

“ काय, पुस्तकं वाहून गेली ? कितीदा सांगितलं साकवावरून नाचत जाऊ नकोस म्हणून. आता कुठं गेली असेल माझी पोर ? ”

या वेळी वस्तीवर पुरुष मंडळी कुणी नव्हतीच. कुणी शेतातून, रानातून येणार होते तर कुणी परस्पर दुकानाकडे गेले होते. वस्तीवरच्या सगळ्या बायका दारात गोळा झाल्या, अंगणात सगळ्यांचा कलकलाट.

मंजुळा तर अगदी न थांबता बायूलाला हाका मारीत होती. तिचं रडणं सुमनला पाहवेना. ती उठली आणि कडेकडेने घराच्या मागच्या बाजूला आली. मग हळूच घराच्या कुशीत. तेवढ्यात कुणीतरी तिला पाहिलं, “ अग, ही तर इथंच आहे ना ! ”

मंजुळाने तिला पाहिलं आणि ती संतप्त झाली. तिने अंगणातला झाडू उचलला आणि तिच्या अंगावर धावून जात म्हणाली, “ कुठं मरायला गेली होतीस इतका वेळ ? साकवावरून जाताना हळू जा म्हटलं तर तुला धाड भरते होय ? ”

कुणीतरी तिच्या हातातला झाडू घेऊन फेकून दिला.

“ बरं तर बरं, आज काही कमीजास्त झालं असतं तर ? ” म्हणत मंजुळाने तिला एकदम कवेत घेतलं आणि ती तशीच घरात आली. “ जा आधी न्हाणीकडे, आंघोळ करून ये. मी पाणी तापवलं आहे. आंघोळ करून ये, मी पेज वाढते. ”

दोरीवरचे कपडे काढून घेतले आणि सुमन आंघोळीला गेली. वस्तीवरच्या बायका शाळेबद्दल, नाल्याबद्दल, साकवाबद्दल बोलत बोलत निघून गेल्या.

शाळा म्हटली की सुमन आता दडी मारू लागली. नवीन पुस्तकं आणू आणू म्हणताना दिवस उलटत गेले आणि मग सगळंच राहिलं. सुमन इतके दिवस शाळेत जात नव्हती, पण गणेशने एका शब्दानेही कधी काही विचारलं नाही. आधीच सगळ्या वस्तीतून एकच मुलगी शाळेत जायची, तीही बंद झाली. लोकांना ते कळलंच नाही. ते या दिवसांत चीनशी चाललेल्या युद्धाच्या गोष्टी ऐकण्यात आणि बोलण्यात गर्क होते.

एका घराण्यातले नऊ जण फौजेत होते आणि दिवसेंदिवस वाईटच बातम्या कानावर येत होत्या. वस्तीभर लोकात नुसती काळजी पसरली होती. सदानंदची आई तर जमिनीला खिळलेली. एकुलता एक मुलगा कुणाचं न ऐकता फौजेत गेला होता. लोक तिला धीर द्यायचे, रात्री कुणी कुणी तिच्या

सोबतीला झोपायलाही जायचे.

काल रानात गेलेल्या ठिकाणी गणेशच्या पायात एक काटा रुतला होता. त्याने तो तिथंच ओढून काढला पण अजूनही दुखत होतं. पाय दगडाला आपटला आणि सुजला. तरीही लंगडत लंगडत तो आज रामात जायला निघाला होता. डोंगराच्या पायथ्याशीच त्याला वरच्या वस्तीतला हरी भेटला. तो पाला-पाचोळा गोळा करून झाबळ्यात भरीत होता. गणेशला बघून तो म्हणाला, " कसल्या गोणी घातल्या आहेत रे तुझ्यावर, लंगडत लंगडत रानात चालला आहेस ते ? "

" घरात बसून कंटाळा येतो रे, हरी. बसून बसून करणार तरी काय ? घरातून बाहेर पडलं की तेवढाच जिवाला विरंगुळा ! नको वाटतं रे घरी. "

हरीने त्याला बारकाईने न्याहाळलं. काय दशा झाली होती त्याची ! उन्हात चेहरा, बाहू करपून गेले होते. डोळे मळकट, तेलकट दिसत होते आणि त्यातलं तेजच उडून गेलं होतं. मूळची मोठी, लांब हाडं तेवढी उरली होती, वरचं मांस आतल्या आत जिरून गेलं होतं. एके वर्षी, देवळाजवळ ' हिरण्यकश्यपू ' खेळ केला होता. त्यात गणेश हिरण्यकश्यपूचा सेनापती झाला होता, काय थयथय नाचला होता तो ! त्याच वर्षी नरसिंहाचं काम करणाऱ्या माणसावर ' नरसिंहा 'चा अवसर आला. आणि त्याने जो काही प्रकार केला की हिरण्यकश्यपूला खरंच मारून टाकणार होता. दहा-वीस लोकांनी त्याला धरून ठेवलं आणि नारळ फोडून त्याच्या पायावर ठेवला नि त्याला शांत केलं. लोक अजून आठवण काढीत होते.

हरी पुढे आला, त्याने गणेशला एक विडी दिली आणि उभ्यानेच ती पेटवली. " कधी चार-आठ दिवसांतून एकदा न्हाव्याकडे जाऊन दाढी तरी करायची रे. "

गणेशने उगाच दाढीवरून हात फिरवला, आपले गुबगुबीत गाल अगदीच बसल्याचं त्याच्या लक्षात आलं.

" हरी, थोरलीचं लग्न करून टाकावं म्हणतो. तुला कुणी चांगला मुलगा माहीत असल्यास सांग. "

" लहान आहे ना रे ती अजून ? "

" लहान कसली ? आई गेली तेव्हा ती नऊ वर्षांची होती आणि आई जाऊनच आता नऊ वर्षं झाली. "

" धाकटीचं कसं होणार मग ? "

"तो एक घोर आहे जिवाला. म्हणून दोन वर्षे विलंब केला. आता ती जरा मोठी झाली आहे, स्वतःचंच सगळं केलं तरी पुरे. मला आणि आता जन्माचं थोडंच चुकणार आहे! चूल म्हटली की नको वाटते रे, हरी. खाणीतनं दगड काढीन मी, पण चूल नको रे!"

"खरं आहे, पुरुष माणसाला जड जातं ते."

"बघ तू कुणी चांगला मुलगा असला तर. मारे श्रीमंत नको, गुण बरे असले की झालं. आईचे थोडे दागदागिने आहेत तिच्या, घालून करून देईन."

"ठीक आहे, पाहू या!" म्हणून हरी पाचोळा गोळा करायच्या कामाला लागला. आणि रानातल्या वृक्षावळीचा वेध लागल्यासारखा गणेश डोंगर चढू लागला. तो तसा लंगडत चढताना पाहून हरीला पुन्हा ओरडून सांगावंसं वाटलं, "गणेश, दुखऱ्या पायाने नको रे असा डोंगर चढूस!"

केशव आखाडा ओलांडून कुठंतरी ज़ात होता. गणेशने हाक मारली म्हणून तो जवळ आला. खरं तर वाटेतून जाणाऱ्याला गणेश कधी अशी हाक मारीत नसे, अंगावरनं गेल्यास देखील तो चुकवायचा. पण हल्ली त्याला तोंड फुटल्यासारखं झालं होतं. काय झालं असेल? जवळ येत केशवने विचारलं, "काय रे गणेश?"

"तळ्याजवळची जमीन कसून झाली?"

"हो, टणक झाली होती, टाकली कसून कशीतरी. बैलांची मान सुजली आहे बिचाऱ्यांची. ही एवढी ढेपळं वर आली, बायको बोंबलत होती. बरं, हाक का मारलीस तू?"

"मागं भैरेचा एक चांगला मुलगा होता. पोलिस होता शिर्शीला. तेव्हाच करून टाकलं असतं तर बरं झालं असतं. मग पूर आला. धाकटी पण अजाण होती. सगळ्या गडबडीत तसंच राहून गेलं."

"मंजुळाबद्दल बोलतोस का तू?"

"हो रे, यंदा केलंच पाहिजे कसंही करून."

मंजुळा बाजूलाच वळचणीपाशी उभी होती, ती लगबगीने आत गेली. आपाला हल्ली काय झालंय, वाटेल त्याला सांगत सुटला आहे.

"केशव, तुझ्या माहितीत कुणी चांगला मुलगा असला तर बघ. मुलगा मात्र चांगला गुणी हवा."

"मिलिटरीतला चालेल का?"

“ फारसं मनात नाही, तरी मुलगा चांगला असल्यास बघू. ह्या दोन-तीन वर्षांत गोवा मुक्त झाल्यापासून बरीच मुलं गोव्याला नोकरीला असतात. बघ विचारून कुणी असल्यास. ”

“ हो, मी काढतो शोधून. ”

“ शेवटी नशिबात असेल तोच मिळणार रे, पण आपणही प्रयत्न करायला हवा ना ? आधीच सगळं नीट पाहून घ्यायला हवं. मग भोग कुणाला चुकत नाही. ”

“ हो तर, त्या खारगेच्या विठोबाची कमळासारखी सुरेख पोर, मुंबईतल्या कुणाला तरी दिली. बाडचा मुलगा म्हणे. मुलगी बघायला आला तेव्हा चांगला सुटा-बुटात आला, ही भुलली. मोठ्या कंपनीत सुपरवायझर आहे म्हणून सांगितलं म्हणे. मागचा पुढचा विचार न करताच मुहूर्त पाहून मुलीचं लग्न करून टाकलं. त्याने बायकोला नेऊन झोपडपट्टीत ठेवली म्हणे मुंबईच्या. समोर वाहती गटारगंगा आणि गू-घाण ! ”

“ नोकरी चांगली नव्हती का ? ”

“ कुठं रे ! छोट्याशा कारखान्यात साफ-सफाईचं काम करीत होता, त्यात दारूचं व्यसन. बाशिंग सोडलं देखील नसेल, गेला आणि पिऊन आला म्हणे. बापाने चांगलं दहा-बारा तोळे सोनं घातलं होतं मुलीच्या अंगावर तेसुद्धा विकून खाल्लं म्हणे. आता अंगावर एक गुंजभर देखील शिल्लक नाही. मागे विठोबा मुलीला बघायला म्हणून मुंबईला गेला आणि येऊन कपाळावर हात मारून रडतो आहे आता. ”

ऐकून गणेशला भयभीत झाल्यासारखं वाटलं, “ माझ्या हरणाच्या पाडसासारख्या पोरीला असलं काही होऊ दे नको रे देवा ! ”

“ आई नसलेली पोर. लहानपणापासून दगदगीतच वाढली. नवऱ्याच्या घरी तरी सुखाने राहो ! ”

“ दारूचं व्यसन, अत्यंत वाईटच. तसलं आणखी नको रे देवा ! ”

६२ च्या चीनशी चाललेल्या युद्धात या वस्तीतले तिघे जण अगदी पुढे सीमेवर होते पण तिघेही सुखरूप परतले होते. पण ६५ सालच्या पाकिस्तानच्या लढाईत मात्र एक जण धारातीर्थी पडला. सोयरूचा मुलगा - शोभाचा नवरा शंकर. लग्नाची नवलाई अजून संपलीच नव्हती. लग्न झाल्यावर फक्त एकदाच दोन महिन्यांच्या रजेवर येऊन गेला होता. सीमेवर जायला निघालो आहे म्हणून एकच चिठ्ठी आली होती. पुढे काहीच कळलं नाही. वस्तीवरचे

सगळे त्याच्याच काळजीत.

अचानक एक दिवस तार आली, " शंकर गावकर आजारी आहे. "

तिसऱ्या दिवशी दुसरी तार, " शंकर गावकर खूप आजारी आहे. "

वस्तीवरचे सगळेच काळजीत. घरात बोंबाबोंब! शोभा तर बिचारी..!

लोक घाबरून तिसऱ्या तारेची वाट बघत होते. आधी मिलिटरीत जाऊन आलेले रामदाद, गणपतआजोबा वगैरे हळू आवाजात म्हणत होते, " मिलिटरीत कुणी दगावलं तर एकदम कळवीत नाहीत, अशीच रोज एकेक तार पाठवून कळवतात. "

कामधंदा सोडून दिवसभर सगळे जण अंगणात, मागील दारी, आखाड्यात येऊन वाट बघत उभे राहायचे. तिसरी तार येऊ दे नको रे देवा' म्हणत घरी परतायचे.

आणि एक दिवस खरोखर तिसरी तार आली. तारवाला तार घेऊन सायकलीवरून आला. वरच्या रस्त्याच्या कडेला सायकल ठेवून तो पळतच शेतातून वस्तीकडे येऊ लागला. त्याला येताना बघून लोकांनी बोंबाबोंब सुरू झाली.

जयराममास्तरने सही करून तार घेतली. शंकर युद्धभूमीवर गोळी लागून मरण पावला होता!!

लोकांच्या डोळ्यांसमोर शोभाचं निर्मळ, निष्कलंक हास्य सारखं उभं राहत होतं. लहान मुलासारखा तिचा निरागसपणा आठवून त्यांचं काळीज कळवळत होतं. तिच्याकरता सारखे अश्रू ढाळावे असं वाटत होतं. अख्खी वस्ती दुःखाच्या खोल, खोल खाईत लोटल्यासारखी झाली होती.

महिनाभर या दुःखाचं सावट पांघरून लोक मूकपणे वावरत होते. मंजुळाला तर सारखं वाटायचं, आत्ता शोभावैनी दारात येऊन " खायला दे ग " म्हणून साद घालेल! तिला शोभाच्या घरावरून जाताना सुद्धा भीतीने पोटात गोळा उभा राहायचा.

एक दिवस वरच्या वस्तीतून मुकुंदचा सांगावा आला, येऊन जा म्हणून. गणेश तसाच तातडीने उठून मुकुंदच्या घरी गेला, " का बोलावलं, भावोजी? " म्हणत त्याच्यासमोर जाऊन उभा राहिला.

हुळग्याला एक नवरामुलगा होता, आई नव्हती. वडलांचा एकुलता एक मुलगा. मॅट्रिक नापास झाल्यावर मिलिटरीत भरती झाला होता.

मिलिटरी म्हटल्याबरोबर गणेशच्या अंगाला घाम फुटला. बावचळून

मुकुंदच्या समोर उभा राहून तो मुकाट्याने पुढचं काय ते ऐकू लागला. मुकुंद सांगत होता, "माडीचं मोठ्ठं घर आहे. बागेत केळी, माड, आंबे, फणस वगैरे भरगच्च झाडं आहेत. त्याशिवाय सात खंडींचं सुपीक शेत."

"पण मिलिटरीत आहे ना."

"अरे, मिलिटरी आता पूर्वीची नाही राहिली, गणेश. पगार चांगला असतो. कधी कधी बायको-मुलांना पण नेता येतं."

"युद्ध म्हटलं की ते वाईटच. सोयरूचा सोन्यासारखा मुलगा..."

"तेच सांगणार होतो मी. हा मुलगा शिकलेला आहे. युद्धभूमीवर जायच्या कामावर नाही आहे, तो 'सप्लाय'मधे आहे म्हणे. 'सप्लाय' म्हणजे सैन्याला रसद पोचवाचं काम."

"मुलगा चांगला आहे?"

"मंजुळाला शोभण्यासारखाच आहे. अंगाने बारीक पण रूपवान, गोरा. कुणाच्या अध्यात मध्यात पडणारा नाही. लहानपणापासून बघतो आहे मी त्याला. त्याचा बाप म्हाळू, माझा मावसभाऊ. परवा त्या बाजूने गेलो होतो तेव्हा तोच म्हणत होता, मुलाला एखादी चांगलीशी मुलगी बघ म्हणून."

"हुळगेचा म्हाळू, नाव ऐकलं आहे मी."

"आधीच सांगतो, म्हाळू जरा तिरसटच. कधीपण ताडकन रागाची सणक येते. पण त्याचं आता काय राहिलं आहे? पन्नास सरली, पाच उरली. त्याला जरा थातारून घेतलं की सगळा अधिकार सुनेचाच."

"पण मिलिटरी म्हटलं की भीतीच वाटते."

"आता तुझ्या मताने तू विचार कर बाबा. मी नुसतं बोट दाखवून दिलं आहे."

"विचार करून बघतो काय ते." एवढं सांगून गणेश घरी आला.

पण गणेशला आता ध्यासच लागला होता. बायचं घरदार, बायचा नवरा, सासरा कसा असेल, याच विचारात तो मग्न राहायचा.

मुकुंदने एक स्थळ दाखवून दिलं आहे, बघून तरी यावं. उद्या उगाच एक चांगलं स्थळ हातचं सोडलं म्हणून चुटपुट लागायला नको.

मग एके दिवशी त्याने ट्रंकेतून धोतर काढलं. ते नेसून चांगला धुतलेला शर्ट घातला. मंजुळाने विचारलं, "कुठे चाललास, आपा?"

तो जरासं हसला, "जरा काम आहे ग, हुळग्याला जाऊन येतो."

मंजुळाला आज खूप बरं वाटलं. आपाने दाढी केली होती, नवीन कपडे घातले होते. पूर्वी आपा असाच दिसायचा, नितळ, गोरापान, हसतमुख!

हुळगे गावच्या म्हाळूचा मुलगा. अंदाजाने तो घराजवळ आला. मधे एका दोघांना विचारलं तर न बोलता नुसतं बोटच दाखवलं. गणेश मनात म्हणाला, “बरे बुवा हे लोक, वाटसरूला वाटसुद्धा दाखवीत नाहीत.”

घर नदीच्या तीरावरून एका हाकेच्या अंतरावर होतं•आणि नदीच्या पाण्याचा गारवा, खारटपणा घरूनसुद्धा जाणवत होता.

गणेश आखाड्यातून आत गेला तेव्हा त्याला एकदम शीतल छायेत शिरल्यासारखं वाटलं. तिथं जमिनीतच ओल होती आणि सगळी बाग झाडाझुडपांनी झाकोळून गेली होती. गणेश मनात म्हणाला, “चांगला कष्टाळू वाटतो हा म्हाळूमामा!”

आखाड्यात मात्र दोन्ही बाजूला दोन वृक्ष राक्षसासारखे माजले होते, एक काटेरी कवंजीचा होता आणि दुसरा लाल लाल फुलांनी बहरलेला पांगारा. इतका मोठा पांगाऱ्याचा वृक्ष त्याने कधीच पाहिला नव्हता. कवेत मावणार नाही एवढ्या कवंजीच्या वृक्षावरची सगळी पाने गळून गेली होती आणि काटेच तेवढे दिसत होते. कशाला बरं ठेवले असतील त्याने हे वृक्ष दारात?”

माघ महिना सरत आला तरी अजून अंगण सारवलेलं दिसत नव्हतं, धुळीने आणि कचऱ्याने भरून गेलं होतं. तुळशीचं वृंदावन कोसळलं होतं. त्याच्यावर देखील कुणी शेणामातीचा हात फिरवला नव्हता. तो मनात म्हणाला, “असू दे, बाईमाणूस नसलेलं घर. बाईमाणूस आल्याशिवाय या घराला घरपणा येणार नाही.

दारात उभा राहून त्याने हाक मारली, “आहे का, कुणी घरात?”

आवाज नव्हता. गणेशला वाटलं, एवढं मोठं माडीचं घर! आपला आवाज कुठल्यातरी खोलीत हरवला. त्याने पुन्हा मोठ्याने हाक मारली.

एक वयस्कर गृहस्थ बाहेर आला. त्याच्या हातात सोलत असलेल्या नारळाची सालं होती ती त्याने अंगणात येऊन मुकाट्यानेच फेकली. गणेश त्याला बारकाईने न्याहाळीत होता. चांदीच्या जाड गोफावर त्याने काष्टी (लंगोटी) बांधली होती, तिचं टोक गुडघ्यापर्यंत लोंबकळत होतं. अंग उघडंच होतं. लंगोटी इतकी मळली होती की त्याच्या गोऱ्या अंगावर शोभत नव्हती. रंग चांगलाच गोरा होता. उन्हा-पावसात श्रमणारा तो शेतकरी असूनदेखील त्याची कातडी काळवंडली नव्हती, उलट तांबूस झाली होती. त्याने विचारलं, “कुठून आला आहेस?”

“मी शिद्दरचा, खालच्या वस्तीतला गणेश. मुकुंदभावोजीने सांगितलं, तुमचा मुलगा लग्नाचा आहे म्हणून.”

" मुलगी कुणाची ? "

" माझीच. "

" ये, बैस. " म्हणत तो गणेशला माजघरात घेऊन गेला. तिथं एक आरामखुर्ची होती. तिच्यावर कापडाऐवजी कसलंतरी कातडं होतं. गणेश तिथं बसला.

मुकाट्यानेच आत जाऊन म्हाळूने बशीमध्ये थोडा पातळ गूळ आणि पाण्याचा तांब्या आणून गणेशच्या पुढ्यात टेवला. गणेशने तळहातावर थोडा गूळ घेऊन खाल्ला आणि वरून पाणी प्यायला. हा गूळ इतका खारट कसा ? मातीचा गुण असेल कदाचित.

" ऊस लावला होता का ? ".

" गेल्या वर्षी दोन आळी केली होती, यंदा नाही. शेताचंच काम धड होत नाही एका माणसाच्याने. "

" पूर्वीची कौलारू घरं ही, पक्की मजबूत. आता असलं लाकूड सामान कुठं मिळणार आहे ? "

" एकूण एक भिंती चिऱ्यांच्या आहेत, सगळं लाकूड सागवानी. सटरफटर हलक्या लाकडाचा एकसुद्धा तुकडा नाही इथं. "

बसल्या जागेवरून गणेश उठला. उगाच घराचं काम बघायचं निमित्त करून बैठकीच्या खोलीत वाकून त्याने सगळं बारकाईने न्याहाळलं. तिथं एक मोठा काळा कुळकुळीत शिसवी पलंग होता. एका कोपऱ्यात एक मोठी कणातर उभी केली होती. ती भरलेली का रिकामी काही कळत नव्हतं. गणेशचं मन वेगळ्याच उमेदीने भरून गेलं. तो येऊन खुर्चीवर बसला. दारातले दोन कवाथे (नारळाचे रोपे) अंगणात वाकून आले होते आणि त्यांच्या चुडतांची सावली दारात पसरली होती. माड पेंड्यांनी भरगच्च भरले होते.

मोठ्या उत्साहाने गणेशने विचारलं, " या वर्षी मुलाचं लग्न करणार आहात ? "

म्हाळू जरा वेळ गप्पच राहिला. मूठ उघडायच्या आधी लपव-दाखव केल्यासारखं. मग जरासुद्धा उत्सुकता न दाखवता म्हणाला, " चांगलीशी मुलगी आढळल्यास करावं म्हणतो. "

" मुलीबद्दल मुळीच काळजी करू नका. हुशार आणि प्रेमळ आहे माझी पोर. "

" धडधाकट, कामाची सवय असणारी हवी. "

" सगळं नीट संभाळून नेईल ती. तसा मी तिच्यावर कधी जास्त भार

घातला नव्हता. पण एकदा कामाला लागली ना की नुसती वाघ आहे ती. आई गेल्यावर तिनेच तर सगळं संभाळून नेलं आहे. ''

म्हाळू बराच वेळ गप्पच होता. गणेशला बरंच काही बोलावंसं वाटत होतं.

'' माझा मुलगा मॅट्रिक झाला आहे. सैन्यात असला तरी हलक्या कामावर नाही तो. लिहायचं, हिशेब ठेवायचे वगैरे कामं करतो. एकुलता एक मुलगा. आहे ते सगळं त्याचंच. सून आल्यावर तिलाच सगळं संभाळून न्यावं लागेल. ''

'' हो तर. ''

'' तो उत्तमचा मुलगा देवीदास, गेल्या वर्षी लग्न झालं त्याचं. सातवी का आठवी शिकून गोव्याला आर्म पोलिसमधे असतो. घरी धड एक खंडीचं देखील शेत नाही. चटईएवढी बाग. तरीसुद्धा चांगलं तेरा तोळे सोनं घालून मुलगी दिलीय. शिवाय दोन्हीकडचा खर्च. दिसायला म्हणाल तर माझ्या मुलापुढे काजवा ! ''

'' तुमचा सगळा मान-भौमान करू हो आम्ही. तिच्या आईचं आहे थोडं सोनं. ''

'' तुमच्यासाठी नाही सांगत. आपली रीत-भात सांगितली या गावची. आपलं अजून ठरायचंच आहे. ''

'' मुलगा कधी येणार ? ''

'' येईल, महिन्या-दीड महिन्याने. ''

'' आल्यावर त्याला मुलगी बघायला पाठवा. ''

'' बघू, मुलगा काय म्हणतो ते. ''

'' मी आणखीन् कुठे बघत नाही. ''

'' तसं बांधून ठेवणं योग्य नव्हे. ''

'' तरीदेखील तुमचा मुलगा येईपर्यंत मी थांबतो. ''

'' तुम्हाला हवं तसं. ''

'' माझ्या मुलीविषयी गावात कुणालाही विचारल्यास कळेल तुम्हाला, भारी गुणाची म्हणून. ''

'' मुकुंदने सांगितलं तरी पुरे आहे आम्हाला. ''

त्याच्या घराच्या पायऱ्या उतरताना गणेशला ते कोसळलेलं तुळशीवृंदावन पुन्हा दिसलं. तो मनात म्हणाला, हे सगळं नीट करणं बायच्या लेखी काहीच नव्हे. फाटकाशी पोचल्यावर मात्र त्याने ठरवलं, हे दोन्ही वृक्ष मारून घे म्हणून बायला सांगायला हवं. ''

गणेशने पुन्हा एकदा मागे वळून पाहिलं. गुबगुबीत अंगाचा, मोठ्या हाडापेराचा म्हाळू दारात तसाच उघडा उभा होता. एवढी सोयरीक घेऊन माणूस आला आहे म्हणून देखील त्याने अंगात एखादा शर्टही घातला नव्हता.

शेताची मेर तुडवीत, नदी पार करून घरी येईपर्यंत डोक्यावर रखरखीत उन्ह रणरणत होतं. चालून चालून तो कासावीस झाला होता. माजघरात येऊन 'हुश्श' करून बसत त्याने म्हटलं, "बाय, आधी ताटात घालून थोडी पेज दे. आंघोळ बिंघोळ नंतर."

मंजुळाने लगबगीने जाऊन ताटात पेज वाढून आणली. गणेश सरसर करून ती प्यायला-तोंडाला लावलेलं ताट काढलंच नाही. मग त्याला थोडी तरतरी आली. मंजुळाकडे पाहून तो हसला.

"आपा, कुठे गेला होतास ?"

"माडीचं घर आहे पण घराला ना अंगण ना घरपण. बाईमाणसाचा सादपडसाद नसताना बागेतल्या माडांना ह्या एवढ्या पेंडी तर बांगड्या किणकिणल्यावर विचारायलाच नको. बाय, एक मात्र करायला हवंस तू. लग्न झाल्यावर दारातलं ते पांगाऱ्याचं आणि कवंजीचं झाड मारून टाकायला सांगायला हवं !"

मंजुळा लाजून आत पळाली.

शेतात विहीर खणून बाप-लेकीने 'परसू' केलं होतं. गोव्याची भाजी, माठ, वांगी, पडवळ, दुध्या आणि मिरच्या लावल्या होत्या. शिवाय कलिंगडं. परसू लावताना मंजुळा अगदी त्यातच गुरफटली होती म्हटलं तरी चालेल. सकाळी घरातलं सगळं काम लगबगीने आवरून ती तिथे जायची. मग रोपांना पाणी घाल, खत-पाणी बघ, ह्यात ती अगदी उन्हं चढेपर्यंत गुरफटलेली असायची. बायूलाला ती तिथे फारसं आणीत नसे. हूड पोरगी ती. उगाच कुठेतरी नाचायची आणि कुठेही पाय ठेवायची. मग तिचं एखादं रोप तुडवलं जायचं. "बायूल, हा बिनगा नेऊन आळ्याला पाणी घाल." म्हटलं तर तो बिनगा आणून वरून घसाघसा पाणी ओतायची. मग सगळी रोपं जमिनीवर माना टाकीत. आणि तिला बोलणी खावी लागत. तिच्या ह्या उनाडक्यांना मंजुळा अगदी कंटाळली होती.

आपा रानातून आल्यावर किंवा जोत सोडल्यावर परसात यायचा. मग दोघं मिळून परसू शिंपीत. मंजुळा पाणी ओढायची आणि आपा ते आणून शिंपायचा.

परसू छानच तरारलं होतं. दुध्याच्या मांडवावर चांगले आठ-दहा दुधी लोंबकळत होते. पडवळे मांडवावरून जमिनीला टेकत होती. पुरुषभर उंचीचे भाजीचे रोपे तरारून आले होते. मिरचीची रोपं हिरव्या-लाल गेंदांनी लहडली होती. कलिंगडचा वेल परसाला वळसा घालून पुढे पुढेच जात होता. त्याला लहान-मोठी दहा-वीस तरी फळं लागली होती. काही काढली होती, काही काढायची होती.

“ बाय, तहान लागली आहे ग, एक कलिंगड काढतेस ? ”

“ इथं फोडायचं, आपा ? ”

“ हो, खाऊ की फोडून. ”

“ बायूलाला ? ”

“ नेऊ थोडं. ”

आपाने कमरेची कोयती काढली आणि एक तयारसं कलिंगड काढून ते घेऊन तो विहिरीच्या काठावर गेला. “ बाय, ये ग ” म्हणत त्याने कचकन कोयती कलिंगडावर मारली. समोर काहीतरी दिसलं म्हणून त्याने मान वर केली. पाहिलं तर दोन तरुण समोरच्या वाटेने जात होते. तिथूनच गणेशने हटकलं, “ कोण हो, कुठं चाललात ? ” अडखळल्यासारखे ते म्हणाले, “ इथंच. आपलं उगाच. ”

“ कुठल्या गावचे ? ”

“ हुळग्याचे. ” ते जायला निघाले. गणेशने म्हटलं, “ कलिंगडावर घाव घातला आणि तुम्ही नजरेस पडलात. आता एकेक फाक खाऊन चला. ”

ते थांबले. गणेशने बारकाईने न्याहाळलं आणि तो कलिंगड कापू लागला. त्यातला एक काळा आणि उंच होता, त्याने हाफ पँट घातली होती. दुसरा मात्र गोरा आणि तरतरीत होता. त्याचा शर्ट स्वच्छ होता, पँट आणि पायात बूट. केसांना लावलेल्या तेलाचा सुवास दरवळत होता. गणेशला निराळाच संशय आला. मान खाली घालून तो कलिंगड कापत होता. कलिंगड खायला तर बोलावलं यांना. मग एकेक फाक काढून त्यांच्या हातात दिली. मंजुळाला पण जवळ बोलावून एक दिली. कलिंगड इतकं लाल होतं की गरातून जणू रक्त वाहत असल्यासारखं दिसत होतं.

मंजुळाला उगाचच वाटत होतं, तो पँट-बूट घातलेला तरुण सारखा मलाच बघतो आहे. हॅट, कोण हे परदेशी, अनोळखी !

त्या हाफ-पँटमधल्या तरुणाने कलिंगड खाऊन संपवता संपवता म्हटलं, “ खालच्या वस्तीतल्या गणेशकडे चाललो आहोत आम्ही. ह्याला मुलगी

बघायला, हा भाचा आहे माझा. ''

मंजुळा कलिंगड खात होती ते तसंच तोंडात राहिलं. गिळता गिळता रस खाली पडला. आणि तिचा चेहरा रक्ताळल्यासारखा झाला. लगबगीने तिने पोलक्याच्या बाहीने चेहरा पुसला. तिथून पळून जावंसं वाटत होतं तिला. गणेशने म्हटलं, '' मीच तो गणेश. आणि ही माझी मुलगी, मंजुळा. हिलाच ' बघायची ' होती. ''

आता तिथे एकूणच आश्चर्याची, भीतीची, खुशीची एक शिरशिरी पसरली. तो नवरा मुलगा तर गालातल्या गालात हसत होता.

तो हाफ-पँटमधला गणेशच्या समोर गवतावर बसला. आपण होऊन तो म्हणाला, '' मला ओळखलं नाही, मामा ? मी किन्नरचा, चौकी- वाड्यावरचा नारायण. राघोबाचा मुलगा. पाच-सहा वर्षांपूर्वी आमच्याकडून एक बैल नेला होता. मीच दिला होता कानी सोडून. ''

गणेशने त्याच्याकडे नीट पाहत म्हटलं, '' हो, हो आठवलं. बैल चांगला होता हं तो. खूप राबला. अजूनही आहे ना गवाणीत. '' मग ते दोघेही मोठमोठ्याने हसू लागले.

नारायण खूप आपुलकीने बोलत होता. बघायलाच तो माणूस खूप समंजस आणि जीवनात खूप आघात सहन केले असावेत असाच वाटत होता. तो म्हणाला, '' असू दे, काही हरकत नाही. इथं भेटलो काय आणि घरी भेटलो काय, एकच. परकी तर नव्हे. '' मग तो भाच्याला म्हणाला, '' बघ हं श्रीधर, मुलीला इथंच नीट बघ. उद्या म्हणायला नको, मुलीला चांगली नेसवून, स्नो-पावडर लावून, शृंगारून दाखवली आणि मी फसलो. ''

तो नुसता हसतच होता आणि समोर उभ्या असलेल्या मंजुळाला तिरक्या नजरेने बघत होता.

मंजुळा तशी गोरी नव्हती. तिचा रंग सावळा, तांबूस होता. आता आता गाल इतके तांबूस दिसत होते की तो लालिमा सगळ्या चेहऱ्यावर पसरला होता. अंगकाठीसुद्धा लहानशी, शेलाटीच पण तरतरीत, चवळीची शेंगच. तिच्या लांबसडक भरगच्च केसांमुळे तर तिचं सौंदर्य आणखीनच खुलत होतं.

तो नवरामुलगादेखील बारीक चणीचाच होता. त्याला पाहून तो सैन्यात आहे हे खरं वाटत नव्हतं. तो गोरापान होता पण त्याच्या ओठाकडचा भाग, नाक जरा जास्तच लालसर असल्याने त्याच्या स्वभावाला कसली- तरी धार असावी असं वाटत होतं. त्यात घारे डोळे पण त्या घाऱ्या डोळ्यांत तेज नव्हतं.

त्यामुळं तो गोरा असूनही किरकोळ वाटत होता.

आपाने म्हटलं, "बाय, पाटी घेऊन तू घरी जा, आम्ही आलोच मागाहून."

मंजुळाने पाटी डोक्यावर घेतली आणि ती थेट घरी निघाली. गणेशने त्यांना उगाचच बागेत घुटमळत ठेवून वेळ काढला.

मंजुळा घरी आली तेव्हा गोविंद आणि सुमन धावत, आरडाओरडा करीत माजघरात, अंगणात खेळत होती. तिने दोघांनाही कलिंगड दिलं आणि आपण आत जाऊन लगबगीने सगळं नीटनेटकं ठेवून आवराआवर करू लागली.

सुमन बाहेरून रडतच आली, "बाय, माझं कलिंगड खाताना मातीत पडलं."

"अशी कशी अवखळ, अर्धवट ग तू? उद्या तुझं कसं होणार देव जाणे!"

मग मंजुळा घाईघाईतच सुमित्रामावशीकडे गेली. अगदी कानात सांगितल्यासारखं तिला म्हणाली, "बघायला येतात."

क्षणार्धात ही बातमी गावभर पसरली. सुमित्रामावशी व इतर दोन बायका स्वयंपाकखोलीत येऊन बसल्या. कोण कोण आपल्या दारात, अंगणात, खिडकीत येऊन उभे राहिले. "मंजुळाला बघायला येतात म्हणे." सगळ्यांना मोठी उत्सुकता.

तोपर्यंत गणेश त्यांना घेऊन फाटकापाशी पोचला होता. मघाशी गालातल्या गालात हसणारा तो नवरामुलगा आता मुकाट्याने मागे चालत होता. दारात आल्यावर त्याने बूट काढले. पायात लाल रंगाचे मोजे होते ते घालूनच तो तिथं पसरून ठेवलेल्या नव्या चटईवर बसला. पायातले ते लाल मोजे, पांढरी शुभ्र पँट वर फिकट आकशी रंगाचा शर्ट, कमरेला पट्टा - या सगळ्या जाम्यानिम्यामुळे लांबून आडोशातून पाहणाऱ्यांना तो जणू राजकुमारच वाटला. "बरं झालं, मंजुळाला छान शोभेल हो!"

"पोरीने खूप त्रास काढले लहानपणापासून. आता तरी तिचं चांगलं होऊ दे!"

"हो तर."

गणेशने विचारलं, "आणखीन बघायची वगैरे आहे का मुलीला?"

"नको, नको, परसात पाहिली ना!"

"बघू या मामा, नीट सजवलेली वगैरे एकदा?"

गणेश लगबगीने आत गेला आणि तिथं बसलेल्या बायकांना त्याने

सांगितलं.

सुमित्राने मंजुळाला छान सजवली. ती स्वतःच मुळात इतकी देखणी. इतरांना सजवायची पण तिला हौस. मंजुळाला तिने इतकी सुरेख सजवली होती की ती तशीच उठून बाहेर फिरायला गेली असती तर लोकांनी म्हटलं असतं, "ही कोण बुवा नवीन मुलगी? आत्ताच मुंबईहून आली आहे की काय?"

कुणी कधी बिस्किटांचा पुडा आणि चार केळी आणून ठेवली ते गणेशला कळलंच नाही.

मंजुळाने चहाचे कप आणि फराळाची बशी नेऊन चटईवर ठेवली आणि ती पटकन आत पळाली. पण सुमित्रेने तिला तशीच पकडली आणि पुन्हा बाहेर आणली. "पळतेस का अशी आत? ये, इथं उभी राहा अशी. काय कमी आहे तुझ्यात, कोण कशाला नावं ठेवेल?" आणि ती नवऱ्या- मुलाकडे बघून हसली. पण मंजुळा हात सोडवून घेत आत पळालीच.

मामाने कानात विचारलं, "मुलगी पसंत आहे ना रे?"

श्रीधरने मान हलवीत होकार दिला. मग हळू आवाजात तो म्हणाला, "मामा, मला गळ्यात दीड तोळ्याची साखळी घालायला हवी म्हणून सांग हं त्यांना."

"देण्या-घेण्याची बोलणी करायचीच आहेत पुढे. आता! तू फक्त मुलीची पसंती बघ."

गणेश मधल्या दरवाज्यात उभा होता, त्याने ऐकलंच. खरं तर त्याच्या वडलांनी तेरा तोळ्यांचं सांगतानाच तो काळजीत पडला होता. आता मुलाचं आणखीन हे वेगळं. पण हे स्थळ सोडू नये असंही वाटत होतं.

मामाने उठून जाताना गणेशला अंगणात बोलावून सांगितलं, "मुलाला मुलगी पसंत. आता मोठ्या माणसांनी देण्या-घेण्याचं, मान-पानाचं बोलावं."

ते जायला निघाले. गणेश त्यांना होडीच्या तिथपर्यंत पोचवून आला. वाटेत ते फक्त महापुराच्या वर्षाच्याच गोष्टी बोलत होते. दुसरं काहीच बोलले नाहीत.

तो घरी आला तेव्हा नरसिंह म्हणाला, "गणेशदादा, आधी माहीत असतं तर निदान दोन खुर्च्यातरी आणून ठेवल्या असत्या."

"असू दे. मल्लिकार्जुनाच्या कृपेने मुलगी पसंत आहे त्याला."

गणेश घरात गेला. मंजुळा नवीन पातळ बदलून पुन्हा तोच मळलेला परकर-पोलका घालून चुलीपुढे बसली होती. आणि 'फू फू' विस्तव फुंकत

होती. गणेशने खाकरल्यासारखं केलं, तेव्हा तिने वळून पाहिलं आणि ती तशीच मुकाट्याने बसली. गणेशने हळूच विचारलं, " आवडला ना ग तुला ? "

मंजुळा गप्पच. "

" घरदार, जमीन-जुमला सगळं आहे. मुलगाही चांगला आहे. "

" पण इथंही आई नाही आणि तिथंही नाही, आपा. "

ऐकून गणेशला कळवळल्यासारखं झालं. फाटक्या आवाजात तो म्हणाला, " काही गोष्टी आपल्या नशिबात नसतात, बाळे ! "

बाहेर येऊन तो माजघरात भिंतीला टेकून बसला. मघाशी घातलेल्या चटईवर सुमन नाचत होती. मधेच ती गुंडाळायची पुन्हा सोडायची. आपा तिच्यावर खेकसला, " आत नेऊन ठेव ती चटई. एवढी मोठी घोडी झाली पण काडीची अक्कल नाही. "

शोभाचा नवरा शंकर जाऊन आता तीन महिने झाले होते. शोभावैनीविषयी मंजुळाला खूप आपुलकी वाटायची. म्हणूनच ती तिच्या दुःखाने व्याकुळ व्हायची. कधी कधी शोभावैनीला भेटायला जायची आणि येऊन रडत बसायची.

नवरा गेल्यावर तिला कायमचं नेण्याकरता म्हणून तिचे वडील आणि मोठा भाऊ तीन-चार वेळा तरी येऊन गेले. पण शोभा घराबाहेर पाय काढायला काही केल्या तयार होईना. तिने स्पष्ट नकार दिला. म्हणाली, " आता माझं केवळ प्रेतच या घरातून बाहेर निघेल ! " त्या अवखळ, हसऱ्या मुलीचे हे शब्द ऐकून सगळ्यांनाच आश्चर्य वाटलं.

तिचा नवरा युद्धात दूरवर कुठंतरी मेला होता. त्याच्या शरीराची कुणी कशी काय विल्हेवाट लावली ते कुणालाच माहीत नव्हतं म्हणून तिची सौभाग्य-लेणी गोकर्ण क्षेत्रात नेऊन उतरवली होती. त्याचे अंतिम संस्कार, श्राद्ध वगैरे सगळं तिथंच केलं. गोकर्णहून परत आल्यावर शास्त्रानुसार एक रात्र वडलांनी तिला माहेरी नेली होती; तिथं त्यांनी ठरवलं शोभाला पुन्हा सासरी पाठवायचीच नाही.

पण शोभाने दुसरेच दिवशी आपली पिशवी हातात घेतली आणि म्हणाली, " तुम्ही कुणी पोचवायला येणार असाल तर या, नाहीतर मी एकटीच निघाले. " मग मोठ्या भावाने तिला आणून पोचवलं नि तो निघून गेला. मग मात्र कुणीच आलं नाही.

एक दिवस तिन्हीसांजेच्या वेळेला शोभा हळूच घरात शिरली. मंजुळाने लगेच तिला बसायला पाट दिला. दोघीही स्वयंपाकघरातच बसल्या. शोभाचा

चेहरा शरमेने, भिडेने आणि दुःखाने काळवंडून गेला होता. मधेच पदराने ती आपला चेहरा झाकून घ्यायची. तिला तसं करताना बघून मंजुळाला भारी दुःख व्हायचं.

लहानशाच चणीची ती एवढीशी पोरं. नुकतंच कुठं नव्या नवतीचं, कोऱ्या करकरीत तारुण्याचं अठरावं वर्ष सरलं होतं. तिच्या ताज्या, तरुण चेहऱ्याकडे बघून मंजुळाला तर वाटायचं, ही अजूनही माझ्यासारखीच कुमारी आहे, हिचं अजून लग्न व्हायचंच आहे. माझा कुणी एखादा मावसभाऊ वगैरे असल्यास, ‘भाऊ तू शोभाशी लग्न कर’ म्हणावंसं वाटतं. मग त्यांच्या लग्नात मी भरपूर मिरवून घेतलं असतं.

अचानक शोभाचे डोळे पाण्याने भरले. पण तिने लहान मुलासारखं सूंऽसूंऽऽ करीत अश्रू पुसले.

“वैनी, तू नीट खात जेवत नाहीस ना ?”

“तुला कुणी सांगितलं ?”

“तुझी सासू, पार्वतीमावशी सांगत होती.”

“उपाशी राहिल्याने तरी माझं प्रेत लवकर निघेल का बघते.”

मंजुळा आतून कळवळली. पण आवाजात थोडा राग दाखवतच ती म्हणाली, “हे तुझं काहीतरीच हं, वैनी.”

“मंजूळ, लढाईत काही जण सहा महिने, वर्षभर बेपत्ता होतात आणि अचानक एक दिवस येतात म्हणे. खरं का ग ते ?” आता मंजुळाचे डोळे भरून आले. ते लपवण्याकरता ती बाजूला तोंड करून गप्पच राहिली. “या खेपेला दोन महिने त्याने इतका जीव लावला, उचलून अंगावर घ्यायचा, नाचायचा.” मंजुळाला काय बोलावं सुचेना.

“काल त्याच्या पैशांचे, पेन्शनचे वगैरे कागदपत्र आले होते. डोळे मिटून सही केली आणि दिले सासऱ्याकडे.”

“वैनी, असला वेडेपणा करू नकोस ग; तुला फसवतील. सगळं आयुष्य जायचं आहे तुझं.”

“आयुष्य !” शोभा दुःखाने हसली. “मला सगळंच नकोसं झालं आहे, मंजुळा सगळंच नकोसं वाटतं.”

एवढा वेळ होईपर्यंत दोघींमध्ये तिन्हीसांजेचा काळोख पसरला होता. “थांब हं वैनी, दिवा लावते” म्हणत मंजुळा उठत होती. “नको, राहू दे. बस तू अशीच.”

काही वेळ त्या दोघी मुकाट्याने तशाच बसून राहिल्या. मग

खाकरल्यासारखं करीत मंजुळा म्हणाली, “ परवा बघायला आला होता, पसंत करून गेला आहे.”

“ तेच विचारायला आले होते ग, पण धीर होत नव्हता.”

“ शंकरभाऊसारखाच सैन्यात आहे.”

“ ज्याचं त्याचं नशीब. तुला पसंत आहे ना ? ”

मंजुळा गप्पच राहिली.

“ अनमान करू नकोस. आपलं नशीब बलवत्तर असेल तर माणूस आगीच्या खाईतून देखील सहीसलामत बाहेर पडतो.”

मग “ बरं ग, उशीर झाला ” म्हणत शोभा उठली आणि काळोखातून पार झाली.

लगबगीने पाठीमागे जात मंजुळा म्हणाली, “ वैनी, उगाच वेडेपणा करू नकोस. शंकरभाऊच्या पैशाचं नीट बघ.”

मंजुळाला दिसून आलं, या तीन महिन्यात शोभावैनी केवढी प्रौढ झाली आहे ! म्हाताऱ्या आजीबाईसारखी बोलतेय !

लग्नाच्या गडबडीत सुमन खूप नाचत होती, मिरवत होती, मग कुणाकडून तरी बोलणी खात होती. काही काम सांगितलं की धाडधाड पाय आपटीत धावायचं आणि तिथं काहीतरी वेडंवाकडं करायचं. मग कुणीतरी तिच्यावर खेकसायचा. लग्नघराच्या झगमगाटाने ती हुरळून गेली होती. एक दिवस तर आणलेल्या नवीन साडीची घडी सोडून तिचा वास हुंगत होती. ते पाहून मंजुळाला अस्सा राग आला होता. मामाबरोबर त्याची सुमनपेक्षाही लहान असलेली दोन मुलं आली होती. त्यांना घेऊन ही कसले ना कसले खेळ मांडून बसायची. त्यात एक गोविंद, पण तो जरा बाजूलाच राहायचा. सुमनला बघून सगळे जण चिंताग्रस्त होऊन म्हणायचे, “ कसं होणार आहे या मुलीचं ! गणेशला तर ती नजरेसमोर देखील नको असते.”

लग्नाच्या दिवशी वाजंत्री वाजायला सुरुवात झाली आणि सुमन एकदम कावरीबावरी झाली. इतके दिवस क्षणाचीही उसंत न घेता काम करणारी बाय आज स्वयंपाकखोलीत गप्पच बसली होती. कितीतरी बायका आणि मुली तिच्याभोवती घुटमळत होत्या. बाय मधेच रडायची. हळदीच्यां मुहूर्ताला बाहेर आणताना बायका तिला अगदी जपून आणीत होत्या. हळद अंगाला लागून बाय आत आली आणि सुमनला वाटलं, ‘ बाय, आता मुळी बाय राहिलीच नाही ! ’ परत परत वाजंत्री वाजत होती आणि ती बावरल्यासारखी व्हायची.

बायका तर सारख्या तिच्या भोवतीच उभ्या... का बरं या अशा तिच्यामागे लागल्या आहेत ?... बाय पुष्कळदा आईच्या मरणाच्या गोष्टी सांगायची. खूप, अंगणभर लोक होते म्हणे, प्रत्येक जण म्हणे रडत होता. आणि तोंडात पान सुपारी, केसात फुले.... बाय, तू आईला पाहिली होतीस का ग ? एवढं विचारलं तरी पुरे, बाय आईच्या कितीतरी गोष्टी सांगायची, ऐकतच राहावसं वाटायचं. मी मात्र आईला कधीच पाहिली नाही...

बाहेर अंगणात कितीतरी लोक जमले होते. सोयरूदादा नेहमी सगळ्यांशी भांडत असतो, त्याला पाहिलं की सुमन पार घाबरून जायची. तोसुद्धा आज अंगणात येऊन बसला होता. आणि एकदा बागेतले आंबे गोळा करीत होते तेव्हा पाठी लागलेला निळूआजोबा... किती काळा आणि त्याची ती मिशी! गोविंद कुठे गेला बरं? मामाने नवीन चड्डी शर्ट आणला आहे, घालून येतो म्हणून गेला होता, कुठं बरं गेला हा ?....

अचानक बोहर तीन-चार ॲटमबाँब फुटल्याचा आवाज आला आणि त्याचबरोबर वाजंत्री वाजायला सुरुवात झाली. सुमनच्या छातीत धडधडू लागलं. ती आत येऊन बायच्या जवळ उभी राहिली. बायने तिला जवळ ओढली आणि ती मुकाट्यानेच रडू लागली. इतकी छान सजलेली बाय रडताना पाहून सुमनला कसंसंच झालं. ती बायच्या तोंडाकडे बघत राहिली पण तिला रडू मात्र आलं नाही.

ती बायच्या कवेतून निघाली आणि मांडवात आली. तिथं ठेवलेल्या एका बाकावर ती गप्प बसून राहिली. एवढ्यात नदीच्या दिशेने शिंग वाजलं. पाठोपाठ इतर वाजंत्री. कुणीतरी म्हणालं, ''बोट ऐलतीराला लागली. नवरा येत आहे.''

सुमन धावतच फाटकापाशी गेली. शंभर-दोनशे माणसांची झुंड शेताची कड तुडवीत येत होती. बरोबर वाजंत्री वाजत होती, धूळ उडत होती. चढत्या उन्हात सुमनला वाटलं, या सगळ्या लोकांनी पांढरे कपडे घातले आहेत आणि ते उडती पावलं टाकीत त्वरेने येत आहेत. पुढे पुढे येणारी कितीतरी पावलं! आता सुमनला नव्यानेच उमगलं, हे लोक बायला न्यायला येत आहेत! बायला घेऊन ते दूर जाणार आहेत!

ती परत येऊन बाहेरच्या बाकावर गप्प बसून राहिली. मांडवात कितीतरी मुलं गडबड-गोंधळ घालीत होती, त्यात गोविंदसुद्धा होता. पण ती उठली नाही. रुसून बसल्यासारखी तशीच बाकावर बसून राहिली.

बायला बाहेर आणली. हार घालून झाले; केळी, बत्तासे वाटले गेले.

पण ती तिथेच बसून राहिली. केळं, बत्तासा कधी कुणाकडून हातात घेतला, कधी खाल्ला हेदेखील तिला कळलं नाही. समोरून जाणारा कुणीही तिला चिडवायचा प्रयत्न करीत होता पण ती तश्शीच बसून होती.

मग गोविंद तिला शोधत आला आणि बायने बोलावलं आहे म्हणून घेऊन गेला. बायने तिला आपल्या शेजारी बसवली. तिने एक हात बायच्या भोवती घट्ट घातला. बायशी ती काहीच बोलली नाही. कुणीतरी नवऱ्याला विचारीत होते, "ही तुझी मेव्हणी ना रे?"

नवरा मान खाली घालून गालातल्या गालात हसला. त्याचं ते हसणं सुमनला अजिबात आवडलं नाही. तिला उगीचच वाटलं, हा बायसारखाच काळा-सावळा असायला हवा होता. त्याचे लाल ओठ तर सुमनला मुळीच आवडले नाहीत. आलाय मोठा! बायला नेणारा!

लग्नविधी पार पडले, जेवणावळी झाल्या, नवरा जायला निघाला, तरी सुमन आपली घुम्म, मुकीच!

शेवटी बाय नवऱ्याबरोबर जायला निघाली. अंगणात आपाला मिठी मारून ती हमसाहमशी रडत होती. शेजारच्या आया-मावश्या तिला समजावीत होत्या. डोळ्यांत प्राण आणून सुमन हे सगळं बघत होती. फाटकापाशी पोचेपर्यंत बाय कुणाला तरी शोधत होती, मागे वळून बघत होती. मलाच शोधत असावी. अंबिकामावशीने जवळ येऊन म्हटलं, "बाय चालली ना ग तुझी."

बाय चालली!! "बाय ग!" सुमनने हंबरडा फोडला आणि ती पळाली. बायला घट्ट मिठी मारून ती मोठमोठ्याने रडू लागली. मिठी अधिकाधिक घट्ट करून ती हमसाहमशी रडत होती, लोक तिला थांबवायचा प्रयत्न करीत होते पण तिची मिठी सुटता सुटत नव्हती. शेवटी कुणीतरी तिला उचलून मांडवात आणली. तिथं पायरीवर बसून ती रडत राहिली, तिन्हीसांजा झाल्या तरी आई परतली नाही म्हणून मूल रडतं तशी रडत होती ती. किती लोकांनी समजावलं पण तिचं रडू थांबत नव्हतं. रात्र पडली तरी ती रडतच होती. रडता रडता तिला झोप येऊ लागली. सुमित्रामावशीने तिला हाताला धरून आत नेली आणि चटईवर झोपवली.

बाय नवऱ्याच्या घरी गेली आणि सुमन आमूलाग्र बदलली. तिच्या पायातलं उड्डाणचं जणू कुणी काढून घेतल्यासारखं झालं होतं. तोंडाची बडबड एकदम चिडीचूप झाली. लपंडाव खेळायला, लपायला आता जागाच उरली नाही.

पाच परतणीला बाय आली होती तेव्हा तिने सांगितलं, “ बायूल, पेजेला एक आठवा तांदूळ, दुपारच्या जेवणाला दीड आणि रात्रीच्या भाताला एक असे तांदूळ आधणात घालायचे. पेज चुलीवरून उतरवताना, भात वेळताना आपाला नाही तर कुणातरी शेजारच्या मावशीला सांग. तू हात घालू नकोस. एकदम पायांवर वगैरे पडेल. विहिरीवर पाणी काढताना जरा मागेच राहावं, कळशी भरली की नाही ते बघायला विहिरीत वाकायचं नाही, आवाजावरून आणि वजनावरून ओळखावं. ”

इतकी वर्षं बाय धमकावून ओरडून सांगायची तर सुमन तिचं काहीसुद्धा ऐकत नसे. पण आता पाच परतणीला येऊन गेली तेव्हा तिने सांगितलेलं सगळं पक्कं लक्षात राहिलं. आता लोक काहीही म्हणाले तर ती सांगायची, बायने मला असं सांगितलं आहे आणि बायने मला तसं सांगितलं आहे.

कालवणाचा मसाला काढताना तोंडाने म्हणत ती जिन्नस काढायची, बायने पंधरा मिरच्या घाल म्हटलं आहे, चार सोले, अर्धी मूठ धणे, एक नारळाची वाटी खोबरं घाल म्हटलं आहे. बांगड्यांच्या, ताल्यांच्या आमटीला कांदा घालायचा नाही, त्रिफळं टाकायची म्हटलं आहे बायने.

लग्न झाल्यानंतर एका महिन्यात बाय पाच-सहा वेळा तरी येऊन गेली. किती खुशीत आहे ती! काहीपण बोलते आणि उगाच हस हस हसते. आणि आता दिसते पण किती सुरेख! तिच्या नव्या साडीचा वास घेतच राहावंस वाटतं, तिच्या गळसरीशी खेळत राहावंसं वाटतं.

गेल्या वेळेस येताना भावोजीने पालू (मासा) आणला होता. बाय म्हणत होती, हळग्याचा एक सावकार म्हणे घ्यायला बघत होता पण भावोजीने जास्त पैसे देऊन घेतला. मला अंगाला लावायचा एक साबण, एक पावडरचा डबा आणि फ्रॉकला एक कपडा आणला होता. बाय म्हणत होती, तो आता खूप खर्च करतो म्हणे. मला पण तो आता चांगला वाटू लागला आहे. बाय त्याच्याकडे बघून गालातल्या गालात हसते, लाजते. त्याचे कपडे न्हाणीच्या तिथे नेऊन ठेवते. त्याच्या डोक्याला तेल लावते. तेव्हा मलाही ते आवडतं. भावोजी आता माझी चेष्टामस्करी पण करतो. ‘ खेळीमेळी ’च्या दिवशी त्याने माझ्या अंगावर किती पाणी ओतलं! करवंट्यांची माळ करून माझ्या गळ्यात घातली. बायने बायूल म्हणून हाक मारली तर तो लगेच म्हणतो, “ बायूल, बायूल, लवकर टाक पाऊल. ”

एक दिवस सुमन रात्री वासाचा साबण लावून न्हालेल्या बायच्या अंगाचा, तिच्या कोऱ्या करकरीत वस्त्रांचा वास घेत तिच्या कुशीत झोपली होती. हॉलच्या

दुसऱ्या टोकाला भावोजी झोपला होता. बायने नवीन चटई, वर गोधडी आणि फुलांफुलांची चादर घालून त्याच्यासाठी अंथरूण घालून दिलं होतं. कधीपासून बाय ती चादर ट्रंकेच्या मुळाशी ठेवून जपत होती. नवऱ्याच्या उशाशी तिने चकचकीत पितळेचा तांब्या ठेवला. घासावा तेवढा तो सोन्यासारखा चकाकायचा. त्याला एकदेखील पोचा पडलेला नव्हता. पूर आलेल्या वर्षी वस्तीतली बरीचशी झाडं कुजून गेली होती. त्यांच्या घरामागे एक रातराणीचं झाड होतं. पुराच्या तडाख्यातून वाचलेलं ते झाड यंदाच बहरलं होतं. त्याचा मंद सुवास दरवळत होता. नदीवरून गारवा घेऊन येणारा वारा माडाच्या झावळातून वाहत होता.

बायशी बोलता बोलता सुमनला झोप लागली. बायने हळूच तिचा हात आपल्या अंगावरून बाजूला काढला आणि दिवा मालवला. बऱ्याच वेळाने ऊब गेल्यासारखं वाटून सुमनला जाग आली. चाचपून पाहिलं तर अंथरुणात बाय नाही. तिला एकदम बायला मोठ्याने हाक मारावीशी वाटली. पलीकडे भावोजी झोपला आहे, मग बाय गेली कुठे, कुणी उचलून नेल्यासारखी ?

तिला वाटत होतं बायला खूप हाका माराव्या पण कसल्या तरी भीतीने छाती धडधडू लागली. बाहेर माजघरात झोपलेल्या आपाचा पण आवाज का नाही ? चारी बाजू भरून राहिलेला रातराणीचा सुगंध आणि झावळांची सळसळ !

अचानक पिंपळाचं पान वाऱ्याने हलल्यासारखं कुजबुजणं ऐकू आलं. कुजबुजतात का आतल्या आत हसतात, कळत नव्हतं. मध्येच बाय नाकातून हुंकारायची आणि त्याबरोबर तिच्या नव्या पातळाची सळसळ ऐकू येई. मध्येच बांगड्यांची किणकिण. सुमन डोळे फाडफाडून तिकडे बघायचा प्रयत्न करीत होती. पण काहीच दिसत नव्हतं. रात्रीची का बरं गेली ती तिकडे ? भावोजी तिच्याशी चांगलं वागतो, फुलं वगैरे आणून देतो. एकदा मी पाहिलं होतं, तो बायच्या गालांना स्पर्श करीत होता. म्हणून कदाचित बाय त्याच्याजवळ गेली असावी. तो काय करेल ? बायला कुशीत घेईल ? सुमनला सगळंच आश्चर्य वाटत होतं. काय लहान मुलांसारखी वागतात ही ? बाय मला तर केवढं तत्त्वज्ञान सांगते आणि आपण मात्र वेड्यासारखी वागते ! डोळ्यांनीच ' बाय, बाय ' म्हणावं तसा तिने डोळे ताणून बघायचा प्रयत्न केला. पण काहीच दिसत नव्हतं. फक्त सळसळ, किणकिण, पिंपळाच्या पानांची वाऱ्याशी चाळलेली कुजबूज !

सुमनला पुन्हा झोप कशीच लागली नाही. बऱ्याच वेळाने बाय आली. जवळ आली तसं घमघमाट सुटल्यासारखं वाटलं. वास तरी कसला कसला !

नवीन कपड्यांचा, रातराणीचा, रोमारोमांतून फुलून आलेल्या घामाचा, तिच्या स्त्री-देहाचा... सगळा सुगंध एकत्र होऊन देवसाळकांचा सुगंध यावा तसं सुमनला वाटलं. ती उचंबळून त्या सुगंधाच्या कुशीत शिरली.

दुसरे दिवशी घरी जाताना मंजुळाने आपाने दिलेले सगळे दागिने घातले होते. तोडे, पाटल्या, बेंबीपर्यंत पोचणारं बारा तोळ्यांच गंठण. गणेशने तोळे-बिळे काही मोजले नव्हते. बायकोचं होतं ते सगळं तिच्या अंगावर घातलं होतं.

तिला पोचवायला आपा नदीवर गेला होता. सुमन फाटकातूनच परत आली. गोकुळमावशी आपल्या अंगणातून सुमित्राला सांगत होती, ‘‘ गणेशबाबने बायकोचं सगळे दागिने मंजुळाला घातले. धाकटीला बिचारीला काहीच ठेवलं नाही. ’’

सुमनने ते ऐकले. मनात म्हणाली, यांना कशाला या चौकशा ? सगळे दागिने घातल्यावर बाय पाहा कशी सुरेख दिसते ती !

मंजुळ लग्न होऊन घरी आली तेव्हा तिला ते लग्नघर असं वाटलंच नाही. लग्नघराचा चकचक जरासाही नव्हता, की गडबडही नव्हती. अंगणात पाणी शिंपडून धुरळा तेवढा आचून घेतला होता. लहानसाच मांडव घातला होता वर पातळ झावळं टाकली होती. ना कुठं एखादं तोरण का आंब्याचं पान ! घरातले, मांडवातले सगळे लोक उपरे असल्यासारखे वावरत होते. ती घरात आली तेव्हा ओटी भरायला पाच सवाष्णी शोधून, बोलावून आणाव्या लागल्या. लग्नाचे विधी आटोपले तसे सगळेजण विखुरले. एक पातेल खीर आणि एक तपेली भात केला होता. त्यातलाच अर्धा उरला. दुसरे दिवशी तर फक्त पाच माणसे होती. नवऱ्याच्या तीन म्हाताऱ्या आत्या आणि दोन मित्र. त्यातला एक तर त्याचा मावभाऊच.

जेवण बरंच उरलं होतं. कुणातरी इतर जातीच्या लोकांना ते वाढावं असं मंजुळाला वाटत होतं. तिच्या शिद्दरला लग्नाच्या वेळी इतर जातीची किती माणसं येतात, शेवटची एक पंगत तर त्यांचीच बसते. पण इथं केलेलं अर्ध अन्न तसंच नासून गेलं होतं. सासरा मुकाट्यानेच आत-बाहेर करीत होता. त्याच्या करगोट्याला मधल्या बोटाएवढी जाड किल्ली होती. तो मधेच ती चाचपून पाहायचा. एवढं लग्नघर पण तो आपला फक्त पंचा नेसून वावरत होता, उघड्याच अंगाने. कुणाला काही हवं म्हणून त्याला विचारल्यास तो काही क्षण विचार करायचा नि मग किल्लीने खोली उघडायचा आणि तिथल्या काळोखात शिरून हवी ती वस्तू घेऊन यायचा. तीन नारळ हवे म्हणून सांगितल्यास दोनच आणून द्यायचा, म्हणायचा, एवढे पुरे होतील !

घरी पोचल्यावर नवरीला ' नाव ठेवायला ' स्वयंपाकखोलीत चटई घालून दोघांना बसवलं. श्रीधरच्या जिभेवर शैला, निर्मला वगैरे नावे येत होती. अचानक बाप आत आला. म्हणाला, " श्रीधर, कावेरी नाव ठेव. तुझ्या आजीचं आहे ते. " श्रीधर जरा हिरमुसला, मग त्याने निमूटपणे ताटातल्या तांदळांवर ' कावेरी ' हे नाव लिहिलं. मंजुळाला ते नाव मुळीच आवडलं नाही.

ती आलेल्या रात्री नेमकं शेजारच्या दोन घरांमध्ये जोराचं भांडण पेटलं. अगदी मध्यरात्रीपर्यंत चालू होतं. मधेच इतक्या जोरात कलकलाट होई की मंजुळाला वाटे हे बदडवूनच घेतात वाटतं. मधेच तिचा सासराही कुणा एकाची बाजू घेतल्यासारखा दुसऱ्याला शिव्या द्यायचा. मंजुळा घाबरून गेली होती. हे भांडण कधीपण आपल्या घरात येईल असं तिला वाटत होतं. आधीच घर, घरातल्या त्या धुरकटलेल्या खोल्या अंगावर कलंडल्या- सारख्या वाटायच्या, त्यात हे भांडण.

श्रीधर मधेच आत यायचा, तिच्या बाजूला चक्कर मारून जायचा. तेवढाच जरा धीर होता.

मंजुळा पहाटे उठून स्वयंपाकखोलीत आली तर सासरा आधीच उठून चुलीत विस्तव पेटवत होता. ती लगबगीने समोर आली आणि म्हणाली, " मामा, उठ. मी पेटवते चूल. "

तो निमूटपणे उठला. मंजुळा चुलीजवळ बसली. काही वेळाने त्याने खोलीची चावी उघडून सुपात थोडे तांदूळ काढून आणले, एका बशीमधे थोडी साखर आणि चहाचा पाला आणला. " तांदूळ पेजेसाठी... चहा, साखर आता सगळ्यांना एकेक कप चहा कर. "

मंजुळाने स्वयंपाकखोलीत दृष्टिक्षेप टाकला. तिथे नव्हता एखादा डबा का नव्हती एखादी बरणी. होती फक्त भाताची भांडी. ' हा सगळी मालमत्ता कुलपातच ठेवतो की काय ? '

बाहेर तो मुलाला खूप मोठ्याने सांगत होता, " शंकरने जांभळीकडच्या आमच्या शेतात ' मेर ' सरकवली आहे, अगदी एक वावभर आत घुसला आहे. ती मेर काढून टाकायला हवी. त्याला असा सोडणार नाही मी, हायकोर्टापर्यंत नेऊन लोळवणार आहे. " आणखीन् बरंच काय, काय रागाने बोलत होता.

घर मोठ्ठं होतं. मोठ्ठं आणि उंच. वर फळ्यांनी घडवलेली माडी होती. माडीचं कौलारू घर पाहून मंजूळाला अप्रूप वाटलं. पण चिऱ्यांच्या त्या उघड्या भिंती, एकेक झाड मारून आणून टाकल्यासारखं प्रचंड लाकूडकाम – त्यामुळं

ते घर अंगावर कलंडतंय असं वाटत होतं, छातीवर उगाचच दडपण येत होतं. वाटत होतं, यातली एखादी तुळई आता खण्णकन डोक्यावरच आपटणार!

सगळंच अर्धवट. न लिंपलेल्या उघड्या भिंती, खड्डे पडलेली जमीन, दारं नसलेल्या खिडक्या. असं वाटत होतं की जणू मोठ्या उमेदीने कुणीतरी हे घर बांधायला घेतलं आणि कसलं तरी अरिष्ट कोसळल्यावर तसंच अर्धवट स्थितीत टाकून दिलं. त्या मानाने आपाचं शिद्दरचं घर किती छान होतं! दोनच ऐसपैस खोल्या, बाहेर माजघर. माजघर म्हणजे आनंदाचा एक मेळच! वस्तीतला कुणीपण येऊन बसायचा आणि गप्पा मारून जायचा. पण हे घर नेहमी बंद असल्यासारखं, माणसाच्या सहवासाला आसुसल्या- सारखं भकास दिसत होतं. कुठच्याही खोलीत गेल्यास एक प्रकारचा कोंदट वास. वाटायचं, प्रत्येक खोलीत उघड्या अंगाने पाठ करून तो सासरा उभा आहे आणि चाचपडत काहीतरी शोधतो आहे!

कितीतरी दिवस मंजुळा त्या घरात मोकळेपणी वावरूच शकली नाही. त्याने कट्टकट्ट करून चावी काढली आणि कर्रकर्र करीत खोलीचा दरवाजा उघडला की मंजुळाच्या अंगावर शहारे येत.

पण एक सुख होतं. नवऱ्याची सावली घरात हलली की ती वेडी व्हायची, त्याच्या शरीराचा वास नाकात भरून घेण्यासाठी ती आतुर व्हायची. पण सासरा घरादारात इतका भरून होता की त्याच्या सावटात तिचा सगळा उत्साहच पार मावळून जायचा. भीड, भीतीने छाती दडपून जायची. लग्नाच्या वेळी सगळे उपदेश करीत सांगायचे, "सासरा आता म्हातारा झाला आहे. त्याचं काय पन्नास सरले पाच उरले. मागंपुढं कुणी नाही. तूच सगळं बघायला पाहिजे."

पण इथं पाहिलं तर घरीदारी सगळीकडे सासऱ्याचाच दरारा आहे. त्याने सगळं मुठीत ठेवलं आहे. मलाच कडेवर घेऊन डोंगर चढून जाण्याइतका उत्साह आहे त्याच्या अंगात, मी आणि त्याची काय सेवा करणार? हा म्हातारा होऊन जमिनीला लागेल, तेव्हा लागेल तोपर्यंत याचा दरारा काही संपणार नाही.

लग्नाच्या दिवशी घरात एक बाई गप्पगप्प, अडखळल्यासारखी वावरत होती. कधी निमूटपणे एकीकडे बसून राहत होती. दिसायला पण तशीच. गरीब, रोडावलेली. ती बारीकशी बाई, लग्नासाठी म्हणून नेसलेल्या नऊवारी लुगड्यात पार लपून गेली होती. कुणीतरी मंजुळाला म्हणालं, "ही तुझ्या नवऱ्याची बहीण, नणंद." मंजुळाने नीट पाहिलं तर खरंच ती आपल्या भावासारखी गोरी व घाऱ्या डोळ्यांची होती. पण मंजुळाला आश्चर्य वाटलं, ही परक्यासारखी,

भांबावल्यासारखी का वागते?

लग्नाच्या दुसऱ्याच दिवशी ती परत जायला निघाली तेव्हा मंजुळाला कुशीत घेऊन ती खूप रडली. "बाय, तू तरी या घराचं अन्नपाणी मला तुट्ट देऊ नकोस ग!"

चारी बाजूला बघत, घाबरत घाबरत मंजूळा म्हणाली, "वैनी, राहा ना तू चार दिवस, आजच का जायला हवं?"

पण ती राहिली नाही. पिशवी उचलून चालायला लागली. फाटकापाशी जरा थांबली. डोळ्याला पदर लावून पुन्हा चालायला लागली. मंजुळाचा नवरा, सासरा दोघेही घरातच होते पण कुणीच तिला थांबवलं नाही. असं का? लग्नाला आलेली बहीण परत निघाली आहे, आणि भाऊ का बरं बाहेरसुद्धा येत नाही? आणि हिचा नवरा कुठे? ही इतकी सुटसुटीत, सवाष्ण बाई, कसली अवकळा बाधली आहे हिला?

चार-आठ दिवसांनी मंजुळाला तिची सगळी माहिती मिळाली. आजूबाजूच्या बायका मारे रंगवून, रंगवून तिच्या गोष्टी सांगत होत्या —

तिचं म्हणे एका मुलावर प्रेम होतं. दोघंही डोंगरातल्या झाडा-झुडुपातून फिरायची. दोघंही अजाण, पंधरा-सोळा वयाची. पण त्यांचं एकमेकांवरचं प्रेम इतकं जबरदस्त होतं की एकमेकांसाठी प्राणार्पण करायला देखील ती तयार होती. हे कुणाला माहीत होतं? गावातल्या लोकांच्या दृष्टीने ती दोघं गावातली अजाण कोवळी मुलं. पण त्या कोवळ्या वयात त्यांनी झाडीतून, झुडपातून एकमेकांना दृढ आलिंगन दिलेलं होतं, एकमेकांत ती पूर्णतया मिसळून गेली होती, त्या प्रीतीने त्यांच्या हृदयाचा खोलवर तळ गाठला होता, एखाद्या सुपीक जमिनीत लावलेल्या झाडाची पाळमुळं खोल रुजतात तशी.

अचानक हिचं लग्न ठरवलं गेलं. चारी बाजूंची चौकट इतकी बळकट आणि ही दोघं भित्री मुलं. कुणाच्या तोंडातून एक शब्द फुटला नाही. दोघांच्याही काळजात प्रेमाच्या उमाळ्याच्या लाटा, पण तोंडातून शब्द नाही.

सुमती लग्न होऊन नवऱ्याबरोबर लांब गेली. नवरा भटकळला कस्टममधे शिपाई होता.

तो मुलगा वेड लागल्यागत डोंगरातून फिरायचा, देवळाच्या माळावर नाहीतर पिंपळाच्या पारावर गप्प बसून राहायचा. कितीतरी दिवस कुणाशीही एक शब्दसुद्धा बोलला नाही. सहा महिने होत आले. वेड्या सदानंदची पार दैना झाली होती. एक दिवस तो असाच देवळाच्या कट्ट्यावर बसला होता. अचानक समोर सुमती उभी. त्याला आश्चर्याचा धक्काच!

“ सुमती, एवढ्या रात्रीची कुठून आलीस ग ? ”

“ मी पळून आले आहे. भटकळला बस पकडून कारवारला आले. मग कोडीबागपर्यंत चालले. तिथून होडी मिळाली. ”

“ एकटीच ? ”

“ हो. ”

“ भीती नाही वाटली ? ”

सुमती गप्पच. सदानंदला वाटलं, कधी हुळग्याहून बाहेर न गेलेली ही पोर पहिल्यांदाच भटकळला गेलेली, तिथून एकटीच पळून आली म्हणजे आश्चर्यच ! भाऊ म्हणत होता कारवारहून भटकळला जायला पूर्ण एक दिवस लागतो म्हणे.

तिला आपल्या नऊवारी लुगड्याचा बोंगा सावरत नव्हता. एका हाताने लुगडं गुंडाळून धरलं होतं खरं पण त्याचं एक टोक जमिनीवर लोळत होतं. ती अगदी घामेजून गेली होती, थकली होती, भुकेलेली होती.

“ सदा, मला तहान लागली आहे रे ! ”

दोघंही देवळासमोरच्या तळ्यावर जाऊन पाणी पिऊन आली.

“ आता कुठं जाणार आहेस, सुमती ? ”

“ बाप्पाला कळलं तर तो मला ठेवणार नाही रे, सदा ! ”

दोघंही काही वेळ कट्ट्यावरच मुकाट्याने बसून राहिली. सुमती बसल्या ठिकाणीच पेंगू लागली. सदानंदने तिला हाताला धरून उठवलं आणि तिला घेऊन तो देवाच्या गाभाऱ्याच्या मागच्या बाजूला गेला. तिथं त्याने तिला फरशीवर झोपवली. लुगड्याचं एक टोक अंगाखाली घेऊन ती गाढ झोपली. पण सदानंद खुरमांडी घालून भिंतीला टेकून गप्प बसला. अठरा एक वर्षांचा पोरगा तो, खरोखर पार घाबरून गेला होता. कळल्यावर सुमतीचा बाप तिला ठेवणार नाही आणि भाऊ, अण्णा मला सोडणार नाहीत !

पहाटे झुंजूमुंजू झाल्यावर त्याने सुमतीला उठवलं. दोघंही फार घाबरून गेली होती, काहीच सुचत नव्हतं. दोघांनी तळ्यावर जाऊन तोंड धुतलं, पोटभर पाणी पिऊन घेतलं. आणि टेकडीवरच्या झाडीत दोघंही लपून बसली.

बसल्या ठिकाणाहून गावातला सगळा परिसर दिसत होता. माणसं ओळखता येत नव्हती पण त्यांची ये-जा दिसत होती. डोंगरावर मधेच एखादी गाय येऊन चरून जायची.

सतत तीन दिवस ती टेकडीवर लपून बसली होती. रात्र झाली की तिथं कोल्हेकुई व्हायची. गावात सगळं सामसूम झालं की हळूच ती दोघं

टेकडी उतरून यायची, तळ्यावर जाऊन पोटभर पाणी पिऊन यायची आणि गाभाऱ्याच्या मागे फरशीवर झोपायची. परत पहाटे तांबडं फुटायच्या आत टेकडीवरच्या झाडीत जाऊन लपायची.

सुमती पार गळून गेली. "सदा, नाही रे होत माझ्याच्याने आता. काहीपण कर नाहीतर आपण तुझ्या मावशीकडे जाऊं या."

"संध्याकाळ झाली की आपण आज जायचंच मावशीकडे."

दुपारी कोणीतरी गुरांना साद घालीत टेकडी चढत होता. पावलागणिक त्याच्या कमरेला लटकवलेल्या कोयतीचा खट्खट् असा आवाज येत होता.

"सुमती, कोणीतरी याच बाजूने गुरांना शोधीत येतंयसं वाटतं. ऊठ, आपल्याला लपायला हवं."

"नको सदा, आणखी लपायला नको."

तो माणूस समोरच येऊन उभा राहिला आणि यांना बघून क्षणभर दचकलाच. मग आश्चर्याने बघत राहिला. तो ओटंब्याकडचा रघुनाथ होता. सुमतीने आपलं अंग अगदी लुगड्यात ओढून घेतलं. सदानंद घाबरून त्याच्याकडे बघत राहिला.

"अरे, तुम्ही इथं लपून बसला आहात होय ? तिकडे सारा गाव तुम्हाला शोधतोय. काल हिचा नवरा येऊन थयथयाट करून गेला. राहा, तुम्ही राहा."

तो पळत उतरंड उतरून गेला. ती दोघंही निमूटपणे बसली होती. काहीच सुचत नव्हतं. तिथून उठून आणखीन कुठं जावं असंही वाटत नव्हतं. अचानक सुमती त्याच्या अंगावर पडून हमसाहमशी रडायला लागली. तास, दीड तास असाच गेला. छातीत फक्त धडधड. मग दहा-वीस लोकांचा गलबलाट तिथं पोचला. त्यात सुमतीचा बाप्पा होता, सदानंदचे दोन्ही थोरले भाऊ आणि वडीलही होते.

ही दोन घाबरलेली पाखरं. अंगावरचे कपडे, केस विस्कटलेले. भूक, चिंता, भीती यामुळे पार दशा झालेली. रानातच वाढलेल्या रानमाणसांसारखी दिसत होती ती.

सगळे त्यांच्यासमोर येऊन उभे राहिले. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर आश्चर्य आणि संताप. आधी त्यांना वाटलं, आपण कुणातरी परगावाहून आलेल्या एखाद्या डोंबाऱ्याच्या जोडप्याला बघतो आहोत. काही वेळ कुणालाच काही बोलणं सुचत नव्हतं. ती दोघं तर अंग चोरून बसली होती.

टेकडी दणाणून सोडीत सुमतीचा बाप ओरडला, "ही मुलगी मला मेली. कुळाला बट्टा लावला हिने. यापुढे मी तिचं तोंडदेखील पाहणार नाही.

घरी जातो आणि ही मेली म्हणून तिच्या नावाने गार पाण्याची आंघोळ करतो. ''

तो तसाच मागे फिरला. सदानंदचे दोघे भाऊ त्याला ओढून आणण्यासाठी शिव्या देत पुढे जात होते. बापाने त्या दोघांना अडवलं पण थोरल्याने जाऊन सदानंदवर एक लाथ हाणलीच, सुमतीच्या झिंज्या हलवल्या. कुणीतरी पुढे जाऊन त्याला ओढून आणलं. बापाने म्हटलं, ''इथंच मरू दे त्यांना. लग्न झालेल्या परक्याच्या बायकोला घेऊन हा इथं पडला आहे. ह्या भ्रष्ट पाप्याला माझ्या दारात उभासुद्धा राहू देणार नाही मी. इथंच खड्डा खणून त्याचं दफन केलं आहे म्हणून समजा. यापुढे तू ही टेकडी उतरणार नाहीस, पायच कापून टाकीन. ''

सगळेजण निमूटपणे परत गेले. यांना आता नवीच धडधड. डोळ्यांसमोर काळोख पसरला आणि सगळा परिसर पुसून टाकल्यागत झाला.

संध्याकाळी सूर्यास्त झाल्यावर मावशी आली. तिच्या कडेवर पाण्याची कळशी होती. डोक्यावरच्या पाटीत तिने केळीच्या पानात बांधून भात आणि टोपलातून तिसऱ्याचं कालवण आणलं होतं. काहीही न बोलता त्यांच्याकडे पाठ करून ती उभी राहिली. 'च्याक् च्याक्' त्यांचा जेवल्याचा आवाज येत होता; घटाघटा पाणी प्यायल्याचा आवाज येत होता. पण त्यांच्याविषयी तिला एवढीसुद्धा माया, ममता असल्याचं जाणवत नव्हतं.

त्यांचं जेवून झाल्यावर तिने पाटी उचलून डोक्यावर घेतली. ती म्हणाली, ''सदा, तू रात्रीचा असा झाडा-झुडपात पडून राहू नकोस. जरा काळोख पडल्यावर उतरून माझ्या घरी ये. आणि तू ग, इतकी भ्रष्ट करणी तुझी, तू आता जीवच द्यायला हवास. तुला आत देवधर्म, जात-पात काही उरलं नाही. ''

ती दहा पावलं पुढं गेली आणि परत वळून म्हणाली, ''रात्री येणार आहेस ना रे तू? तिला पोचव नेऊन मष्णात. ''

सदानंद काहीच बोलला नाही. पण त्या रात्री ती मावशीकडे गेली नाहीत. परत देवळात जाऊन झोपली. महादेवाचं ते देऊळसुद्धा असंच. रात्री तिथे माणसांचा अजिबात वावर नसायचा रात्री महादेवाचे पाईक गटागटांनी सभोवती फिरतात असा एक पूर्वापार समज होता. म्हणूनच इथे रात्रीचा आश्रय मिळाला असण्याची शक्यता आहे. पण येणारी प्रत्येक रात्र इतकी एकसुरी आणि काळोखी असायची, काळोख अंगावर डंख मारल्यासारखं वाटायचं. त्यात तहान-भुकेची वणवण.

समोरच्या व्हरांड्यात ती दोघं एकमेकांना अगदी चिकटून बसली होती,

एकमेकांकडून धीर घेत होती. अगदी काकुळतीला येऊन विनवणीच्या सुरात सुमती म्हणाली, " सदा, काहीतरी कर ना रे आता ! मावशीला पण मी नकोशी वाटते रे ! "

" हो, म्हणूनच मी तिच्याकडे नाही गेलो. मी तुला सोडणार नाही ग, सुमती. "

" पण आता आपण काय करायचं ? "

सदानंद गप्पच राहिला.

" मीच आता या तळ्यामधे उडी टाकून जीव देते, सदा. म्हणजे सगळे सुटतील ! "

" पण मी तुला सोडणार नाही ग, सुमती. माझ्याकरता तू सगळं सोडून आली आहेस ! "

अचानक आवेग आल्यासारखी सुमतीने त्याला मिठी मारली. त्या मिठीची ताकद इतकी जबरदस्त होती की सदानंद त्या मिठीत पुरता पाघळून गेला.

मग त्याने तिला हाताला धरून उठवलं आणि गाभाऱ्याच्या मागे नेऊन नेहमीसारखं तिला झोपवलं. स्वतः मात्र तिच्या डोक्याशी निमूटपणे बसून राहिला. घोर चिंतनात बुडून.

दुसरे दिवशी सकाळी मावळी तांदळाच्या भाकऱ्या आणि पितळेच्या किटलीत चहा घेऊन आली.

" सदा, रात्री का नाही रे आलास ? "

" मावशी, बाप्पाने ही टेकडी उतरू नको म्हणून सांगितलं आहे. "

" मग या लावसटीला घेऊन इथंच जीव सोडणार आहेस ? "

" मावशी, तू मला एक कोयती, एक कुऱ्हाड आणि मातीचे दोन गाडगे आणून दे. "

" का ? हिचा बारावा वाढणार आहेस ? "

" आता आमच्या माणसात आम्हाला थारा नाही. याच टेकडीच्या पायथ्याशी पाग्यांच्या वस्तीत, वरच्या बाजूला मी एक झोपडी बांधतो. याच टेकडीवरच्या मेढी, वेली वगैरे आणून वर गवत टाकून झाकतो. "

" मग खाणार काय ? "

" मी चिऱ्यांच्या खाणीवर कामाला जाईन. माती वगैरे काढायचं काम मिळेल, चिऱ्याचं पण काम शिकेन. "

पहिल्यांदाच मावशीला सदानंदची दया आली. " अरे, एवढ्या मोठ्या शेतकऱ्याचा मुलगा तू, आणि चिऱ्यांच्या खाणीवर कामाला जाणार आहेस ? "

"मावशी, मला कुऱ्हाड आणि कोयती आणून दे ग!"

मावशीने काहीशा मायेने जरा वेळ त्याच्याकडे पाहिलं आणि ती टेकडी उतरून जायला निघाली.

खाली पोचलेल्या मावशीला त्याने पुन्हा जोरात विचारलं, "मावशी, आणशील ना ग कुऱ्हाड आणि कोयती?"

मावशीने खालूनच उत्तर दिलं, "तू इथं असाच... नयेस म्हणून देईन आणून. झोपडी बांध नाहीतर तिच्या मानेवर घाल."

सदानंदबरोबर गेल्यापासून सुमती दुसऱ्यांदा माहेरी आली होती. सात-आठ वर्षांपूर्वी बाप्पा खूप आजारी होता, शुद्ध हरपली होती, तेव्हा ती येऊन दारातूनच त्याला बघून गेली होती. पण बाप आधीच मनात इतका राग बाळगून होता की त्याने शेवटपर्यंत तिचं तोंडसुद्धा पाहिलं नाही.

भावाच्या लग्नाला देखील तिला कुणी बोलवायला गेला नव्हता. पण मामाने हट्टच धरला, सुमतीला नाही बोलावलं तर मी पण लग्नाला येत नाही म्हणून! बिचारी सगळी कटुता गिळून एकुलत्या एका भावाच्या लग्नाला मोठ्या उमेदीने आली होती. पण कुणीच तिचा कसलाही मानपान केला नाही, करवलीचा म्हणून सुद्धा तिला मान दिला नाही, श्रीधरची एक मावसबहीण करवली झाली होती.

मंजुळाला सगळं ऐकून तिची खूप दया आली, तिच्याविषयी खूप आपुलकी वाटली. माहेरपणासाठी म्हणून तिला आठ-पंधरा दिवस आपल्यापाशी आणून ठेवावं असंही वाटलं. पण सासरा! त्याला कोण सांगणार? स्वतःच्या मुलीबद्दल हळहळ न वाटणारा माणूस तो.

एकदा शिद्दरला आलेल्या वेळी मंजुळाने आपल्या नणदेबद्दल हे सगळं सुमनला सांगितलं. एवढीशी पोर ती, पण ऐकून मुकाट्याने गप्प बसून राहिली. एरव्ही ती एखाद्या गोष्टीला किती फाटे फोडून, उसकटून किती प्रश्न विचारते, पण आज अगदी गप्प. जणू ती गोष्ट तिच्या हृदयाच्या अगदी तळाशी जाऊन बसली होती!

"बाय ग..." ती दुसरंच काहीतरी सांगू लागली, "काल ना त्या झाडावरचा एक पिकलेला आंबा पडला होता म्हणून मी धावत तो घ्यायला गेले. त्या बाजूने गोविंद धावत येत होता. मला ढकलून पुढे जाऊन त्याने तो आंबा घेतला ना ग. आणि मला चिडवत चिडवत आंबा खात होता. मला

अस्सा राग आला, मी नखांनी त्याला बोचकारलं. मला एकसुद्धा आंबा मिळू देत नव्हता, हावरट कुठला.''

''बायूल, नखं केवढी मोठी वाढवली आहेस ग तू? आणि त्यांनी तू गोविंदला बोचकारलंस? रक्त आलं असेल ना ग?''

''आलं तर!''

दुसरे दिवशी परत जायला म्हणून मंजुळा गेटपाशी आली. पाहते तर गोविंद आंब्याच्या एका फांदीवर चढला होता आणि ती फांदी घसाघसा हलवीत होता. खाली पडलेले आंबे गोळा करून सुमन आपल्या फ्रॉकच्या ओटीत ते भरून घेत होती.

''बायूल ग.'' सुमन बायची हाक ऐकताच ओटी सांभाळत धावत आली.

''काल भांडला होता ना ग तुम्ही?''

''मी कालपासूनच त्याच्याशी कट्टी केली होती, बोललेच नाही मी. पण तोच सकाळी येऊन म्हणू लागला, ''का ग बोलत नाहीस? मी आज आंब्याच्या झाडावर चढून पाहिजे तेवढे आंबे काढून देतो.''

''नवलाचीच पोरं बाई तुम्ही!''

गोविंद फांदीवर तसाच उभा होता. मंजुळाने हाक मारीत म्हटलं, ''गोविंद, उतर ना रे आता. पडशील बिडशील. आता भांडू वगैरे नका रे. उतर ना रे खाली?''

मंजुळाने नीट पाहिलं तर वर उभा राहिलेल्या ठिकाणी गोविंदाचे पाय लटलट कापताहेत आणि तो उगाच या फांदीला, त्या फांदीला हात घालतो आणि पाय खाली काढतो, वर घेतो. ती तशीच त्या झाडाच्या खाली गेली.

''उतरायला येत नाही का रे?''

सुमन म्हणाली, ''मघाशी वर चढताना देखील असाच घाबरत होता तो. पोट झाडाला घसटीत वर चढला.''

मंजुळावर सगळाच आकांत, ''अरे, चढता येत नव्हतं तर झाडावर कशाला चढलास?''

मग मंजुळाने त्याला धीर देत, या फांदीला हात घाल, पाय तिथं ठेव, असं सांगत खाली उतरून घेतला. तीसुद्धा झाडाखाली अशा जागी उभी राहिली की तो पडला तरी आपल्याच अंगावर पडू दे. तो उतरल्यावर मात्र ती त्याच्यावर चांगलीच रागावली, ''कशाला चढलास रे झाडावर, कळत नव्हतं तर?''

"ती सुमन बोलत नव्हती माझ्याकडे. म्हणून म्हटलं देतो तिला हवे तेवढे आंबे."

स्वतःच्याच पोटात पिकलेल्या पोरासारखा गच्च आवळून त्याला कवटाळावंसं मंजुळाला वाटलं.

मग ती दोघंही तिला पोचवायला तारीपर्यंत गेली.

लग्न झाल्यावर श्रीधरने आपल्या फौजेतल्या वरिष्ठांना लिहिलं, "माझं लग्न झालं आहे. क्वार्टर रिकामा असल्यास मी बायकोला घेऊन येतो. असल्यास बायकोसाठी रेल्वेचा पास पाठवून द्यावा." नवरा-बायको उत्तराची वाट बघत होती. रजा संपत आली होती. पण श्रीधर तिला सांगायचा, "खोली रिकामी असल्यास कळवल्याशिवाय राहणार नाहीत ते."

त्याचं युनिट सिमल्याला होतं. ते कुठं, काय वगैरे मंजुळाला काहीच माहीत नव्हतं पण नवऱ्याबरोबर जायला मिळणार म्हणून उत्कंठेने, वाऱ्यावर स्वार होऊन ती वाट बघत होती.

एके दिवशी श्रीधर खरोखरच एक पिवळा लखोटा घेऊन आला. वरिष्ठांनी त्याला बायकोला आणायची परवानगी दिली होती. बरोबर तिच्यासाठी रेल्वेचा पास देखील पाठवला होता. लखोटा नाचवीत, नाचवीत श्रीधर मंजुळाजवळ आला. मंजुळा आनंदाने मोहरून गेली, लहान मुलासारखी बालिश बनली.

"कुठं आहे तो सिमला गाव?"

"इथून पाच दिवसांच्या वाटेवर."

"आई ग! मग जायचं कसं?"

"दिल्लीपर्यंत चार दिवस रेल्वेने. तिथून पुढे बस."

"चार दिवस रेल्वेने? मग आंघोळ, जेवण कुठे करायचं?"

"रेल्वेतच."

"काय?"

"हो, तर."

"कशी असते ती रेल्वे?"

"कधी कारवारला गेलीस त्या वेळी एस.टी. पाहिली आहेस? तशा वीस-पंचवीस गाड्या एकत्र बांधल्या तर कशा दिसतील? तशीच असते रेल्वे. ती लोखंडी रूळांवरून धावते. आतमधेच पाणी, जेवण सगळं मिळतं."

मंजुळाचं डोकं गरगरलं. शिद्दरच्या बाहेर अशी ती फक्त दोनदा कारवारला गेली होती; होडीतून. एकदा विष्णूबाबच्या लग्नाला आणि दुसऱ्यांदा मावशीकडे.

बायूल लहान, तिला सोडून कुठं आणि कशी जाणार? आई गेल्यापासून आपा तर कुठेच जायला तयार नव्हता.

''पण रेल्वे कुठं जाऊन पकडायची, ते नाही सांगितलंस तू?''

''पूर्वी मी हुबळीला जाऊन पकडीत असे. पण आता गोव्याहून सुटते ना. मडगाव आता जवळ पडतं.''

मंजुळाला आता दुहेरी आनंद, बरोबरच गोवाही बघायला मिळणार तर!

तिला दिल्ली-सिमल्यापेक्षा गोव्याविषयी जास्त उत्सुकता होती. गोव्याविषयी तिने काय काय नवलकथा ऐकल्या होत्या! तिथल्या मोठ्या मोठ्या बायकासुद्धा फ्रॉक घालतात म्हणे. कुणीतरी तसं तिला सांगितलं होतं. तिथले ते फिरंगी, त्यांचे ते हंटर अजूनही आहेत असं तिला वाटायचं. पण क्षणार्धात डोक्यावरनं घुबड उडून गेल्यासारखा एक विचार तिच्या मनात आला.

''पण तू बाप्पाला सांगितलंस?''

''नाही. पण सांगायला हवं. संध्याकाळी सांगेन.''

मंजुळाच्या मनात सारखी धाकधुक. काय म्हणेल सासरा? बायकोला घेऊन जा म्हणेल? त्याने नको म्हटलं तरी मी जाणारच. पिशवी हातात घेऊन त्याच्या पाठोपाठ जाईन, कशीच नाही राहणार मी!

ही बातमी इतक्या लवकर गावभर पसरली की घरामागची पार्वती-अक्का तिला आपल्या गॅलरीतूनच खुणांनी काही विचारीत होती, चेष्टेने हसत होती. मंजुळा पण खूप हसली. हातवारे करीतच आपण जाणार असल्याचं सांगितलं.

मुका देवाप्पा दुपारच्या रखरखातून चालत, घामाने भिजून आला. डोक्याचं फडकं काढून त्याने तोंड पुसलं आणि आपल्या कांबळीची घडी खाली घालून तो पडवीत बसला. अगदी चांगली वाचा असलेल्या माणसाशी बोलावं तसं खुणांनी श्रीधर त्याच्याशी बोलत होता.

मंजुळाने विचारलं, ''कोण तो? काय म्हणतो ते कळतं तुला?''

''अग, हा आपला देवाप्पामामा. खाली ते कौलारू छपराचं एकच घर दिसतं ना तिथं तो एकटाच राहतो. कुठून कुठून लोक येतात, त्याला बोलावून न्यायला. नुसती पाठीवर थाप मारून बैलाचं अंग शहारलं की अचूक निदान करतो त्याला काय झालं आहे त्याचं.''

मंजुळाने त्याला नीट न्याहाळलं. बेंबीपर्यंत पोचणारा एक अरुंद शर्ट त्याने घातला होता. करगोट्याला लंगोटी लावली होती, तिचं एक लांब टोक तो उभा राहिल्यावर जमिनीला लागत होतं.

त्याने येताना एक मोठी काकडी आणली होती. ती त्याने मंजुळाच्या हातात दिली आणि ओठ हलवत, हाताच्या खुणांनी बरंच काय काय सांगितलं. मंजुळा हातात काकडी घेऊन हसत तशीच उभी राहिली. श्रीधरने म्हटलं, "अग, तो सांगतो छानपैकी तवसळी कर आणि मलाही थोडी दे. गुरांना बघायला नेलं होतं तिथं कुणीतरी त्याला ही काकडी दिली म्हणे. आणि मला म्हणतो, तुला चांगली बायको मिळाली आहे, फुलासारखी सांभाळ म्हणे तुला."

मंजुळाला खूप हसू येत होतं. ती आत गेली आणि परवा माहेरून येताना मुगाचे लाडू आणले होते त्यातले दोन देवाप्पाला आणून दिले. ते खाऊन तो पाणी प्यायला आणि खांद्यावर कांबळं घेऊन निघून गेला. सासरा हातात कोयती घेऊन बागेत काहीतरी करीत होता. घशातून नुसताच आवाज काढीत देवाप्पा सासऱ्याशी काहीतरी बोलत होता. सासरासुद्धा मोठमोठ्याने त्याला काहीतरी सांगत होता आणि मधेच एखादी घाणेरडी शिवी हासडीत होता. श्रीधर म्हणत होता, "या दोघांचं असंच, मोठमोठ्याने, रागारागाने एकमेकांशी बोलायचं, मधे मधे शिव्याही द्यायच्या. पण देवाप्पा चांगला माणूस, बरं का मंजूळ. कुणाच्याही हाकेला धावतो, कुणालाही उपयोगी पडतो. कधी चांगलंसं काही बनवलंस तर थोडी आमटी, भाजी त्याला पोचव. बिचारा एकटाच राहतो."

मंजुळाला आता वेगळीच हुरहुर लागली होती. सासऱ्याच्या मनात काय असेल बरं! नवऱ्याबरोबर मला जायला देईल का तो?

संध्याकाळी नवरा जवळ आला तर दारूची घाण तोंडाला.

"दारू कशाला प्यायलास?"

"एवढीशीच रम घेतली ग, तुझ्यासाठी. बाप्पाला सांगायला हवं ना?"

"पण त्यात घाबरायचं काय एवढं? मी बायकोला नेणारच म्हणून सांग."

"अग, तू बाप्पाला ओळखत नाहीस. एकच महिना झाला आहे आपल्या लग्नाला. तू काय पाहिलं आहेस अजून? लहानपणी एकदा मी आणि माझा मित्र पुंडलिक, दोघांनी मिळून त्या कोपऱ्यावरच्या माडाची चार शहाळी काढली आणि शेतात बांधाच्या बाजूला नेऊन फोडून खाल्ली. सालं तिथंच राहिली. त्यावरून त्याने शहाळी आपल्याच माडाची म्हणून बरोबर ओळखलं. मग घे शिव्यांचा हा भडिमार! तेव्हा गावातलाच सुब्बू नावाचा एक माणूस गावातले नारळ वगैरे चोरायचा. बाप्पा त्याला विचारायला गेला तेव्हा त्याने सरळ सांगितलं, 'तुझ्याच मुलाने शहाळी काढून खाल्ली आहेत आणि वर मलाच

विचारतोस ? '

" सुब्बूला हे कसं समजलं कोण जाणे, पण बाप्पाने मला असा जबरदस्त चोप दिला की साऱ्या अंगभर वळ उठले होते. सुजून अंग ठणकत होतं. देवाप्पामामा धावत आला आणि मला सोडवलं आणि कुशीत घेऊन बसला. त्या रात्री मी त्याच्याच जवळ झोपलो होतो तेव्हा त्याने हातवारे करीत, घशातून आवाज काढीत बाप्पाला खूप शिव्या दिल्या होत्या. तेव्हापासूनच त्यांच्यात हे मोठमोठ्याने शिव्या देणं चालू झालं आहे म्हणायला हरकत नाही. पण त्यांच्यामध्ये राग मात्र कसलाच नसतो हं. गावात बाप्पाला सुनावणारा असा हा एकच माणूस असेल. एरव्ही कुणाची ताकद नाही, बाप्पाविरुद्ध बोलायची. "

" पण तू बाप्पाला सगळं नीट सांगशील ना ? "

" हो. "

" नको म्हटलं तर काय करशील ? "

" बघू. "

मंजुळा एकदम सैरभैर ! हा तर अगदीच घाबरतो. सासऱ्याने नको म्हटलं तर... !

संध्याकाळी बाप्पा हातपाय धुऊन येऊन त्या चामड्याच्या खुर्चीत बसला तेव्हा श्रीधर हळूच म्हणाला, " एक खोली खाली आहे म्हणे. रेल्वेचा पासपण आला आहे. तिला घेऊन जातो मी. "

बाप्पा काही क्षण गोंधळात पडल्यासारखा त्याच्याकडे बघत राहिला. मग एकदम खेकसला, " जा, जा. घेऊन जा तिला. तिनेच पुढं काढलं असेल तुला. इतकी वर्षं हे शेतजमिनीचं काम माझ्या डोक्यावर ! मीच शिजवून खायचं, एकट्याने ! मला तरी कशाला हवाय हा संसार ? पडू दे सगळं पाड, जमीन-शेती पडू दे ओसाड ! "

बाप्पाचा आवाज इतका चढला की ती दोघंही घाबरून गेली.

" तसं नव्हे बाप्पा. सिमल्यातलं आमचं हे शेवटचं वर्ष. मग आम्ही कदाचित सरहद्दीवर जाऊ. "

" शेवटचं वर्ष म्हणे ! अरे, आत्ताच म्हातारा नाही झालास तू. आयुष्य संपलं नाही तुझं. बाप्पा मेला की बस कायमचा मिठी मारून बायकोला. बरी नव्हेत ही चिन्हं, एक दिवस माती खावी लागेल ! "

" पण बाप्पा... "

" बोलू नकोस आणखी वर. जा, जा तू बायकोला घेऊन. बाप्पा मरू दे मेला तर ! "

तो तडक उठून बाहेर गेला. श्रीधरने लगबगीने बाहेर येऊन पाहिलं. तो काळोख तुडवीत गेटमधून जात होता. त्याने मनात म्हटलं, हा आता देवाप्पामामाकडे जाऊन कसलं तरी भांडण काढून बोंबलत बसणार नाहीतर गव्हाणीत जाऊन बैलांच्या शेजारी बसून राहणार.

मंजुळा घरात भिंतीला टेकून गप्प बसली होती. श्रीधरने काही विचारल्यास ती हूं का चूं करीत नव्हती. त्याने आतला चिमणीचा दिवा आणून पडवीत ठेवला आणि पडवीतला कंदील उचलून तो '' बाप्पा, बाप्पा '' म्हणून हाका मारीत बाहेर पडला.

लग्नानंतर पहिल्यांदाच मंजुळा एवढ्या मोठ्या घरात एकटी बसली होती. मती कुंठित झाल्यासारखी सुन्न होऊन भय-भीतीशिवाय ती तशीच बसून होती. बाहेरचं दार बंद केलंय का उघडं आहे याचं देखील तिला भान नव्हतं. खरं तर सासऱ्याचा इतका राग आला होता तिला....

श्रीधर कंदील घेऊन देवाप्पाच्या घराजवळ पोचला. तो ताटभर पेज व एक कैरी घेऊन जेवायला बसला होता. आधी त्याने बाप्पाची चाहूल घेतली, बाप्पा नव्हता.

'' देवाप्पामामा, रात्रीची पेज का जेवतोस ? ''

देवाप्पाने घसा खरडीत, '' आवो, आव, आव '' असा विचित्र आवाज काढला. श्रीधरला क्षणभर तो रडतोच आहेसं वाटलं. मग खुणांनीच त्याने सांगितलं, '' हे रांधायचं, वाढायचं, भांडी घासायचं वगैरे पुरुष माणसाचं काम नव्हे, बाबा. त्यापेक्षा ही पेज बरी. ''

श्रीधरच्या काळजात चर्र झालं. तो तिथून बाहेर पडला. मागून देवाप्पाचा आवाज आला. श्रीधरला समजलं, '' हा रात्रीचा कुठं जातो म्हणून विचारतो, ''तो उत्तर न देताच शेतातल्या गवाणीशी आला. तिथं आढ्यावर बाप्पा बसलेला होता.

'' आपण घरी जाऊ या, बाप्पा. ''

'' बाळू, तुला सांगतो. यापुढं मी शेताचं काम मुळीच अंगावर घेणार नाही. तशीच पडीक होऊ दे जमीन, नाहीतर कोणतरी खाऊ दे! ही बैलांची जोडी पण विकून टाकतो. ''

'' बाप्पा, तिला नाही मी बरोबर नेत. ''

'' ने तू. घेऊन जा. माझ्यामुळं अडून राहू नकोस. माझं एकट्याचं काय ? शिजवायचं चुकलं नाही मला. तुझ्या आईच्या मरणानंतर वीस वर्षं शिजवून खातोय. पूर्वी तुला पण शिजवून घालीत असे. आता एकटाच खातो ! ''

“नाही बाप्पा. खरंच नाही नेणार मी तिला. तू सांगितलंस तरी नाही नेणार”

बाप्पा उठला. मूकपणेच श्रीधरच्या पाठीमागून घरी आला.

दुसरे दिवशी अख्खा दिवस बाप्पा झोपून होता. मधेच आजारी माणसासारखं कण्हत होता, खोकत होता. पण मंजुळाने अजिबात त्याची विचारपूस केली नाही. दिवसभर ती रुसलेलीच होती.

दोन दिवस असेच गेले. सगळेच मुकाट्याने वावरत होते. कुणीच कुणाशी नीट मोकळेपणी बोलत नव्हतं. परत ज़ायला चार दिवस बाकी असताना मंजुळाने नवऱ्याला म्हटलं, “जायच्या आधी एक दिवस शिद्दरला जाऊन येऊ. बायूल वाट बघत असणार.”

श्रीधर एकदम खेकसला, “आणखीन कशाला? अजूनही पाच परतवण्याचा सोहळा राहिला आहे का? कुठं जायचं नाही. परवा मी उठून चालायला लागतो. आणि तुला सांगून ठेवतो, तुझे जास्त नखरे नकोत. बाप्पा सांगेल ते ऐकायचं आणि मुकाट्याने इथंच राहायचं. बाप्पाच्या परवानगीशिवाय कुठं जायचं नाही की यायचं नाही.”

मंजुळा पुढं काहीच बोलली नाही. नवऱ्याच्या या रागाला तिला बाप्पाचा वास आला. ह्याच्या नाकाचा शेंडापण बाप्पासारखाच लांबट आणि लाल आहे, ह्याला देखील बाप्पासारखाच राग येऊ शकतो. यापुढे ह्या बापलेकाच्या मधे मुळीच पडायचं नाही.

जायच्या दिवशी सकाळपासून तो खूप अस्वस्थ होता. त्या रात्री रात्रभर तो तिला कवेतच घेऊन होता; मुकाट्यानेच मंजुळा त्याला बारकाईने न्याहाळीत होती. त्याच्या चेहऱ्यावरचं सावट बघून तिचा जीव वरखाली होत होता. “तुझ्या बरोबर यायचं खूप खूप मनात होतं रे माझ्या!”

तो जाताना दरवाज्याच्या चौकटीला धरून ती उभी होती, अंगणापर्यंत सुद्धा ती गेली नाही. आणखी दोन पावलं टाकून त्याच्याजवळ गेल्यास आपण नक्कीच रडू असं तिला वाटत होतं. प्रेमाचा, ताटातुटीचा एखादा शब्द बोलेन म्हटलं तर हा सासरा समोर उभा. तो गेला आणि मंजुळाला वाटलं, अजून कितीतरी बोलायचं, सांगायचं राहिलं आहे. मनात सारखी धुगधुग, अतृप्ती.

सासरा त्याला घेऊन लाँचमध्ये बसवायला बंदरापर्यंत गेला होता. त्याला बसवून तो लगेच परत आला. अगदी मधाळ शब्दांत तो मंजुळाला सांगत होता, “लाँच लगेच मिळाली, जागा ही मिळाली बसायला. तुझा बाप आला होता बंदरावर. खाऊची एक पिशवी दिली आहे त्याने श्रीधरला. म्हणत होता,

त्याच्या धाकट्या मुलीने म्हणे जात्यावर दळून मुगाचे लाडू केले.''

आता मात्र मंजुळाला छाती फुटून रडू आलं. ती त्वरेने आत गेली.

थोड्या वेळाने सासऱ्याने तिला हाक मारली नि म्हटलं, ''लग्नाच्या गडबडीत शेताचं काम तसंच राहिलं आहे. लोकांनी शेतात लावणीदेखील सुरू केली आणि आपण अजून खतही घातलं नाही. जा, पाट्या घेऊन ये. मी गायरीतून खत भरून देतो, तू नेऊन शेतात घाल.''

साऱ्याची पाटी डोक्यावर घेऊन जाताना मंजुळा सिमल्याची वाट मोजीत होती. हळग्याच्या लाँचमधून गडावर जायचं. गडावरून बसने गोव्याला. गोव्याहून आगगाडीने दिल्लीला. आगगाडीतच जेवण, आंघोळ. मग दिल्लीहून सिमल्याला कसं जायचं म्हणाला होता तो.... आठवतच नाही. सिमल्याला म्हणे कसली तरी छान फळं मिळतात. काय बरं त्यांचं नाव....

पाठीमागे गायरीत उभा असलेला सासरा जोरात ओरडून सांगत होता, ''अग, जरा भरभर पावलं उचल.''

पण मंजुळाच्या पायात कसलंच त्राण उरलं नव्हतं!

सासरा पट्टीचा शेतकरी होता. मोठ्या शेतीचा मालक म्हणून नव्हे पण असलेलं शेत खूप मेहनत घेऊन कसोशीने तो पिकवीत होता. बाराही महिने नुसता शेतात खपायचा. कसताना नांगर उभा घालून माती वर काढून घालायचा. बैल दमून जायचे आणि ही माती वर पडायची. शेतात गवताचं एकसुद्धा पातं दिसायचं नाही. बायकांचं, पुरुषांचं, शेतातली सारी कामं एकटाच करायचा. जोत सोडल्यावर हातात ढेकळे घेऊन फोडायचा. डोक्यावर ओझं घेताना सुद्धा अगदी वाघच. जमिनीवर गुडघे टेकून भाताच्या गोणी, गवताचे भारे एकटाच उचलून घ्यायचा. कधी कामाला कुणी माणसं लावलीच तर त्यांच्यावर सारखं खेकसायचा म्हणून त्या बायका त्याच्याकडे कामाला यायला कां कूं करायच्या. म्हणायच्या, म्हाळूमामाकडे कामाला जाण्यापेक्षा आपण गप्प, उपाशी झोपू.

आता तो साठीला आला होता पण कामाचा उरक जरासुद्धा कमी झाला नव्हता. पण शरीराची शक्ती जरा कमी झाल्याचं जाणवत होतं. एखाद्या दिवशी कामाचा भार जरा जास्तच झाला तर रात्री तो कण्हायचा. पोटऱ्या चेपून घ्यायचा. पूर्वी नाल्याजवळच्या शेतातलं ओझं तो एकाच खेपेत घरी आणून पोचवायचा पण आता त्याला मधे टेकायला लागायचं. म्हणून कदाचित त्याला वाटत असावं, आता आपल्याला ह्या शेतकामासाठी कुणाची तरी मदत हवी. मंजुळा तर आयतीच त्याच्या हातात सापडली होती.

पण मंजुळाचा जीव तो केवढा? तशी ती मनाने, कर्तृत्वाने खंबीर.

पण एवढासा तिचा देह. काम करायची उमेद होती पण ताकद पुरत नव्हती. खताची एक पाटी शेतात नेईपर्यंत तिला दम लागायचा. पण तिने ठरवलं होतं, होईल तसं करायचं पण सासऱ्याच्या एकही शब्द खाली पडू द्यायचा नाही.

तशी माहेरी आपाने तिला सपाटून काम करायला कधीच लावली नव्हती. अधूनमधून शेतातली लहान-सहान कामं ती करायची पण त्यात लक्ष कधीच घातलं नव्हतं. इथं सासऱ्याने सगळंच तिच्या माथी मारलं होतं. तो शेतात जायला निघाला की हिनेपण त्याच्या मागोमाग... घेऊन जायला हवं. जरा कमीजास्त झालं की त्याची बोंबाबोंब. लग्न झाल्यापासून सहा-सात महिन्यांनंतर ती एकदाच सासऱ्यावर फणफणली होती, तेच निस्तरेपर्यंत जीव नकोसा झाला. सासरा आंब्याजवळच्या शेतात कसत होता. मंजुळाच्या हातात खोरं देऊन त्याने तिला कोपरे, कडा वगैरे खणायला सांगितलं. मंजुळाला बिचारीला खोरं कसं धरायचं तेसुद्धा ठाऊक नव्हतं. तरी तिने कसंबसं ते कोपरे, कडा वगैरे खणून टाकलं. इतकं होईपर्यंत उन्ह रणरणू लागलं होतं. सासऱ्याने तिला मातीचे ढेकळे फोडायला सांगितलं. तिने एक ढेकळा मारला तर तो एकदम दगडाला आपटल्यासारखा उडाला, हात दुखावला. त्या भिरभिरीतच तिने म्हटलं, "धरतीची छाती फोडून कशाला कसायला हवं? हा एकेका पाषाणासारखा ढेकळा फोडणं मला जमणार नाही."

ती गेली आणि मेरेवर गप्प बसून राहिली. उन्ह लागू नये म्हणून पदर आड धरला.

सासरा भडकला, "जमणार नाही म्हणे! दळभद्री जाऊन बसली आहे बघा कशी! मोठी नोकरदाराचीच मुलगी ना तू शेताचं काम न यायला?"

"गावाशिवाय तूच एकटा शेतकरी! काय हे रक्त शोषून घेणारं राबवणं?"

"हो ना. माझ्याकरताच करतो मी हे सारं. उद्या मीच खाणार."

"कुणाकरता करतो आहेस तर? आमच्याकरता नकोच. असू दे तसंच. पडू दे पडीक ते शेत!"

इतकं म्हटलं मात्र, तो रागाने बेभान झाला आणि पुरुषभर उंच उडालाच. "कुणाचं शेत पाड घालायला निघाली आहेस ग? तुझ्या बापाचं घाल. हे शेत पाड घालायला तुला आणलेली नाही. यापुढे शेताचं नाव काढलंस तर थोबाड फोडून टाकीन!"

त्याचा जोरजोरात आरडाओरडा सुरू झाला. आजूबाजूच्या शेतात लोक

काम करीत होते आणि ह्याची बोंबाबोंब. मंजुळा शरमेने मरायला टेकली.

शिव्या देत देतच त्याने जोत फिरवलं. मग कानी काढून जोत सोडलं. बैलांच्या पाठीवर काठी मारून त्यांना पळवलं. नांगर, जू तसंच शेतात टाकून शिव्या देत देतच तो निघून गेला.

बाजूच्याच शेतात गोपीने जोत बांधलं होतं. त्याला सांगून सासरा पुन्हा शिव्या द्यायला लागला. त्याचंच सागंणं खरं मानून गोपीने री ओढली.

“ शिद्दरच्या मुली तशाच, मस्त ! ”

मंजुळाला तिथं बसून रडायला देखील तोंड नव्हतं. ती उठली. नांगर, जू उचललं आणि घरची वाट धरली. डोक्यावर जू, एका हातात खोरं दुसऱ्या हातात मातीचा ढेकळा... घरी पोचेपर्यंत ती कासावीस झाली. अंगावरून घामाच्या धारा वाहू लागल्या. डोक्यावरचे केस, अंगातला पोलका, सारे घामाने चिंब भिजले. नऊवारी लुगड्याचा बोंगा जमिनीवर लोळत होता. तिने ती सगळी अवजारं नेऊन गव्हाणीत टाकली आणि धडपडत ती घरात गेली आणि आतल्या खोलीत गप्प झोपून राहिली. ती किती वेळ तशीच झोपली तिला पत्ताच नव्हता भानावर आली तेव्हा सासरा समोर उभा राहून म्हणत होता, “ अग कावेरी, डोक्यावरनं दिवस कलंडला ना ग, झोपूनच आहेस ? पेज नाही वाढणार ? ”

मंजुळाच्या डोळ्यांतल्या बाहुल्या हलल्या, “ हा कोण अनोळखी माणूस ? मला अनोळखी नावाने का हाक मारतो ? ”

सासऱ्याची सावली तिच्या डोळ्यात हलली. हा तर माझ्या नवऱ्याचा बाप ! ती उठली आणि स्वयंपाकखोलीत गेली. चुलीवरच्या पेजेचा उतून उतून भात झाला होता. घाईघाईने थोडं पाणी तापवून तिने पेजेत घातलं. सासऱ्याला ताट भरून पेज वाढली, कालचं तारल्यांचं थोडं कालवण होतं ते तोंडी लावायला दिलं.

पेज जेवायला बसल्या ठिकाणीच सासरा म्हणत होता, “ दुपारी जेवायला काय करणार आहेस ? पेजेलाच उशीर झाला. आता आणखी काही करू नकोस. रात्रीसाठी मात्र अर्धा शेर तांदूळ दळून भाकऱ्या कर. मी पाग्यांच्या वाडीवर जाऊन थोड्या कुंड्या मिळतात का बघून आणतो. भाकऱ्यांबरोबर त्यांचं दबदबे ! तुझ्या नवऱ्याला खूप आवडतं. ”

बाहेरच्या बाजूला भिंतीला टेकून बसलेली मंजूळ मनात म्हणत होती, उंदराला खेळवल्यासारखं खेळवायचं आणि वरून काहीच घडलं नाही असं वागायचं. दुसऱ्यांच्या काळजावर घाव घालायचा पण याला त्याचं काहीच

नाही. शब्दा शब्दाला खेकसायचं आणि काम अडून राहू नये म्हणून मधाळ बोलायचं.

कशाला एवढा मर मर मरतोय हा? कुणाला खायला, कुणाला पोसायला? कशाला ही कंजूषी? काटकसर? बागेतली फुलंसुद्धा विकून टाकतो. केवढा मोठा सुरेख केळ्यांचा घड होता! केळी पिकून पिवळी झाली होती. एक तोडून खावं असं मंजुळाला खूप वाटलं होतं पण त्याने तो परस्पर विकून टाकला. मंजुळाचा चडफडाट झाला.

लग्न झाल्यापासून ती अबोलीची आळी शिंपत होती. फुलं यायला लागली तशी त्याने ती रोज खुरडून नेऊन तुळशी फुलवालीला विकावी. एक दिवस वेणी करून मंजुळाने डोक्यात घातली तर बारीक न्याहाळीत म्हणाला, ''सकाळी माळायची नि संध्याकाळी कोमेजून जायची. त्यापेक्षा विकल्यास चार-आठ आणे तरी मिळाले असते!''

नवऱ्याची महिन्यातून दोन तरी पत्रं यायची सासऱ्याच्या नावाने. त्याने ती खिडकीजवळ नेऊन त्या उजेडात वाचायची. मनातल्या मनात वाचून आकड्याला टोचून ठेवायची, त्यातला एकही शब्द सुनेला सांगायचा नाही. मंजुळाला खूप वाटायचं, विचारावं. माझ्यासाठी काही लिहिलं आहे का म्हणून.

शेजारचा एक दहा-बारा वर्षांचा सुभाष नावाचा मुलगा अंगणातून वगैरे जाताना मोठ्या प्रेमाने 'वैनी' म्हणून हाक मारायचा पण तो कधी घराच्या आत येत नसे. एक दिवस मंजुळाने त्याला आत बोलावलं. तो जरा बिचकतो असं वाटल्याने त्याला हाताला धरून आत आणलं.

''सुभाष, तुला कानडी वाचता येतं का रे?''

''मी सातवी कानडीतूनच शिकतो ना, वैनी!''

मंजुळाने त्या तारेच्या आकड्यावरची पाच-सहा पत्रं आणून त्याच्यासमोर धरली नि म्हटलं, ''वाचून दाखव ना रे, मला ही. माझं नाव आहे का बघ त्यांत.'' त्याने ती उलटून पालटून वाचली. ''वैनी, तुझं नाव काय ग?''

''मंजुळा.''

''मग कावेरी म्हणजे कोण?''

''मीच.''

''सगळ्या पत्रांतून कावेरीला आशीर्वाद सांगावा म्हटलं आहे.''

ऐकून मंजुळा अगदी वेडावलीस. आत जाऊन लगबगीने खोबऱ्याचा तुकडा आणि गूळ आणून तिने सुभाषच्या हातात दाबला. तो खात खात निघून गेला.

कावेरी म्हणे कावेरी! बाप्पाने सांगितलं म्हणून काय झालं? ह्याने मला कावेरीच म्हणायला हवं? माझं मंजुळा नाव किती छान आहे? आता येऊ दे तर खरा. कावेरी म्हणून हाक मारली तर मी ' ओ 'च देणार नाही.

सासऱ्याला त्याला एक गोष्ट लिही म्हणून सांगायला हवं, दारूला कधी शिवू नको म्हणून. पण त्याच्याकडे काही सांगायची सोय आहे का? चुकलंच माझं, जातानाच त्याला शपथ घालायला हवी होती, माझ्या नाहीतर त्याच्या मेलेल्या आईची!

बाहेरच्या खोलीतून स्वयंपाकघराकडे जाताना डावीकडे एक खोली होती, काळोखी अन् जमिनीवर खड्डे पडलेली. तिथली चिऱ्यांची भिंत इतकी उंच होती की आत गेल्यास अख्खी खोलीच अंगावर कलते असं वाटायचं. तिथं कोपऱ्यात एक शिसवी पलंग होता. त्याचा एकेक खूर म्हणजे जसा काही हत्तीचा पायच! पण तो खूप जुना आणि मळकट झाला होता. त्याच्यावर इतकी धूळ साचली होती की कितीतरी वर्षं ती झाडलीच गेली नसावी. बहुतेक वेळ ती खोली बंदच असायची.

सासरा कधी कधी त्या खोलीत जाऊन नुसताच गप्प उभा राही, भिंतीशी तोंड करून कधी कधी एक हात भिंतीवर आणि तो आपला गप्पच उभा! माशांचे खवले असल्यासारखी सुरकुतलेली पाठच तेवढी दिसायची. मंजुळाला उगाच भीती वाटायची, आत्ताच हा आपलं डोकं त्या भिंतीवर आपटून जीव तर देणार नाही ना, असं वाटायचं. पण त्या खोलीत त्याच्याजवळ जायची कधी हिंमत झाली नाही तिला.

हुळग्याला म्हास्तीची जत्रा होती, त्याच्या आदल्या दिवशी एक वयस्कर अशी बाई फाटकाच्या पलीकडून अंगणात असलेल्या मंजुळाला खुणांनीच काहीतरी विचारीत होती. मंजुळा " काय " म्हणून विचारीत जवळ गेली.

" तो आहे का, तो? "

" कोण? "

" तुझा सासरा ग! "

" नाही. सोडणं घेऊन गेला आहे, कुजत टाकायला. "

घाबरत घाबरतच ती बाई आत आली. अशी का एवढी घाबरते आहे ही? मंजुळाला कळेना. " काय ग, कुठून आली आहेस तू? "

" मी तुझ्या सासूची धाकटी बहीण, ती असताना यायचे मी अधून मधून. तिची आठवण आली की कधी कधी उमाळा येतो ग इथं यायचा.

पण मुद्दाम येणं झालं नाही. नातू आजारी पडला तेव्हा न्हास्ती आईला नवस बोलले होते, डोक्यावरच्या केसांनी तुझं अंगण झाडीन म्हणून. उद्या जत्रा ना, मग आज नवस फेडून आले. म्हटलं, जाता जाता बायच्या सुनेला पण जरा बघून यावं.'' तो काळ असताना मी कधीच येत नाही.''

''कशाला?''

''असंच. श्रीधर बरा आहे ना?''

''हो.'' मंजुळाने तिच्या केसांकडे पाहिलं, पांढरे-काळे दाट केस होते. ते मोकळे सोडले होते, त्यात कचरा घुसला होता. मंजुळाला तिचे ते केस खरंच झाडूसारखे वाटले, आपले केस इतके भरगच्च आहेत म्हणूनच कदाचित तिने तो नवस केला असावा.

ती बाई घरभर फिरून आली. त्या काळोख्या खोलीकडे आल्यावर ती दचकून गप्प उभी राहिली. बाहेर पडवीत आल्यावर ती म्हणाली, ''तो अवलक्षणी पलंग अजून तिथंच आहे? जाळून का नाही टाकला तो?''

''असं का म्हणतेस तू?''

इतकी वयस्कर बाई ती, पण कित्येक वर्षं दाबून ठेवलेली भीती काळजातून बाहेर येऊन चेहऱ्यावर पसरली. शेवटी हे कुणाला तरी सांगायला हवं, मन मोकळं करायला हवं अशा एका आंतरिक भावनेने ती नकळत बोलायला लागली.

''त्या शिसवी पलंगावरनं पडून मान मोडून बायचा पहिला मुलगा गेला, त्या बाळंतपणाच्या वेळेस मीच होते इथं. सहा महिन्यांचं ते मूल, रडत रडत अगदी कडेला पोचलं. वरून खाली पडल्यावर डोकं आपटलं. उचलला तेव्हा मानच नीट राहत नव्हती. दुसऱ्याच दिवशी तो गेला. बाय त्या पलंगाजवळ जायला देखील घाबरायची. रागाने नवऱ्याला म्हणायची, 'तोडून, जाळून टाक तो पलंग.' पण नवरा कसला, त्याने बायचं काहीच ऐकलं नाही.

''मग सात वर्षांनी श्रीधर झाला. बाय त्याला अगदी छातीशी चिकटवून घेत स्वयंपाकखोलीतच झोपायची. पण श्रीधर वर्षाचा असताना परत एक अरिष्ट कोसळलं. तेव्हा पण मीच होते इथं. मी सगळ्यात धाकटी बहीण, बायच्या आठवणीने परत परत धावून येत असे.

''हा काळ बायला खूप त्रास द्यायचा ग! कधी कधी मारायचा देखील. बागेत घे एवढ्या केळीचं बन होतं. एक दिवस एका वाटसरूने मागितले म्हणून बायने त्यातले दोन केळंबे उपटून त्याला दिले. हा काळ रानात गेला होता. आल्यावर काटक्यांचं ओझं अंगणाच्या कडेला टाकून विहिरीवर जाताना त्याला केळंबे उपटलेले दिसले. त्याने लगेच विचारलं, 'केळंबे कुठं गेले?'

" बायने म्हटलं, ' दिले एका वाटसरूला. म्हटलं, असू दे, अशाच केळींची आणखी बाग बहरेल. '

" ह्या काळाने त्या काटक्यांतली एक काटकी काढली आणि बायच्या दिशेने फेकून दिली. ती नेमकी तिच्या डोक्याला लागली आणि एवढी मोठी खोक पडली. रक्ताचं थारोळं झालं. मी किंचाळी ठोकली. त्याने येऊन मग बायला धरली आणि आत नेऊन त्या नष्ट्या पलंगावर झोपवली.

" बाय बेशुद्धच होती. जरा शुद्धीवर आली की मुक्यानेच खुणांनी आपल्याला त्या पलंगावरून काढ म्हणून विनवायची. पण त्याने अजिबात तिला त्या पलंगावरून काढली नाही की मलाही त्या खोलीबाहेर तिला आणू दिलं नाही. याचं साऱ्या गावाशी भांडण आणि वैर. त्यामुळं बायची ही अवस्था कुणाच्या नजरेस पडेल म्हणून घाबरत होता. आणि त्यामुळेच त्याने डॉक्टरला पण आणलं नाही.

" बाय आत पडलेली असताना त्याने सेवा मात्र खूप केली हं तिची. पण फुटलेलं डोकं, घायाळ झालेलं मन आणि तो करंटा पलंग यापायी बाय क्षणाक्षणाने मरत होती. महिन्याच्या आतच तिचा अंत झाला. ती मेल्यावर तिच्या उशीपाशी समई लावतेवेळी तिला पाहिलेली अजून आठवते ग ! तिची खोक बरी झाली नव्हती, तिच्यावरच्या औषधांचा लेप तसाच होता. शरीर पोखरून गेलं होतं. मला अजूनही वाटतं, तिला त्या पलंगावरून काढली असती तर ती अशी गेली नसती. "

ते ऐकून मंजुळा अवाक् झाली. भीतीने तिची छाती गलबलून गेली. हळूहळू ती सगळ्या भावना एकवटून सासूच्या त्या अदृष्टात खोल खोल शिरली. कल्पनेनेच ते सारं अनुभवलं. त्या दुःखात ती पूर्ण बुडाली. तिला ते स्वतःचंच दुःख वाटलं आणि ती मनाने थोडीशी खंबीर झाली.

ती बाई जायला निघाली. मंजुळा घाईघाईने आत जाऊन त्या खोलीला कडी घालून आली. ती बाई अंगणात पोचल्यावर तिला म्हणाली, " कधी, अशीच ये ना, राहायला म्हणून. "

" श्रीधर माझ्या बहिणीचा मुलगा, आणि मी त्याची मावशी. पण नाती एकदा दुरावली म्हणजे यायला जड जातं. ना माझ्याकडे येणं ना तुझ्याकडे जाणं असं का व्हावं या प्रश्नाला उत्तर नाही. बाय असती तर गोष्ट वेगळी होती. त्यात हा काळ ! "

ती अंगणात पोचल्यावर मंजुळाच्या एकदम लक्षात आलं. तिचे केस तसेच मोकळे सुटलेले आहेत. तिने म्हटलं, " इथं ये ना, केस विंचरून देते. "

"बरं बाई." म्हणत ती येऊन बसली. मंजुळाने तिला कवेत घेतल्यासारखं जवळ बसवलं. चांगलं खोबरेल तेल माखून केस विंचरले व अंबाडा घातला. वर एक शेवंतीचं फूल खोवलं.

"तुझ्या सासूसारखी मी, नवऱ्याची मावशी. कल्याण होऊ दे तुझं!"

मंजुळा ती खोली नेहमीच बंद ठेवायची. सासऱ्याने उघडलेली असली तरी बाहेर आल्यावर ती लगेच बंद करायची. मधेच तिला वाटायचं, त्या खोलीतून कुणीतरी कण्हतंय, विनवणी करतंय, दात चावून रडतंय. सासरा कधीतरी ती खोली उघडायचा. पण बाहेर आल्याबरोबर तो अतिशय थकल्यासारखा, वाकल्यासारखा, गळून गेल्यासारखा वाटायचा. मग तो काहीतरी निमित्त काढायचा, बागेत जायचा आणि कुणाला तरी शिव्या देत राहायचा. सुनेवर देखील धाड यायची. नाहीतर खोरं घेऊन धप्प धप्प खणत रहायचा.

आत डोळे वटारून पाहत असल्यासारखी ती काळोखी खोली, चोहीकडे सासऱ्याची रड आणि आरडाओरडा. मंजुळाच्या छातीवर मणभर ओझं पडायचं. जीव आतल्या आत संकोचून एवढासा व्हायचा. मग तिला उबग यायचा आणि भावनांचा स्फोट व्हायचा. पटकन सासऱ्याला ती कमी जास्त बोलायची. त्याच्या वर्मावर घाव घालायची. मग त्याला जास्तच चेव यायचा. तो खूप शिव्या द्यायचा, आरडाओरडा करायचा आणि मग एकदम शांत व्हायचा. बाहेरच्या खोलीत जाऊन त्या चामड्याच्या खुर्चीवर बसायचा, रडायला बसल्यासारखा. मग मंजूळ हळूच यायची आणि दारात उभी राहून म्हणायची, "बाप्पा, वाढलं आहे, जेवायला चल."

असहाय नजरेने तो तिच्याकडे बघायचा आणि निमूटपणेच उठायचा.

त्याची ती खोली म्हणजे मंजुळाला एक गूढच वाटायचं. एवढीशीच ती खोली आणि तिला वीतभर जाड चावी. कटकन तो चावी काढायचा अन् खोलीतल्या गडद अंधारात घुसायचा. हवी तीच वस्तू नेमकी घेऊन यायचा नि परत चावी करायचा. मंजुळाला नेहमी उत्सुकता वाटायची. काय भरलं असेल त्या खोलीत?

एक दिवस पाहते तर त्याने चिमणीचा दिवा पेटवून त्या खोलीत मधेच ठेवला होता. मंजुळा उगीचच दारात घोटाळली पण तिला आत जायचा धीर झाला नाही. सासऱ्यानेच हाक मारली, "कावेरी, इथं ये."

घाबरत घाबरत ती आत आली. खोलीभर काळा, धुरकटलेला ऐवज

भरला होता. जाळ्यांचा जळमटल्यासारखा वास येत होता. कोपऱ्यात पातळ गुळाचं भांडं. मधेच नारळांची रास. एका बाजूला चार मुडे रचून ठेवलेले, तांदळांचे का भाताचे माहीत नव्हतं. एकावर एक ठेवलेल्या तीन पेट्या, एक पेटारा, खुंटीवर लोंबकळणारी एक सांगशी आणि इतर बरंचसं लहान-मोठं सामान. वर्षानुवर्षं काळोखात आणि धुरात पडून सगळ्या वस्तू काळ्या झाल्या होत्या. मुड्यांना बांधलेले पट्टेसुद्धा धुरकटले होते. कधी आणि कशाला ते रचून ठेवले होते माहीत नव्हतं. एका बाजूला ठेवलेलं ताम्हण, एक मोठी पंचडी, थाळी, पातेली, परात. सगळ्यांवर धुराची पुटं चढली होती. मधेच एका आढ्याला मातीची एक लहान गोली लोंबकळत होती. मंजुळाने विचारलं, '' बाप्पा, ही कसली आहे ? ''

त्याला बराच वेळ आठवेना. मग पुष्कळ विचार केल्यावर तो म्हणाला, '' ती ना मधाची, मध आहे त्यात. मागं श्रीधर शाळेत जायचा तेव्हा मल्लापूरच्या एका माणसाने खूप चांगला मध आणून दिला होता. तसाच आहे तो. तुला माहीत आहे, मध जितका जुना तितका तो जास्त चांगला, औषध म्हणून सुद्धा. उद्या तुझ्या मुलांना सर्दी वगैरे झाल्यास चमचाभर चाटायला दिलास तरी पुरे, सर्दी-खोकला पळून जातील. ''

मंजुळाला कसंतरीच वाटलं.

'' मला कशाला हाक मारली होती ? ''

एकावर एक असलेल्या पेट्यांपैकी त्याने दोन खाली ठेवल्या. खालच्या पेटीपाशी तो बैठक मारून बसला, पेटीला पकडून, काहीसा हताश होऊन. मग त्याने आतल्या वस्तू धुंडाळून एक लुगड्याची घडी, चोळी, सहा तोळ्यांचं एक गंठण आणि एक नथ - सगळं काढून मंजुळाच्या हातात दिलं. '' नेसून दाखव. ''

एकाएकी मंजुळाला ते ओझं जड वाटू लागलं, सहन होईना. तिला वाटलं, हा मला एका कदीम काळातून चालत आलेल्या दुःखात, संकटात ढकलून द्यायला बघतोय. बंद पेटीतलं ते दुःख त्याने जाणूनबुजून उचकटून काढलं आहे आणि ते माझ्या कपाळी मारलं आहे. हा आतल्या गाठीचा बेरकी माणूस माझ्यावर जादूटोणा करू पाहतोय. हातातल्या त्या ऐवजाकडे तिने क्षणभर पाहिलं. तिला उगाच वाटलं, त्या जुन्या, झिरझिरलेल्या, काळपटलेल्या रेशमी लुगड्यावर रक्ताचे डाग आहेत, चोळीची गाठ उसवली आहे, नथीला, गंठणाला शाप बाधला आहे.

घाईघाईनेच तिने ते सगळं बाजूला ठेवलं आणि ती बाहेर पळाली.

सासरा उठला. त्याने सगळं गुंडाळून घेतलं आणि तो बाहेर आला. त्याने अगदी विनवणीच्या स्वरात म्हटलं, "एकदाच मला हे सगळं परिधान करून दाखव ना. कावेरी. एकदाच."

"का म्हणून ती जीर्ण वस्त्रं नेसू मी? त्यांना जळमटांचा वास येतो."

"तुझ्या सासूची मालमत्ता ती. तिनेच दिली आहे म्हणून तू एकदा तरी घालावी!"

मंजूळ सगळं घेऊन आत गेली.

सासरा अधीर होऊन, डोळ्यांत प्राण आणून वाट बघत होता. मंजुळा बाहेर आली मात्र, दगडाला आपटल्यासारखा दचकलाच तो. एकदम म्हणाला,

"नको. तुला नाही शोभत ही वस्त्रं. नको ती नेसूस. काढ अंगावरनं."

"काय झालं?"

"काढ म्हटलं ना लवकर!"

मंजुळा आत गेली. स्वतःशीच बोलल्यासारखा तो म्हणाला, "माझं सुख वा दुःख, तुम्हाला आणखी नको. मीच अपराधी. तुम्हाला नको ते."

मंजुळाने सगळं आणून त्याच्याजवळ दिलं. पण मोती चिकटवलेली ती नथ मात्र तिने मुठीत घट्ट दाबून ठेवली.

"नथ कुठं आहे?"

"मी घेतली आहे."

"दे म्हटलं ना!" तो खेकसला.

मंजुळाने मूठ उघडून रागाने ती जमिनीवर फेकली. खेळ करतोस हा आमचा!

नथ जमिनीवर पडलेली पाहून तो चिडला, शिव्या द्यायला लागला. धिंगाणा घालीत शिव्या देऊ लागला, "माजली आहेस तू. पर्वा नाही तुला कुणाची. मानमर्यादा नाही. बापाने हेच शिकवलंय वाटतं तुला!"

मंजुळा! अवाक्! वेड्यासारखंच करतो कधी कधी.

लग्नाचं वारं वाहायला लागल्यावर, श्रीधरच्या कुशीत शिरल्यावर मंजुळा अंगाने भरली होती. पण या दिवसात मात्र ती अगदीच गळून गेली होती. पायांच्या काड्या झाल्या होत्या आणि डोक्यावर पाटी घेतली की मोडून पडणार अशी वाकत होती.

सासऱ्याचा सदान्कदा आरडाओरडा. खळ्यावर भात काढताना जरा त्या हातराबाहेर थोडंसं भात सांडलं की त्याची ओरड सुरू. आमटीला, भाजीला

खोबरं जरासं जास्त झालं तरी त्याला कळायचं. मग जाऊन नारळाची कवड बघायचा आणि शिव्या द्यायचा. मधेच एखाद्या दिवशी स्वयंपाकखोलीत येऊन म्हणायचा, “आत्ताच आलीस ना ग शेतातून? दमली असशील. मी देऊ का मसाला वाटून?”

“बाप्पा, मी दोन दिवस जरा शिद्दरला जाऊन येऊ का?” म्हणून विचारलं तर मोठ्याने म्हणायचा, “जा, जा, तुला कुणी अडवलं आहे? माझ्यासाठी थांबू नकोस.” मग आजारी माणसासारखा दिवसभर कण्हत राहायचा. नदी ओलांडली की बाप्पा आणि बायूल, पण सहा सहा महिने भेट नाही. तिला त्यांची खूप आठवण यायची. नदीपलीकडून कुणीतरी सारखं साद घालतंयसं वाटायचं. कवड्याचं पिल्लू रडत असल्यासारखा आवाज कानाशी घोंगावत राहायचा.

शेतात नडणीची अत्यंत जरूरी होती. रोज ती एकटीच जायची. दोन तरी कामवाल्या बरोबर घेऊ म्हणून सासऱ्याला सांगितलं तर तो म्हणायचा, “होईल तसं आणि होईल तेवढं तू कर. उरलेलं राहू दे.” पण नडणी न करता शेत तसंच ठेवलेलं मंजुळाला चालत नसे. ती सकाळी भांड्यात थोडी पेज घेऊन यायची ती एकदम संध्याकाळीच घरी जायची. दुपारी जेवायला सुद्धा ती घरी जात नसे. तिला माहीत होतं एकदा का ती घरी गेली की दुपारच्या जेवणातच गुरफटणार. घरी सासरा काय करील ते करू दे. पण तो एक दिवससुद्धा तिच्यासाठी जेवण घेऊन यायचा नाही. घरी आल्यावर मात्र कोरडी स्तुती करायचा.

या दिवसांत मुसळधार पाऊस पडत होता. सगळ्या शेतातून पाण्याचा धूर निघाल्यासारखं दिसायचं. कधी कधी त्या पावसात डोक्यावर इरलं घेऊन राहायला मंजुळाला गंमत वाटायची. चारी बाजूंनी ऐसपैस पसरलेलं हिरवंगार शेत. मधेच ती उभी. पाऊस पडू लागला की वाद्य वाजवल्यासारखे इरल्यावर थेंब पडायचे. पावसाबरोबर वाराही कानांशी सळसळ करीत राहायचा. तिचं मन अगदी हलकं फुलकं व्हायचं.

पण शेतातलं तण उपटून काढताना मात्र तिची कंबर मोडून यायची. दुपार होता होता ती अगदी थकून जायची. कधी कधी जीव खरवडून टाकणारी भूक लागायची. येताना आणलेली पेज जेवूनसुद्धा भूक शमत नसे. पेजेचं सुद्धा थंडगार पाणी झालेलं असायचं.

कधी कधी ती शेताच्या मेरेवर बसून रडायची, एकटीच. कधी आपाच्या

किंवा बायूलाच्या आठवणीने तर कधी नवऱ्याच्या उदासीन वृत्तीला. फक्त बाप्पाला तेवढी पत्रं, माझी जरासुद्धा विचारपूस नाही. ह्याचा बाप पत्रातला एखादा शब्ददेखील कधी वाचून सांगत नाही. इथं असताना कसा लाडेलाडे बोलायचा, कुरवाळायचा. पाठ वळली की एकदम परकी झाला ? इथं बायकोची अगदी दैना केली आहे तुझ्या बापाने, तुला कोण सांगणार ?

या दिवसांत ती त्यांच्या नदीकाठच्या शेतात तण काढण्याचं काम करीत होती. तिथून पलीकडचा शिद्दर गाव सतत दृष्टीस पडायचा. तिची नजर पुनःपुन्हा तिकडे वळायची. जीव अगदी वेडापिसा व्हायचा. वाटायचं, इरलं इथंच मेरेवर ठेवायचं, नदी पार करून पलीकडे जायचं. आपाजवळ, बायूलजवळ, वस्तीत फिरून प्रत्येकाची विचारपूस करून यायचं.

आपाला एक दिवस कुणीतरी सांगितलं, बाय त्यांच्या पैलतीरावरच्या शेतात काम करते. ती एकटीच सकाळी शेतात येते नि संध्याकाळी घरी जाते. आपाला संताप आला, किती आपमतलबी माणूस आहे हा ? माझ्या पोरीच्या एकटीच्या माथी मारलं आहे त्याने हे !

आपाचा जीव अगदी कासावीस झाला. दुसरे दिवशी सकाळीच जाऊन त्याने होडीवाल्याला गाठून शेतकं (मासे) आणली आणि सुमनला सांगितलं, "छान हुमण (आमटी) करायचं. मी बायला शेतात जेवण नेऊन देतो." सुमन अगदी वेडावलीच. घाबरत घाबरत तिने म्हटलं, "मी पण येते ना, आपा."

"तू आणखी कुठं येतेस ? नदीला आलाय पूर. सगळं पाण्याने भरलंय."

सुमन मासे नीट करायला विळी घेऊन अंगणात गेली. आपाने पटापटा चुलीवर आधण ठेवलं. म्हाळाकरता म्हणून ठेवलेले साळीचे तांदूळ काढून धुतले आणि आधणात ओतले. चांगलं एका नारळाचं खोबरं खवून मसाला काढला आणि रगड्यावर वाटायला सुरुवात केली. इतक्यात मासे नीट करून सुमन आली.

"मी वाटते, आपा."

"असू दे ग, तू हलक्या हातांनी मसाला सार. मी वाटतो."

आपाला एक निराळाच हुरूप आला होता. एरव्ही पहिल्यापासूनच तो सुमनशी नीट मोकळेपणी बोलत नसे पण आज अगदी उत्साहाने तिला काय काय हुकूम देत होता. त्याने मग केळीची दोन पानं कापून आणली, विस्तवाच्या धगाशी धरून मऊ केली. त्यात भात, हुमण घालून शिदोरी बांधली आणि ती घेऊन तो घाईघाईने जायची तयारी करू लागला. अंगात शर्ट, खांद्यावर

कांबळ, कांबळीच्या खोलाईत शिदोरी, हातात छत्री.

नदीजवळ आला तर नावाडी होडी सोडायला तयार नाही. म्हणतो, “ पाऊस वारा, पाण्याचा प्रवाह - होडी आवरणं शक्य होणार नाही. ” आपाने त्याची वल्ही हातात घेतली नि म्हटलं, “ तू येतोस का मी जाऊ एकटाच ? ” आणि तो पाण्यात गेला सुद्धा. नावाडी पळत पळत आला, दोघे मिळून नेऊ म्हणाला. आपाच्या हातातली छत्री बघून मात्र तो चिडला. “ ही आणखी कशाला ? छत्री तर वाऱ्याने उडून जाईलच आणि होडीही बुडेल. ” त्याने ती छत्री नेऊन आपल्या झोपडीत ठेवली.

होडी प्रवाहात गेली आणि वारा, पाऊस एकदम थांबला. “ तुला माहीत आहे, माझी लेक पलीकडच्या शेतात काम करते. चांगली पंधरा-वीस माणसं काम करतात तिच्या शेतात. शेत तरी केवढं, नदीच्या काठापासून सुरू ते शाळेच्या माळापर्यंत ऐसपैस पसरलेलं. माझी बाळी कामवाल्यांना जेवण घेऊन आली असणार. सुरय तांदळाचा भात आणि मुडदुशांचं कालवण, कामवाल्यांची चंगळ ! मी विचार केला, पोर इतकी जवळ आहे. काहीतरी खायला करून नेऊ या. काजूगर, खोबरं आणि गूळ घालून घाटणं केलं. ”

नावाडी त्याच्याकडे बघत होता आणि हळूहळू वल्हवत होता. वारा नव्हता पण पावसाची रिमझिम अधनं मधनं चालूच होती. आभाळ दाटून आलं होतं.

“ तो गाणी म्हटल्याचा आवाज ऐकू येतो का तुला ? माझ्या बाळीच्या शेतात कामवाल्या चिलया बाळाचं गाणं म्हणताहेत. ”

नावाडी मनातल्या मनात बेरक्यासारखं हसला. “ म्हाळूच्या मुलाला दिली आहे ना रे तुझी लेक ? ओळखतो मी त्याला. शिमग्याच्या वेळी आमच्या पाग्यांच्या वस्तीतल्या मुलांनी मेळा बसवला होता. याचं मोठ्या घराचं मोठं अंगण म्हणून मुलं दांड्या घेऊन नाचली तर याने त्यांना एक आणा काढून द्यावा ? मुलांनी विचारलं, “ म्हाळूमामा, तळी कुठं ? ” तर हा उलट त्यांनाच दरडावतो, “ मी काय तुम्हाला माझ्या अंगणात नाचायला या म्हणून आमंत्रण पाठवलं होतं ? ”

गणेशचा जीव अगदी एवढासा झाला. लहान मुलासारखं तोंड करून त्याच्याकडे पाहू लागला. हा नावाडी असाच थापेबाज, मत्सरी. उगीच नाही, मागे एकदा त्याला खारग्याच्या एका तरुण पोराने वल्ह्याच्याच काठीने मारलं होतं ! ”

म्हाळूवर कसला तरी राग असल्यासारखा तो पुढे बोलतच होता, “ ह्याचा

मुलगा श्रीधर. पहिल्यापासून अंगाने काटकुळाच. तो सैन्यात भरती व्हायला मुळीच तयार नव्हता तर याने जबरदस्तीने एक दिवस त्याला कारवारला नेऊन भरतीच्या रांगेत उभं केलं. एकुलत्या एका मुलाला सैन्यात पाठवलं.''

न ऐकल्यासारखं करून गणेश गप्प राहिला. होडी काठाला लागली तशी त्याच्या हातात एक आणेली ठेवून चालायला लागला. नावाड्याने हाक मारून त्याला विचारलं, ''ओ शिद्दरकर मामा, आज परतणार की लेकीकडे मुक्काम ?''

''नाही, नाही. परत येणार आहे.''

''पैलतीरी असलो तर हाक मार मला. होडी घेऊन येतो.''

गणेशने मागे वळून त्याच्याकडे एकवार पाहिलं नि तो चालायला लागला.

बायचं शेत कुठेसं होतं याचा त्याला अंदाज होता. तो मेरेवरचा चिखल तुडवीत चालत होता, पाय चिखलाने भरले होते. नेसलेल्या पंचावर देखील पाणी, चिखलाचे शिंतोडे उडत होते. दुरून पाहिलं तेव्हा बाय धान्न्यात वाकून धान्न्याएवढ्याच उंचीची होऊन तण काढीत होती. वाकवलेली मान वर उचलत नव्हती. आपा जवळ पोचला तरी तिला पत्ता नव्हता. नजर ठरणार नाही असं एवढं मोठं ऐसपैस हिरवंगार शेत! बाय मधेच एकटीच काम करते.

''बाय!''

''कोण, आपा तू? शेतात कसा काय आलास?''

''बायूलाने शेतकं आणून छान हुमण केलं होतं ग. बायला जेवण घेऊन जाच म्हणून मागे लागली.''

''बायूल बरी आहे ना आपा? स्वयंपाक वगैरे नीट करते ना रे?''

''हो तर. तिच्या हाताला देखील तुझी, तुझ्या आईची तीच चव. जेवताना पाहशीलच तू.''

मंजुळा हात धुऊन आली आणि आपाच्या शेजारी बसली. आपा तिला न्याहाळीत असताना वाटलं, ही अगदीच पोखरून गेली आहे. जोराचा वारा आला तर डोक्यावरच्या इरल्यासहित उडून जाईल ही. डोक्यावरचे केसदेखील तेलाविना कोरडे झालेत. नऊवारी लुगड्याचा बोंगा तिच्या एवढ्याशा देहाला सावरता येत नाही, तो गवतात, चिखलात लोळतोय.

''तुला एकटीलाच कसा काय शेतात पाठवतो ग तो? दोन तरी कामवाल्या बरोबर घ्यायच्या!''

''कामवाल्या मिळतात कुठे? तसं जास्त नाही ते, मी करून टाकीन सगळं. या वर्षी तण जरा जास्तच आहे. पंधरा-वीस दिवस झाले, संपतच

नाही. ''

आपाने शिदोरी सोडली. '' जेवतेस ना बाळे ? ''

'' एवढं सगळं मी एकटीच जेवणार ? '' मग तिने ते जेवण दोन पानांवर वाढलं. बाप-लेक मेरेवर बसून जेवू लागले. मंजुळा इतक्या चवीने जेवत होती, तिची तंद्रीच लागली होती. आपाला शंका आली. खाण्यापिण्याचे देखील हाल होत असतील का हिचे ?

'' बाय, जेवा-खायला कमी करीत नाही ना ग तो ? ''

'' नाही आपा, मीच मरायचं आणि मीच वाढून घ्यायचं. कमी का होणार ? ''

'' तसं नव्हे ग. दाणा-गोटा मोकळ्या हातांनी देतो ना ? ''

'' हो, आपा. ''

'' मग इतकी रोडावलीस कशाने तू ? ''

'' पूर्वी तरी कुठं जाडी होते मी ? तू पुष्कळ दिवसांनी पाहिलीस म्हणून तुला तसं वाटतं. ''

'' नीट काळजी घे ग स्वतःची. बघ, कशी काठीसारखी झाली आहेस. ''

मंजुळा हसली. आपाची नजर तिच्या पावलांवर गेली. ती अगदी धुऊन निघाली होती. सोललेल्या बेडकासारखी पांढरी दिसत होती. मधेच त्यांना भेगा पण पडल्या होत्या. तिनेच कसलं तरी औषध माखलं असावं. त्यामुळं मधेच काळे डाग.

'' काय करावं माहीत आहे, झोपताना रोज तेलात हळद गरम करावी आणि पावलांना लावावी. सारखी पाण्यात उभी राहिल्याने पावलांना बघ कशा भेगा पडल्या आहेत. ''

मोठ्या मायेने मंजुळाने आपाकडे पाहिलं. तिला वाटलं, इथंच या शेताच्या कडेला आपाच्या कुशीत शिरावं. त्याच्याकडून थोपटून घ्यावं, आईच्या नि आपाच्या दोघांच्या मायेने.

'' पत्र आलं होतं का ग नवऱ्याचं ? ''

'' सासऱ्याला येतात पत्रं. ''

'' तुला नाही येत ? ''

'' मला कुठं लिहा-वाचायला येत ? ''

जेवून ती थोडा वेळ बोलत बसली. बघता बघता डोक्यावर कललेला सूर्य कधी डोंगराआड गेला कळलंच नाही.

'' बाय, उशीर झाला, मी निघतो. तू पण जा आता घरी. ''

" घरी नाही येणार ? "

" आता नाही येत ग. हे काम संपलं की चार दिवस राहायलाच ये असं बायूलाने सांगितलं आहे. "

" पण सासऱ्याचे जेवणाचे हाल होतील ना. तरी बघते. "

" इतकी वर्षं स्वतः करून जेवत नव्हता का तो ! "

मंजुळा हसली. " आता घरात सून आली आहे ना ? आयत्या जेवणाची सवय झाली आहे. सुनेशिवाय पान हलत नाही. प्रत्येक गोष्टीला कावेरी. "

आपाला जरा बरं वाटलं. " आता जाऊन स्वयंपाक करणार आहेस तू ? "

" गुरं घेऊन लवकर परत आल्यास तो काहीतरी करतो. म्हणजे चुलीत विस्तव घालतो, आधण ठेवतो. "

" बरं बाय. " म्हणत आपा जायला निघाला. मंजुळादेखील शेतातून वर आली. पुढे गेल्यावर तिने हाक मारून म्हटलं, " आपा, मी त्याच्या पलटणीचा पत्ता पाठवून देते. बायूलाला म्हणावं त्याला लिही. मला ना लिहिता येत ना वाचता. बायूलाला तरी लिहितो का बघायचं. "

आपाने हात हलवून कळलं म्हणून सांगितलं. परत जाताना तो मनात म्हणत होता, बायचा हसरा चेहरा तसाच आहे. तरी पण ती सुखी नसावीसं वाटतं. पोरीला मी त्रासात तर नाही ना टाकली ? चार पुस्तकंदेखील शिकवू शकलो नाही मी तिला. वस्तीमधे तेव्हा शाळाही नव्हती म्हणा. त्यातच आई गेली आणि बहिणीची जबाबदारी अंगावर पडली. मंजुळाला पाहिल्यापासून आपाचं काळीज तुटल्यासारखं झालं होतं. ही चेहरा हसरा ठेवून आपण सुखी असल्याचं नाटक करते, पण ते खरं नव्हे. माझ्या फुलासारख्या पोरीला मी त्रासात टाकली रे देवा ! "

तो नदीकाठी पोचला तेव्हा काळोखाची छाया जमिनीवर पसरत होती. मधेच पाऊस पडत होता, गार वाराही सुटला होता. हुळगे, केरवडी, खारगे, शिद्दर गावांमागचे डोंगर आता काळोखाच्या छायेत शिरत चालले होते. आणि त्यांची सावली अवघ्या परिसरावर पसरू लागली होती. मघाशी उजेडात हिरवीगार दिसणारी शेतं, गावाकडचे माड, नदीकाठची झाडं-झुडपं आता रूपकळा बदलून काळी पडायला लागली होती. त्यातच नावाड्याला हाक मारता मारता आणखीन काळोख.

गणेश नावाड्याला मोठमोठ्याने हाका मारीत होता. " तारयामामा, ओऽऽ तारयामामा " पण त्याचं उत्तर नव्हतं. गणेश एकसारखा हाका मारीत होता,

न थांबता. त्याच्या आवाजाच्या लहरी सगळ्या परिसरात घुमत होत्या.

पैलतीरावर काहीतरी हलल्यासारखं, फिरल्यासारखं वाटत होतं, पण कुणाचा आवाज नव्हता. त्याचं हाका मारणं चालूच होतं. अचानक वल्हवल्याचा "बुडुक् बुडुक्" आवाज येऊ लागला. बघता बघता होडी काठाला लागलीसुद्धा.

"तारया, हाकेला ओ तरी द्यायची रे!"

"म्हटलं, मारू दे हाका. येऊ दे सगळ्या परिसराला जाग. अशा कातरवेळी हाका मारल्या तर भुतंखेतं पळून जातात. अरिष्ट दूर जातं. पिकं, फळं, तरारतात."

गणेश काही बोलला नाही, मुकाट्याने येऊन होडीत बसला.

नावाडी सांगत होता, "ती नवरा-नवरी विश्रामला पुन्हा दिसली म्हणे!"

"कुठली रे?"

"ती, वऱ्हाडासहित बुडाली होती ती."

माहीत नसल्यासारखं गणेशने विचारलं, "कधी रे?"

'या परिसरातली एवढी मोठी बातमी तुला माहीत नसावी' असा भाव चेहऱ्यावर आणीत नावाडी सांगू लागला. "झाली असतील साठ-सत्तर वर्षं, कदाचित शंभरही झाली असतील. चैत्रातल्या एका त्रयोदशीला नवरीला घेऊन वऱ्हाड परत येताना नवऱ्या-नवरीसकट बोट बुडाली. माणसांनी भरलेली बोट, त्यांच्या किंकाळ्या, बोंबाबोंब. वारा नव्हता. वारा नव्हता, वळण नव्हतं आणि कुठल्या प्रवाहात, कुठल्या भोवऱ्यात ती सापडली कोण जाणे! शिद्दराम डोंगराजवळ या नदीला वळण आहे म्हणे, तिथंच कुठंतरी बोट बुडाली असं सांगतात. ती नवरी म्हणे इतकी सुंदर होती, जणू देवीनेच मानवी रूप धारण केलं असावं. असंही सांगतात की नवऱ्याच्या बापाने म्हणे लग्नाच्या तीन दिवस आधी शिकारीला गेल्यावेळी पक्षी समजून एका गायीवर गोळी झाडली. आता तिथे दर पौर्णिमेच्या त्रयोदशीला म्हणे रात्री पाण्याचा भोवरा फिरत असल्याचा खळखळ आवाज ऐकू येतो. आणि लग्नाची वाजंत्री वाजतात. मग नवरा-नवरी नदीतून वर काठावर येतात आणि खडकावर जातात. अंगावर झगझगीत वस्त्रं, चेहऱ्यावर रत्नांचं तेज! रात्रभर ती आपल्या प्रणयी क्रीडेत रत! कुणाला दिसल्यास एकही अक्षर बोलायचं नाही, मुकाट्याने बाजूला सरकायचं. खोटं नाही हं, अजूनही त्या बाजूने लग्नाचं वऱ्हाड गेलं तर त्यांचा मान म्हणून विडा उतरून ठेवतात आणि पाण्यात सूप सोडतात."

इतक्यात होडी काठाला लागली, गणेश उतरला.

नदीच्या काठावरून तो चालत होता. मधेच काळोखात काहीतरी

बुडाल्याचा, ‘शेवटे’ उडाल्यासारखा “बुडुक् बुडुक्” आवाज येत होता. काळोखात काळ्या नदीचा तो प्रवाह इतका काळा दिसत होता जणू कुठल्या तरी काळाच्या पोकळीतून येऊन काळोखाच्या राज्यात शिरून गेली आहे.

तो घरी पोचला तेव्हा दिवेलागणीची वेळ होऊन गेली होती. माजघरात चिमणीचा दिवा जवळ ठेवून सुमन एकटीच बसली होती. मधून मधून पेंगत होती. मधेच घाबरल्यासारखी बाहेरची चाहूल घेत होती. लांबून फाटकातून आपाने पाहिलं तेव्हा चिमणीच्या उजेडात कमळातल्या बाळासारखी वाटली त्याला. आपल्या धाकट्या मुलीच्या प्रेमाने त्याचा ऊर दाटून आला. आपाची पावलं अंगणात वाजली तशी ती उठली, “आपा, बाय भेटली?”

“हो.”

“जेवली ना ती?”

“हो.”

“हुमण चांगलं झालं म्हणाली का?”

“फारच रुचकर! तू जेवलीस का बाळ?”

“वाट बघत होते, आपा.”

गोकुळमावशी खिडकीत येऊन विचारीत होती, “किती उशीर केलास रे, गणेश? पोरगी माजघरात एकटीच बसली होती. बघून माझं लक्ष लागेना आत म्हणून खिडकीत येऊन बडबडत होते मी.”

गणेश माजघरातल्या खांब्याला टेकून बसला होता. बाहेर बघत स्वतःशीच म्हणत होता, “हा माड बायच्या लग्नात एवढासा दीड हात उंचीचा होता. आता पाहा त्याचा पोय फुटून छान शिवर आला आहे. या वर्षी दहा-वीस नारळ सहज निघतील.”

कडेवर एवढी मोठी घागर आणि हातात कळशी घेऊन सुमन विहिरीवरून येत होती. लगबगीने ती अंगणातून घराच्या पायऱ्या चढून आत गेली. तिचा घसघशीत उफाड्याचा बांधा बघून आपा सुखावला. पण मनात काळजी होती, देवा आताच संपायला आलोय मी. या मुलीचं सगळं नीट पार पडेपर्यंत मी असेन का?

मंजुळाचं लग्न झाल्यापासून गेल्या सहा वर्षांमध्ये आपाची दैनाच झाली होती. जगणंच संपल्यासारखा तो घुम्म, मुकाट्याने बसून राहायचा. घर आणि शेत याच्या बाहेर त्याचं जग संपलं होतं. गेल्या चार वर्षांत नदी ओलांडून तो एकदासुद्धा कुठे गेला नव्हता. गेल्या वर्षी आपल्या मुलाचे कान टोचले

तेव्हा मंजुळाने किती आग्रह केला होता पण तो गेला नाही. सोनाराकडून दोन रिंगा आणून बरोबर एक टॉवेल देऊन सुमनला पाठवलं.

खरं म्हणजे मंजुळाचं लग्न झाल्यापासून त्याने अंग कवळून घेतलं होतं म्हटलं तरी चालेल. आधीच रुंद हाडाचा माणूस तो. पण आता अंगावरचं मांस जिरलं होतं आणि कातडी हाडांना चिकटली होती. हाडांचा नुसता सापळाच राहिला होता. टाळूवरचे केसही करपून गेल्यासारखे झाले होते. आणि आता डोक्यात आणखी एक वेड घेऊन बसला होता, "देवा, मी माझ्या पोरीला त्रासात टाकली रे! नवऱ्याच्या घरी ती सुखी नाही. तिचा सासरा तिला सारखी राबवून मारतो आहे! आणि नवराही असाच लेचापेचा!"

गणेश बसल्या ठिकाणी वर्षाचा हिशेब जुळवत होता. चोवीस वर्षांचा असताना आईने लग्न करून दिलं. लग्न झालं आणि अनसूयाला पाट मोकळा करून दिल्याप्रमाणे आई लगेच गेली. तीन वर्षांनी मंजुळा जन्माला आली. नंतर पाच-सहा वर्षांनी एक मुलगा होऊन गेला. नंतर एकदम चार वर्षांनी बायूल. मंजुळाच्या वेळेस वार बघून सुईण म्हणाली होती, 'वारीवरल्या गाठी लांब लांब आहेत. मुलं पण अशीच विलंबाने होतील.' बायूलच्या नंतर अजून दोन तरी मुलं सहज झाली असती. प्रत्येक गर्भारपणात अनसूयाचा चेहरा कसा लखलखून तेजाळायचा, अजूनही डोळ्यांसमोर येतो.

अनसूयाला जाऊन हे सोळावं संपून सतरावं वर्ष, आठवून गणेश सैरभैर झाला. देवा, ही सतरा वर्षं कशी काढली मी? आता आणखीन् एखादं वर्षदेखील काढू शकणार नाही मी.

मंजुळा एके दिवशी आली होती तेव्हा म्हणत होती, "आपा, तू इतका का कंटाळला आहेस? माझ्या सासऱ्याला बघ, कसा धडधाकट आहे तो." तेव्हा गणेशने सांगितलं, "देवाने प्रत्येकाचा पिंड वेगळ्या पद्धतीने रचला आहे. म्हाळू धडधड काम करतो, राबतो, शिव्यांचा भडिमार करतो आणि शांत होतो. आम्ही मागच्या आठवणी काढीत राहायचं आणि भविष्याच्या काळजीने करपून जायचं. त्याला आत्ता घातलेल्या शिव्या मग आठवत नाहीत. मधे तुझ्यासारखीचं मात्र मरण!"

मंजुळाचा मुलगा आता दीड वर्षाचा झाला होता. पण तिचं ते स्वप्न — आपण नवऱ्याबरोबर आगगाडीत बसून जाणार ते मात्र पूर्ण झालं नव्हतं. तो दरवर्षी दोन महिन्यांच्या रजेवर यायचा नि परत जायचा. प्रत्येक वेळी अडचण असायचीच. सासऱ्याच्या अडथळ्याशिवाय आणखीन कितीतरी.

मध्यंतरी तो सतत तीन वर्षं सीमेवर होता म्हणून. तिथून परत आल्यावर कुठल्या तरी लढाईच्या सरावासाठी म्हणून गेला म्हणून. मग क्वार्टर्स मिळत नाही म्हणून. पण मंजुळाला वाटायचं, आपल्या बरोबर मला न्यायची याला उत्सुकताच नाही. तिने बरोबर जायचा हट्ट केला की तो चिडायचा, "तुझ्या बापाने आर्मीमधल्या माणसाला कशाला दिली तुला? भोग आता!"

"तुम्ही बाप-लेक दोघेही तापट स्वभावाचे. नकोच नेऊस तू मला. या शेतात राबता राबताच मरून जाईन मी. तुझ्या बापाला आयती कामवाली मिळाली आहे ना?"

"अग, पण राहायला घर तरी मिळायला नको का, कावेरी?"

"मला कावेरी म्हणू नकोस हं तू. राग येतो मला!"

"कावेरी म्हणू नाहीतर मंजूळ. मुलं झाली म्हणजे झालं. एक दिवस कावेरी, एक दिवस मंजूळ."

मंजुळा खुद्कन हसली. तसा तो मंजुळाला खूप चांगलं वागवायचा पण कधी कधी बापाचा राग तिच्यावर काढायचा. रजेवर येताना पाच-सहा रमच्या बाटल्या घेऊन यायचा. वरती माळ्यावर त्याची आर्मीची मोठी ट्रंक असायची. वर जायचं नि थोडं गुट्ट करून यायचं. त्या लाल रमच्या बाटल्या बघून मंजुळाच्या अंगावर शहारे यायचे. त्यात कुणाचं तरी रक्त भरून ठेवलं आहे असंच तिला वाटायचं. ते रक्त आत्ताच जमिनीवर सांडेल आणि ते बघून आपण चक्कर येऊन पडू असंच तिला वाटायचं!

कधी कधी जरा जास्त झाली की तो म्हणायचा, "खरंच, लढाई सुरू होऊन त्यात मी मरून जायला हवं होतं. म्हणजे तरी माझ्या बापाला कळलं असतं!"

"असं का बोलतोस तू? बापाचं काय राहिलं आहे? मला, माझ्या मुलाला हवा आहेस तू."

बाप भलताच बेरकी. मुलगा घरी असेपर्यंत सुनेशी गोड गोड बोलायचा. थांबून थांबून गोडी-गुलाबीने काम करून घ्यायचा. एकदा का मुलगा गेला रे गेला की मग तिच्या मानेवर जू ठेवायचा.

पण श्रीधरला सगळं कळत होतं, अंदाज येत होता. वर्षं उलटत होती तसा तोही निर्ढावत होता. हल्ली हल्ली त्याचं बापाकडे बोलणं खुंटल्यासारखंच झालं होतं. रजेवर आल्यानंतर तो पूर्वीसारखा शेतात जात नसे. हळूच सटकायचा आणि दुकानाच्या दिशेने फिरायला जायचा. कधी कधी त्याच्याबरोबर गावातला कुणीतरी मित्र यायचा. मग दोघे मिळून माडीवर जायचे आणि रम पीत बसायचे.

मंजुळाचा चडफडाट व्हायचा. तो मित्र गेला की ती भांडायची. रम संपली की मग एखाद्या दिवशी तो दुकानात जाऊन देशी दारू घेऊन यायचा. मग मात्र मंजुळावर आकांत व्हायचा. सासऱ्याची तऱ्हा मात्र वेगळीच असायची –

कधी तो हातात खोरं घेऊन बागेत जाई. तिथं आळी वगैरे करताना स्वतःशीच बडबडे. " शेत नको झालं आहे त्याला. लोकांची मुलं रजेवर आली की कशी सगळी कामं करतात. हा सगळं माझ्याच माथ्यावर मारू पाहतोय. उद्या बाप मेला की कळेल त्याला. बायको मिळाली आहे ना ? तिला कवटाळून बसल्यावर शेत आणखी कशाला हवं ? बायकोचीच शिकवण ती. एकदा का शेताचा निकाल लावला की मग हवी तशी मिरवायला मोकळी ना ती ? "

एक दिवस मंजुळा नवऱ्याला म्हणाली, " तुला सैन्यात जायचं नव्हतं ? "

श्रीधर एकदम चिडला. " कुणी सांगितलं तुला ? "

" बापाने म्हणे इच्छेविरुद्ध भरती केली असं ऐकलं होतं. "

तो गप्पच राहिला.

" तुला नको असेल तर सोडून ये. शेती करून इथंच राहू. " मंजुळाने हळूच त्याचा बाहू पकडला. प्रेमळ नजरेने त्याच्याकडे पाहिलं. श्रीधर पाघळला.

" इतकं सोपं नाही ग ते. बाप्पाने तसा अर्ज करावा लागेल, आपला एकुलता एक मुलगा, माझ्या इच्छेविरुद्ध सैन्यात दाखल झाला, त्याला परत पाठवा म्हणून अर्ज करावा लागेल. पण मला ठाऊक आहे, बाप्पा तसं कधीच करणार नाही. " काळजात कळ आल्यासारखा त्याचा चेहरा उदास झाला.

" तसं असेल तर मग मीच करते अर्ज. मी बायको आहे तुझी. सगळं लिहून पाठवते. "

" नको ग, आता नाही मी परत येणार. तिथं चांगले मित्र-बित्र भेटले आहेत मला. "

मंजुळाने दरडावल्यासारखा आवाज चढवला, " दारू प्यायची मैत्री मात्र करू नकोस. मला भीती वाटते. "

त्याचा चेहरा अगदी लहान मुलासारखा निष्पाप, निरागस झाला.

" छावणीत शिरल्यावर आठवणींनी मी वेडा-पिसा होतो. आणि सगळं विसरायला मग पितो. "

" कसल्या आठवणींनी ? "

" कुणा एकाचीच नव्हे. पाहिलेल्या पण आठवत नसलेल्या आईची, ह्या गावाची, शाळेच्या माळावरची. "

" आणखी कुणाची ? "

“ कुणाची म्हणजे तुझी. तू छळत असतेस मला सारखी. ”

स्वतःच्या अजाण मुलाकडे पाहावं तसं मंजुळाने त्याला पाहिलं. त्याला कुशीत घ्यायला ती आसुसली.

सुमन पंधरा-सोळा वर्षांची झाली आणि तिच्या कायेवर वेगळीच तकाकी आली. तिचा गोरा रंग आता तांबुस झाला होता. ठेंगणीच पण चपळ, सडपातळ बांध्याची सुमन एखाद्या फांदीवर डोलणाऱ्या जास्वंदीच्या फुलासारखी दिसत होती. डोळे ही जरा घारेच, सोनेरी वर्णाचे.

तिच्या माजघराच्या पूर्वेला उभं राहिल्यास गोविंदच्या मामाच्या— भास्करअण्णाच्या घरावर नजर पडायची. मधेच गणपत आजोबाच्या न्हाणीचं खोपूट आड येत होतं म्हणून नाहीतर दारातूनच त्याचं सगळं घर दिसलं असतं. सुमन आताशा नारळ सोलायला, भात पाखडायला, तांदूळ निवडायला वगैरे माजघरातच येऊन बसायची. गोविंद कधी कधी हातात पुस्तक घेऊन पडवीत येरझाऱ्या घालत जोरजोरात वाचताना दिसायचा, तर कधी माडीवरच्या खिडकीत बसून काहीतरी पाठ करायचा. त्याचं वाचन भटजीने मंत्र म्हटल्यासारखं कानी यायचं. कान देऊन ती ऐकायची. जिभेवर मधाचा थेंब गळाल्यासारखी ती सुखावून जायची. कधी मनात म्हणायची, “ एवढा मोठा मॅट्रिकला गेलाय हा आणि तरीही लहान मुलासारखा मोठमोठ्याने वाचातो. त्याला चिडवणारच मी. चिमटा काढून चिडवणार आणि हसवणार मी त्याला. रागावून मग आंब्याच्या डहाळीने मारू दे मला. ”

सुमनच्या दारात आधीच निसर्गाने सौंदर्याची पखरण केली होती. दूर दूर पसरलेले हिरवेगार डोंगर, बेटं, शेतं, उसाचे मळे आणि त्यात माडांच्या झालरीमधून चमकणारा नदीचा रुपेरी प्रवाह. त्यात मधेच कुठंतरी गोविंद उभा ! कधी तो हिरव्यागार शेतातून अलगद वर यायचा तर कधी नदीच्या चंदेरी प्रवाहात नहात असल्यासारखा दिसायचा; जणू तो त्या चंदेरी प्रवाहाशी खेळतोय, प्रवाहाची झगमग तोच उधळतोय !

संध्याकाळी झावळ्यात काळोख शिरायचा. घरासहित आजूबाजूच्या झाडां-झुडपांचा काळोखा मांडव व्हायचा. गोविंदचं वाचन मंदावत जायचं आणि नदी काळोख पांघरायची. सुमन सैरभैर, सुन्न होऊन माजघरात बसायची. “ गोविंद, वाच ना रे बाबा, जरा मोठ्याने वाच. सगळा परिसर दुमदुमून टाक ! नाहीतर इथं ये, माझ्यासमोर चिमणीच्या उजेडात वाचत बैस. काल परवापर्यंत शाळेचं दप्तर इथंच टाकून खेळायला पळायचास तू, आता का नाही रे परत

परत येत ? उद्या आपण नदीवर जायचं ? कांदळं खुडू, कोंड्या काढू ? नको, उद्या नको. तुझी परीक्षा संपू दे. परीक्षा संपल्यावर मात्र मी तुला शिद्दरामच्या डोंगरातल्या त्या तीन भिल्लमाडांजवळ घेऊन जाणारच हं. तिथं शिद्दरामाचं भुयार आहे म्हणे, त्यात वाकून बघायचं. तू घाबरणार नाहीस ना रे ? '' मधेच उठून ती माजघराच्या पूर्वेला जायची. तिथून माडीवरच्या खिडकीतला दिवा दिसायचा. खिडकीत उजेड-काळोखात एक आकृती पुस्तकावर वाकून बसली आहे, नीट दिसत नाही. डोळे फाडफाडून ती खिडकीच्या आरपार बघत राहायची.

कधी दुपारी ती साखरआंब्यापाशी जाऊन एका फांदीवर गप्प बसून राहायची गोविंदच्या मामाच्या घरासमोर ओळीने चार-पाच आंब्याची झाडं होती. तिथे नेहमी मांडव घातल्यासारखी सावली असायची. पाखरं, खारी खेळायच्या. साखर आंब्याच्या सावलीत उभं राहिल्यास भास्करअण्णाच्या घरातला सगळा व्यवहार दिसायचा. कधी गोविंद तिथे यायचा. तो पण जवळच्याच एका फांदीवर बसायचा. ती वृक्षराजी फांद्या-डहाळ्यांनी इतकी दाटीवाटीने भरली होती की फांदीवर बसलेला माणूस जवळून देखील दिसत नसे. त्यात साखरआंब्याची रचनाच अशी होती, थराथरांनी पाच थरी फ़ांद्या फुटल्या होत्या. काही फांद्या अगदी जमिनीवर टेकल्या होत्या. लहान मुलगादेखील सगळ्या वृक्षभर फिरून यायचा. त्यात त्याचे आंबेही इतके गोड की साऱ्या गावाला त्या झाडाचं कौतुक !

तिथं आणखी एक ' गुडगुडी ' नावाचा आंबा होता. तो आंबा पिकल्यावर आतला बाठा गुडगुडू वाजायचा. मुलं आधी तो पिकलेला आंबा घेऊन खेळत राहायची नि मग खायची. ' कातली ' आंबा कच्चादेखील कातली (खोबरं) सारखा खाता यायचा, खोबऱ्यासारखाच चविष्ट होता. आणखीन एक आंबा होता – सुंभाळा. तो खूप उंच होता. एखाद्या फांदीवर पिकलेला आंबा कुरतडताना खार दिसली तर मुलं तो झेलायला खाली हात पसरून उभी राहायची आणि झेलायची देखील. आंबा अगदी रसाळ आणि गोड पण सुंभाने भरलेला. मुले तास न् तास सुंभ चोखत राहायची, तरी त्याची गोडी संपत नसे.

सुमन आणि गोविंद साखरआंब्याच्या फांदीवर बसून सुंभाळ्या आंब्याचा बाठा चोखत असल्यासारखी बोलत असायची. सुमनचं बोलणं नेहमी वाकडं, चिडवणारं.

'' गोविंद, उद्या ना तुझी सगळी पुस्तकं नेऊन काळ्या नदीत बुडवणार आहे मी. ''

'' का ग ? ''

“ माणूस शिकला की गावाला कंटाळतो आणि परदेशी जातो, पैसा कमवायला. ”

“ गेला तर गेला. तुझं काय जातंय ? ”

सुमनने गाल फुगवले. डोळ्यांत राग आणून म्हटलं, “ काय जातंय म्हणे ! मग ही शेतं, हे उसाचे मळे कुणासाठी ?... तुला आठवण नाही येणार – आपण दोघं बरोबर कांदळं खुडल्याची ? ”

“ येणार ग. आधी तुझी आठवण येणार आणि मग कांदळं खुडल्याची. ”

“ खरंच ? ” ती खूप आनंदली. तिच्या तांबूस गालांवर लाली पसरली. सोनेरी डोळ्यांत पाणी तरारलं.

“ मग परगावी कशाला जातो आहेस तर तू ? ”

“ कुणी सांगितलं तुला मी जाणार म्हणून ? ”

“ मला आपलं उगीच वाटतं, माणूस शिकला की परगावी जातो म्हणून. ”

“ वेडीच आहेस तू. मामाने मला घरी ठेवण्याकरता आणलं आहे. मग मी कुठं जाणार ? आणि गेलोच तर तूसुद्धा ये, मागनं डोक्यावर पेटारा घेऊन. ”

“ खरंच नाही जाणार तू ? ” ती उडी मारून खाली उतरली आणि गोविंदचे पाय पकडून त्याला खाली ओढलं, तोल जाऊन तो धुळीत पडला. “ अग, अग, काय करतेस तू ? ”

“ जा. जाऊन आधी पुस्तक घेऊन अभ्यासाला बस. ”

गोविंद तिला बारकाईने न्याहाळीत होता. कालपर्यंत एवढीशीच दिसणारी ही पोरगी आता किती धष्टपुष्ट झाली आहे ? त्याची नजर तिच्या छातीवर स्थिरावली आणि जणू पहिल्यांदाच पाहिल्यासारखं त्याला आश्चर्य वाटलं... अशी कशी माझी ही मैत्रीण इतकी बदलली ? हिच्या शरीरावर ही तकाकी कुठली ? आणि हा घमघमाट कसला ? सुमनच्या शरीराचा का मोहरलेल्या साखरआंब्याचा ?

“ काय पाहतो आहेस रे मला अशी ? ”

“ किती भरली आहेस ग तू ? ”

“ चांगली नाही दिसत ? ”

“ दिसते. ”

“ तू पण उंच झाला आहेस. काही दिवसांनी तू पण अंगाने भरशील. दाढी-मिश्यांची लव आता काळी व्हायला लागली आहे. दाढीमिश्या काळ्या झाल्या की मग तू पुरुष झालास. ”

“ मग आपल्याला बरोबर फिरता येणार नाही. ”

" नाही, लोक चिडवतील. "

" मग आपण काय करायचं ? "

" काय करायचं सांगू ? "

" सांग ना. "

" नको. वेडाच आहेस तू ! जा, जाऊन आधी अभ्यासाला बस. "

" मला वेडा म्हणू नकोस हं तू. मारीन बघ तुला. "

सुमन त्याच्या अगदी जवळ गेली. " खरंच मार मला. ती आंब्याची डहाळी तोडून घे आणि मार. "

" नाही, मी मारणार नाही तुला. लहानपणी तूच मारायचीस मला. बोचकारे काढायचीस, नखं लावायचीस, पण मी कधीतरी मारलं होतं का तुला ? "

सुमनच्या डोळ्यांत टचकन अश्रू उभे राहिले. भरल्या डोळ्यांनीच ती त्याला बघत होती. त्याचा चेहरा लोण्यासारखा नितळ, डोळ्यांत लहान बालकाचा भाबडेपणा. सुमनला वाटलं, खिडकीतून आत पाहावं तसं कुणीही याच्या मनात आरपार पाहावं. उद्या हा मोठा माणूस झाला तरी याच्या चेहऱ्यावरचं हे निरागस बाळपण तसंच राहील.

एकाच वृक्षाला फुटलेल्या फांद्या आणि डहाळ्या असाव्यात तशी ही वस्ती. प्रत्येक जण प्रत्येकाचा भाऊ, चुलतभाऊ, बहीण, चुलत बहीण आवशी नाहीतर मावशी. भावाची बायकोसुद्धा आईच. त्यामुळं एक दुसऱ्याच्या संबंधाबद्दल संशय, ताण-तणाव तिथं मुळीच नसायचा. खूप पूर्वी कधीतरी एक वाईट गोष्ट घडली असं म्हणतात. नदीकाठच्या त्या ' कुवाऱ्या खडकाची ' साक्ष देऊन मोठी माणसं सांगतात, एक अजाण पोर कशी कोण जाणे, फसली गेली आणि तिला दिवस गेले. तिने नाव सांगावं म्हणून बापाने, चुलत्याने काय काय केलं, मारलं, बदडलं पण तिने शेवटपर्यंत तोंडातून एक शब्द काढला नाही. एके रात्री गुपचुप जाऊन नदीत जीव दिला. वस्तीतल्या लोकांनी तिचं प्रेत तिथं नदीच्या तीरावरच पुरलं आणि त्याच्यावर ती शिळा ढकलून ठेवली. असं सांगतात की अजून- देखील कुणी त्या शिळेवर जाऊन बसल्यास खालून रडल्याचा आवाज ऐकू येतो.

गोविंद या गावचा भाचा पण आता तो या मुलांमध्ये इतका मिसळून गेला होता की तो पण आता गावातल्या मनू, अशोक, बाळू या मुलांसारखाच सुमनचा चुलतभाऊ असंच लोकांना वाटायचं. सुमन वयात येईपर्यंत लोकांना

त्याचं भानच नव्हतं. पण सुमन अंगाने भरली, तिच्या घामाला वास येऊ लागला, तसंच गोविंदच्या मिश्या काळ्या होऊ लागल्या तसे लोक सावध झाले, विशेषतः आवश्या, मावश्या, बायका मंडळी.

"बाळे, हा भाचा आहे, भाऊ कसा होईल? हा वस्तीतल्या कुठल्याही मुलीचा नवरा होऊ शकतो."

"पण गोविंद सुमनपेक्षा लहान नव्हे का?"

"लहान कसा असेल? गोविंदची आई वत्सला त्याला घेऊन माहेरी आली होती तेव्हा अनसूया एवढं मोठं पोट घेऊन शेतात जायची कामाला. मी म्हणाल्याचं देखील आठवतं, 'अग अनसूया, गरोदर बाईने असं उभा नेर उपटू नये, गर्भाला बाधतो.' मला माहीत आहे ना, गोविंद अगदी मृगाच्या वेळी जन्मला तर सुमन गणेशचतुर्थीनंतर झाली होती. तीन-चार महिन्यांनी तरी लहान असणार ती."

एक दिवस सुमन गोविंदला घेऊन शिद्दरामच्या डोंगरावर गेली होती तेव्हा मात्र वस्तीतल्या बायकांना तिचा राग आला.

शिद्दराम डोंगरावरचे ते तीन भिल्लमाड लहानपणापासून सुमनला खुणावत होते. डोंगराच्या टोकावर एकमेकांशी गप्पा करायला उभे राहिल्यासारखे कोंडाळं करून ते उभे होते. ते इतके उंच होते की त्यांची झावळं आकाशात शिरल्यासारखी वाटायची. चांगला उजेड असलेल्या एखाद्या दिवशी तर ते लांब, आवाक्याबाहेर जायचे, जास्तच उंच होऊन आकाशात शिरायचे. तर कधी डोंगरावर सावट उतरू लागल्यावर ते बुटके होऊन अगदी जवळ आल्यासारखे वाटायचे. सारखं त्यांच्या बुंध्याशी जाऊन बसावं आणि गोविंदला साद घालावी!

गोविंदची मॅट्रिकची परीक्षा संपली आणि सुमन त्याच्या अगदी पाठीस लागली, डोंगरावर जाऊ या म्हणून.

"पण असं काय ठेवलं आहे ग त्या डोंगरावर?"

"मला त्या भिल्ल माडांच्या मुळाशी जाऊन बघायचं आहे. वाटल्यास आपण चारं, चुन्नं, करवंदं काढू. वर डोंगरावर जाऊन पाहिल्यास नदीचा गाव, शेतं, उसाचे मळे किती सुंदर दिसतात माहीत आहे?" तिथून तुझा असनोटी गावदेखील दिसतो म्हणे.

"असनोटी दिसतो.?"

"हो तर."

"मग मामाला कुठं जातो म्हणून सांगू?"

" काहीपण सांग रे. शाळेत काम आहे म्हणून सांग, नाहीतर देवळाजवळच्या मित्राकडे जातो म्हणून सांग. "

" तू काय सांगशील ? "

" मी सांगेन आपाला, गोविंदबरोबर चारं, चुन्नं काढायला जाते म्हणून. "

" गणेशमामाला राग नाही यायचा ? "

" राग बिग सगळं सोडून दिलं आहे रे, आपाने. गोविंद, आपाला काय झालं आहे कळत नाही. पूर्वीसारखा तो रागावत नाही, शिव्या देत नाही, गप्प बसून राहतो माजघरात. कधी कधी स्वप्नात आईला बोलावतो, मोठमोठ्याने हाका मारतो. एक दिवस त्याने काय केलं माहीत आहे ? ट्रंकेतून आईचं एक जुनं नऊवारी लुगडं काढलं आणि ते माजघरात दांडीभर पसरवून घातलं. " बोलता बोलता तिचा कंठ दाटून आला, शब्द घशात बुडाल्या- सारखे झाले.

सकाळी ती दोघं शेतं ओलांडून डोंगराच्या पायथ्याशी पोचली तेव्हा सूर्य माडभर वर आला होता. सगळा परिसर उजेडाने झगमगत होता. डोंगरावरचा प्रकाश घसरून नदीच्या प्रवाहात उतरला होता आणि प्रवाहातला तो प्रकाश झाडाझुडपांवर झेपावत होता. इतका लखलखीत स्वच्छ प्रकाश ! त्यांना वाटलं, इथं आज प्रकाशाचा महापूर आला आहे आणि त्यात सृष्टी बुडून उभी आहे. पाऊस संपून गेल्यावर कार्तिक जवळ आला की या परिसरातल्या निसर्गाला एक आगळंच चैतन्य लाभतं. चोहीबाजूंनी हिरवंगार सृष्टिसौंदर्य आणि त्यावर प्रकाशाचा झगमगाट ! मग लहान-थोर सगळे या प्रकाशातल्या पाचूचं वेड लागल्यासारखे वनराईतून डोंगराच्या पायथ्याशी फिरतात. खुंट, काठ्या, मेढी वगैरे आणायच्या निमित्ताने डोंगराच्या दिशेनेच चालत राहतात. कार्तिक ते माघपर्यंत चार महिने रानं गजबजून जातात.

डोंगराच्या पायथ्याशी आल्यावर वर पाहिलं तेव्हा त्यांना भिल्लमाड अचानक डोक्यावर आपटायला आल्यासारखे जवळ वाटले. एवढं मोठं उंच कांड आणि वर गेलेली झावळं. पण पाहिलं तर समोर अगदी उभी चढण आणि टेकड्या. जवळ येऊन सुद्धा दूरच.

" मागीलदारातून किती सोपा वाटायचा नाही ग, हा डोंगर ? "

" काहीपण असो, गोविंद. आता डोंगरावर गेल्याशिवाय परत नाही फिरायचं. "

ती दोघंही डोंगर चढू लागली. समोरच कुणीतरी गुरं हाकीत असल्यासारखा आवाज आला. पाहिलं तर समोर दहा-बारा गुरं. मग वरून टेकडी उतरून कुणीतरी त्यांच्या जवळ आला. त्याने लंगोट लावला होता

आणि त्याचं सगळं अंग उघडंच होतं, खांद्यावर एक फाटकी घोंगडी टाकलेली. हातातली काठी समोरच्या प्रत्येक दगडावर आपटीत तो चालत होता. सुमनने त्याला ओळखलं, हा मुदग्यातला तातू.

“ तातूमाम, आम्ही भिल्लमाडांकडे जातोय. ”

“ अग, तू खालच्या वस्तीवरच्या गणेशमामाची मुलगी ना ग? भिल्लमाडांकडे का चाललात? त्यांच्या आढ्यांचा मांडव घालायचा आहे का तुझ्या लग्नात? ते माड अगदी इकडे, जवळच वाटतात तुम्हाला. पण ही टेकडी ओलांडल्यावर आधी आडवन, मग खडवन लागतं. खडवनात गेलेला कुणी कधी परत येतो का? तिथं गेल्यावर माणूस रानवेडा होतो. सगळ्या वाटा मुक्या होतात, सूर्याची पूर्व-पश्चिम चुकते. बसा, बसा इथं जरा वेळ. तू भास्करचा भाचा ना रे? ओळखतो मी तुला. वेडेपणा करू नका. इथूनच परत फिरा. ”

“ पण आम्हाला जायचंच आहे माडांजवळ. ये ग सुमन. तो घांग्रेचा खडक दिसतो ना, त्या दिशेने जाऊ. ”

“ बघा हं, तुम्ही मुलंच आहात, वाट चुकलात तर रडत बसाल. ”

पण त्याचं काही एक न ऐकता ती डोंगर चढू लागली. मागून तातू म्हणाला, “ जा, वाट मिळेपर्यंत डोंगर चढा. मग मात्र परत फिरा. मी इथंच गुरं वळवीत राहतो. माझा कानोसा घ्या. ”

आणि खरंच ती डोंगर चढत असताना, तातू मधून मधून गुरांना हाका मारीत राहिला. मागे कोणीतरी आहे सोबतीला असं सारखं वाटावं म्हणून.

अर्धा पाऊण तास चढण चढून ती वर गेली आणि समोरच्या सगळ्या वाटा कुणीतरी कवटाळून नेल्यासारख्या बंद झाल्या. समोर नुसत्या झुडपांच्या, काटेरी झाडांच्या राई. मधेच त्यात एखादा बाण मारून वर आल्यासारखा उंच उंच वृक्ष. एकाएकी छातीवर दडपण आल्यासारखं वाटलं त्यांना. अख्खं आडवन अंगावर कलंडलं. वर पाहिलं तर भिल्लमाड पण दिसेनात.

“ आपण परत फिरू या, सुमन. ”

भयभीत नजरेने सुमनने चारी बाजूंनी पाहिलं. समोरच्या जंगलाचा अंत लागत नव्हता. मी नेहमी मागीलदारातून पाहायची तो हाच का डोंगर? तिला संशय येत होता. समोरचा तो अवाढव्य वृक्ष दोन खांदे आडवे पसरून कवायतीला उभा राहिल्यासारखा दिसत होता. सुमनला उगाचच वाटलं, हा वृक्ष काहीतरी बोलणार आहे. पांढऱ्या अंगाच्या नाण्याच्या झाडाला नुकतीच पांढरी-हिरवी पालवी फुटली होती. वरच्या लखलखीत प्रकाशात ते झाड हसत असल्यासारखं

वाटत होतं.

‘‘ गोविंद, आपण तिथं त्या मोकळ्या जागी जरा वेळ बसू या. ’’

ती एकमेकांजवळ बसली. बोलणंच संपल्यासारखी गप्प. समोर पाहिलं तर प्रकाशाने निसर्गाची एक रंगावली चित्रित केली होती. उजेडाचा प्रचंड पडदा. त्यावर घांग्रीचा खडक, नदी, बेटं, उसाचे मळे, शेतं आणि गाव. पुन्हा या सगळ्यांना डोंगरांचं कोंडाळं. त्यात शिमग्याच्या तळीसारखा सात गावांचा हा रमणीय परिसर. पण या दोघांना त्याचा थांग लागत नव्हता. एवढीशी पोरं आणि एवढा मोठा परिसर एका दृष्टिक्षेपात. कुठचा गाव कुठे संपला आणि नदीचा प्रवाह कुठून कुठे पोचला, काहीच कळत नव्हतं.

‘‘ सुमन, ते आंब्याचं बेट ना ? ’’

‘‘ नाही रे, कारगे बेट असेल. नाहीतर बोटजुवा पण असू शकेल. ’’

‘‘ असनोटी गाव इथून दिसतो म्हणत होतीस ना ग तू ? ’’

‘‘ काहीच कळत नाही. अजून उंच, भिल्लमाडांजवळ गेल्यास कदाचित दिसेल. ’’

थोडा वेळ ती तशीच बसून राहिली. आता गोविंदला उमगलं, आपण दोघंच या डोंगरावर झाडां-झुडपांमधे बसलो आहोत ! घामाने चिंब भिजलेला सुमनचा चेहरा सुरेख, लाल झाला होता. घामाची धार गळ्यावरून ओघळत उभार छातीवर उतरली होती. काही काळ तो आजूबाजूचा परिसर विसरून सुमनमधे गुंतला.

‘‘ मलाच काय बघतो आहेस रे, गोविंद ? ’’

‘‘ काही नाही ग, उगीचच. ’’ चाचरत गोविंद म्हणाला, ‘‘ बाळू, मनू वगैरे ना मला तुझा नवरा म्हणून चिडवतात ग ! ’’

ऐकून सुमनच्या चेहऱ्यावर हास्य फुललं. ‘‘ मग त्यांच्याशी भांडत नाहीस ना तू ? ’’

‘‘ नाही. ’’

‘‘ का ? ’’

‘‘ मला आवडतं चिडवलेलं. तुला नाही आवडत ? ’’

सुमनचं काळीज कलकललं. कसला तरी आधार घेतल्याप्रमाणं समोर येऊन तिने गोविंदचा खांदा घट्ट पकडला. काही वेळ दोघंही स्तब्ध, निःशब्द ! मग सुमन लगबगीने उठली. ‘‘ आता आपण जाऊ या, गोविंद ! ’’

‘‘ मी तुला मिठीत घेऊ ? जराशीच. ’’

‘‘ नको. चल तू. ’’

ती वाट उतरू लागली. मागून येताना गोविंद म्हणाला, "रागावलीस का ग?"

"नाही रे, खरंच नाही रागावले तुझ्यावर. किती चांगला आहेस तू. कशी रागवू तुझ्यावर?"

"मग... " गोविंद चाचरू लागला.

"कुमारी मुलीने पुरुषाला तसा सर्वस्वी स्पर्श करायला देऊ नये, पाप लागतं."

मुकाट्यानेच ती दोघं डोंगर उतरत होती. मागून आडवनातून कसल्या कसल्या शिळी, पाखरांचा किलबिलाट ऐकू येत होता. मधेच तांब्याच्या हंड्यात तोंड घालून बोलत असल्यासारखा घुमघुम आवाज वर घुमत होता.

मधेच गोविंद म्हणाला, "सुमन, ती बघ सीतेची चवरं. काढून आणू?"

तो बाजूच्या झुडुपांत शिरला आणि त्याने बचकाभर फुलं काढून आणली.

"माळ तू ही, सुमन."

तिने ती हिरवीकंच, पाचूच्या कणसारखी फुलं केसांत घातली. तिचं डोकं भरून गेलं. मग गोविंदने पिटकुळीच्या लाल फुलांचा तुरा काढून आणला. तो पण तिने केसांत घातला.

ती पायथ्याशी पोचली तेव्हा तातू गुराखी गुरांना हाकारीत एका कातळावर बसला होता. त्यांना बघून तो म्हणाला, "कशी सुरेख, देवीसारखी सजली आहेस ग, मुली तू! या सीतेच्या चवरांचा महिमा माहीत आहे तुला? रावण सीतेला उचलून नेत असताना तिच्या गंठणातले काळे मणी वाटभर सांडले. त्यांनाच काही दिवसांनी अंकुर फुटले आणि ही सुंदर पानफुलं वर आली. सीता परत येईल तेव्हा आपण तिचं स्वागत करू म्हणून ती वाट पाहत राहिली. पण सीता काही त्या वाटेने परत आलीच नाही, ती विमानात बसून भलत्याच वाटेने गेली. अजूनही त्यांना फुलं फुलत नाहीत. जमिनीतून फक्त पानं वर येतात आणि मोरपंखासारखी उभी राहतात. इतकी विलक्षण सुंदर पानं जगात दुसरी कोणतीच नाहीत."

ती नुसती ऐकत होती. तोच उलट म्हणाला, "जाऊन आलात तुम्ही भिल्लमाडांकडे?"

"नाही, तातूमामा, वर जायला वाटच नाही."

"मला माहीत आहे, सिद्धराम डोंगरावरच्या सिद्ध पुरुषाने वरची वाट अडवून ठेवली आहे, आपल्या तपश्चर्येत व्यत्यय येऊ नये म्हणून."

"कुणाची तपश्चर्या?"

“ ते तीन भिल्लमाड आहेत ना, ते तीन सिद्धपुरुष शेकडो वर्षं पाय वर आणि डोकं खाली करून तपश्चर्या करीत होते. हळूहळू त्यांच्या केसांची पाळंमुळं झाली आणि ती जमिनीत शिरली. पायाच्या बोटांना फाटे फुटले आणि त्यांची झावळं झाली. आता ते आकाशाला भिडण्यासाठी वाढत आहेत. ज्या दिवशी त्यांचे पाय आकाशाला भिडतील तेव्हा ते वाढायचे थांबतील आणि त्यांची तपश्चर्या पूर्ण होईल. मग ते लोकांमध्ये परत येऊन जगाचा उद्धार करतील. जगातली सगळी दुःखं नाहीशी होतील. ”

सुमन बारकाईने तातूला न्याहाळीत होती. तिला वाटलं, जांभ्या वृक्षाचं कापलेलं खोड– त्याला पाय फुटले आहेत आणि ते गुरांच्या मागे फिरत आहे. उन्हाने त्याच्या चेहऱ्यावरची, अंगावरची कातडी करपून गेली होती. हातापायांच्या काड्या – पायांत तुटक्या वहाणा – फक्त दगड-धोंड्यांतून आणि काट्यांतून चालताना तो त्या पायांत घालत होता. एरव्ही त्या हातात घ्यायचा. त्यामुळे त्याच्या पायांना आडव्या-उभ्या भेगा पडल्या होत्या. पण त्याच्या डोळ्यांत मात्र वेगळीच लकाकी होती. ते डोळे गुरांवर, चारी बाजूच्या परिसरावर भिरभिर फिरत होते.

“ तातूमाम, या दिवसात शेतांची कापणी, मळणी झाली आहे, कुणीच गुरांना राखत नाही. मग तूच का गुरांना घेऊन फिरतो आहेस ? ”

एकाएकी तातूचा आवाज चढला. “ शेताचं काम संपलं म्हणून काय झालं ? उसाचे मळे आहेत, भाजीचे मळे आहेत. उद्या या मळ्यांमधे गुरं घुसली तर ? ”

“ आमच्या वस्तीत तर गळ्यातलं दावं काढून गुरांना मोकळीच सोडून देतात. कसलीच तक्रार नसते. फक्त पावसाळ्यात तेवढी राखायची. उन्हाळ्यात त्यांच्या मागे कशाला जायचं ? ”

तातू लहान मुलासारखा हसला. “ गुराखी मी, पाच भावांतला शेवटचा. मी इतका बारीक आणि अर्धवट होतो. माझ्या गळ्यात हे गुरं राखायचं काम बांधलं ते कायमचंच राहिलं. आमची बरीच शेतीभाती आहे, पण आयुष्यात एकदासुद्धा शेतात खोरं हातात धरलं नाही. भाऊ वेगळे झाले पण मी एकत्र राहिलो. आणि त्या सगळ्यांची गुरं एकत्रच राखतो मी. जेवायच्या वेळेस कुठल्याही एका भावाच्या माजघरात जाऊन बसतो. भावाने लग्न करून दिलं पण बायको वेडी. रात्री उठून गावभर फिरायची. एके दिवशी विहिरीत पडली आणि मेली. ”

गोविंद, सुमनला वाटलं, खूप खूप दूरची वाट तुडवून गेल्यानंतर एखादा

वाटसरू सोबतीला मिळावा आणि त्याच्याशी बोलत बोलत, चालत राहावं तसा तो बोलतो आहे, वाट आणि मनाची तळमळ लवकर संपावी म्हणून.

"बसा, या कातळावर जरा बसा. तुम्हाला ठाऊक आहे? रानाला सुद्धा जीव असतो. ते शीळ घालतं, रडतं आणि हसतं. एखादा काळा ढग त्याच्यावर वाकला की त्याचं रोम रोम फुलून येतं आणि आंघोळीसाठी आसुसतं. चैत्र-वैशाखीच्या उन्हात रान भाजून निघतं, ते सुस्कारे सोडतं, कण्हतं. मी ऐकलं आहे त्याचं कण्हणं. मला रानवेड लागलं आहे या रानाचं. पायथ्याशी आलो की मला उन्हातून सावलीत आल्यासारखं वाटतं. माझं रान आणि माझी गुरं, हेच माझं जग. चाळीस वर्षात कधी एकदासुद्धा रान चुकवलं नाही मी. गावच्या जत्रेच्या दिवशी देवळाच्या माळावर वाजंत्री वाजतात, आतषबाजी होत असते. पण मी मात्र गुरांना घेऊन रानाच्या दिशेने चालायला लागतो. तुम्हाला माहीत आहे, गेल्या वर्षी माझ्या थोरल्या वहिनीने कार्तिक पौर्णिमेचं सणाचं जेवण मला रानात पाठवलं होतं?"

सुमनने काहीशा विचित्र नजरेने त्याच्याकडे पाहिलं अन् ती म्हणाली, "आम्ही निघतो आता."

ती दोघं चालायला लागली. तातू मोठ्याने म्हणाला, "या रानाच्या कुशीत म्हणून मी तुमच्याशी इतकं बोललो. गावात पोचलो की माझी जीभ मुकी होते. काही लोक तर मला मुकाच समजतात."

सुमन आणि गोविंद खाली पोचले तेव्हा त्यांनी वर पाहिलं. पानं झडलेल्या काळ्या खोडासारखा तो त्या कातळावर उभा होता. त्याच्या भोवती गुरं होती म्हणूनच त्याला माणूस म्हणावं नाहीतर तोसुद्धा जणू त्या रानातलं एक झाडच! त्यांना वाटलं, आता आपल्याशी एक झाडच बोलून गेलं.

ती वस्तीच्या जवळ पोचली तेव्हा तिथल्या काही बायका फाटकापाशी उभ्या राहून त्यांच्याकडे बघत होत्या, रागाने, संशयाने!

फाटकात पाय ठेवला मात्र, अंबूमावशीने विचारलं, "कुठं गेला होतात सुमन?"

"अशीच जीनवटीपर्यंत जाऊन आलो."

"वरून खोटं बोलतेस होय? दळभद्रीच्या अंगात कोणता ऊत आला आहे कोण जाणे! पुरुषाला बरोबर घेऊन वरच्या रानात एकटीच जाऊन आली आहेस!"

"नाही ग मावशी."

"मग ती सीतेची चवरं कुठं सापडली तुला? वरच्या रानाशिवाय

दुसरीकडे कुठं आहेत का ती ?'' सुमन गप्पच राहिली.

गोकुळमावशी जवळ आली. बारकाईने न्याहाळीत तिच्या भोवती एक फेरी मारून म्हणाली, ''कुठं गेला होतात ग ? जाऊन काय केलं ? आधी वस्तीवरच हैदोस घालीत होता, आता डोंगरावर जायला लागलात. आई गेल्यामुळे वाह्यात झाली आहेस तू. पण रांडे मी सांगते तुला, कोणतेही नष्टकर्म केलंस तर वेताच्या छडीने झोडून काढणार मी तुला.''

बाजूला जास्वंदीच्या झाडाजवळ सुमित्राकाकी उभी होती. तिने जवळ येऊन सुमनच्या हाताला धरलं आणि तिला घरी नेलं. ती गोविंदला म्हणाली, ''चल रे भाच्या, जा मामाकडे आणि मामीच्या ओटीत बस. अजून मिसरूड नाही फुटली आणि मामाच्या मुलीला डोंगरात घेऊन फिरतोस होय ?''

सुमित्रा सुमनला घेऊन माजघरात येऊन बसली. तिच्या पाठीवरून हात फिरवीत आपल्या मधाळ शब्दांत तिला म्हणाली, ''आई नसलेली पोर तू. वस्तीतल्या बायकाच तुझ्या आईसारख्या आणि म्हणूनच तुझ्या हिताचंच सांगतात. त्या वयात आलेली मुलगी आहेस तू आता, पोरकटपणा सोडून दे. पुरुष मुलाच्या जवळ जास्त राहायचं नाही.''

''गोविंद चांगला आहे ग, काकी. तसं काहीच नाही ग. तो बरोबर असला की मला बरं वाटतं इतकंच.''

''त्याच्याशी बोलू नये असं नाही म्हणत आम्ही तुला. उद्या तुझ्या नशिबात आहे तेच होईल; पण आता स्वतःला संभाळून राहा. बायकानी जास्त उच्छृंखलपणा दाखवला तर बघणाऱ्याला त्या जरा स्वस्त वाटतात. स्त्रीचं शरीर म्हणजे झाकली मूठ.''

पुढचे आठ दिवस सुमन गप्पच होती. माजघरात एकटीच बसून राहायची. अचानक सारं जग संपून आपल्याला मधेच लोंबकळत ठेवलं आहे असं वाटत होतं तिला. बाय गेल्यापासून माझं आता कुणीच उरलं नाही ! जिवाभावाचा माझा मित्र गोविंद. पण तोही आता माझा राहिला नाही. फ्रॉकच्या ओटीतून आंबा काढून न्यावा तसा या लोकांनी का म्हणून न्यावा त्याला ? पण मी त्याची मैत्री सोडणार नाही !

आतादेखील ती पूर्वीसारखीच माजघराच्या पूर्वेला बसून गोविंदची चाहूल घ्यायची. गोविंदही पूर्वीसारखाच कधीतरी माजघरात येऊन बसायचा. पण तो दिसला की त्याच्याशी बोलताना सुमनचं काळीज उगाचच कलकलायचं, पूर्वीसारखं हसून खेळून बोलणं व्हायचं नाही. मोजून मापून बोलणं आणि मधेच भिरभिरत्या नजरेने चारी बाजूला पाहणं, पण सुमनला कळत होतं,

बाळपण आता संपलं आहे आणि आता जास्तच.

आपा पूर्वी केळीच्या पानावर मूठभर तंबाखू घालून वीतभर विडी वळायचा. कांबळीचं फटकूर कापून केलेली एक पिशवी होती त्याची. त्यातच तो विडीचं सगळं सामान घालून ठेवायचा. नेहमी रात्री तो विड्या वळून ठेवायचा आणि दिवसभर त्या ओढायचा. आणि खोकायचा देखील. पण अचानक त्यानं विडी ओढणंच सोडून दिलं. माजघरात भिंतीला टेकून गप्प बसून राहायचा आणि काळोखातला प्रकाश शोधत असल्यासारखा कुठंतरी दूर बघत राहायचा. मूकस्तंभासारखा तास न् तास गप्पच! कधी मधेच त्याला तोंड फुटाचं आणि तो भडाभडा बोलत राहायचा. " मेल्यांनो, कसली शेती करता, धरतीवर xxx फिरवल्यासारखं? नांगर असा उभा ठेवून धरतीची छाती फोडायला पाहिजे, माती नीट वर काढायला पाहिजे, बैलांच्या गांडीतून फेस बाहेर आला पाहिजे. उद्या म्हणणार पीकच चांगलं आलं नाही, पावसानेच दगा दिला. आधी हाडं झिजवा मग खंडीनी भात. साळीचा सुरय भात जेवायला सरावला आहात तुम्ही चाकरीवरच्या शिपायासारखं. पाणया, आजगा नको झाला आहे तुम्हाला. सरकारी खताची साखर मिळाली आणि शेण-पाला वाऱ्यावर टाकला तुम्ही."

"आपा, एवढी विडी तरी वळून ओढ ना रे!"

"वासनाच मेली आहे ग, बायूल. तुला आईची, बायची आठवण येते का ग कधी? तुझी आई कशी दिसायची?"

"मला आठवत नाही, आपा."

"बायला आठवते. त्या शहाणीला सगळं नीट आठवतं. ती सांगते, आई देवीसारखी दिसायची म्हणे. पांढरी कांदळं केसांत घालायची आणि तिला उवा व्हायच्या म्हणे."

सुमनला रडू येत होतं, ती लगबगीने आत पळाली आणि चुलीच्या समोर बसून रडू लागली. "असं काय करतोस रे आपा, तू?"

एका रात्री, मध्यरात्री, अंगणात राहून हाका मारीत असल्यासारखा आवाज ऐकू आला. सुमन झोपेत होती. थांबून थांबून हाका ऐकू येत होत्या. आपल्याच घरी का शेजारच्या गोकुळमावशीच्या, काही कळेना. सुमन ऊं ऊं करीतच उठली आणि काळोखातच धडपडत जाऊन तिने दरवाजा उघडला. अंगणात केशवअण्णा आणि त्याची बायको हातात चिमणीचा दिवा घेऊन उभी.

"कोण ग? काय झालं केशवअण्णा?"

“ गणेशबाब झोपला आहे का ग घरात ? ”

केशवने हातातला दिवा घेऊन माजघरात पाहिलं. अंगाखालची चटई गुंडाळून भिंतीला टेकून उभी करून ठेवली आहे, कांबळ मात्र नाही.

सुमनने हंबरडा फोडला. “ काय झालं केशवअण्णा ? मावशी काय झालं ग ? ”

“ ऐक. तुझा आपा - मध्यरात्री जाऊन त्याने शेतात नांगर धरला आहे. तरी आम्हाला संशय आलाच तो गणेशबाब असावा म्हणून. ”

मग ते अंगणाच्या काठाजवळ जाऊन उभे राहिले. लांब शेतातून बैलांना हाकलीत असल्याचा मोठमोठा आवाज ऐकू येत होता, “ अम्म हऽऽय्, अ रा रा हम्म हऽऽय ! ह्यांच्या तोंडाला हळद लागू दे, गोठ्यावर कौलं पडू देत... ”

सुमन बावरून गेल्यासारखी ऐकत होती. केशवने म्हटलं, “ उल्का-वर्षावाचा पुंजका अजून माथ्यावरून ढळलाच नाही, मध्यरात्रसुद्धा अजून पुरती टळलीच नाही आणि ह्याने काळोखात बैल नेऊन बांधले आहेत. नांगरलेलं दिसतं तरी का याला ? ”

अंगात आल्यासारखा आपा बैलांवर ओरडत होता आणि नांगर चालवीत होता. मधेच बैलांच्या अंगावर आसूड पडल्याचा आवाज ऐकू येत होता. सुमनची भीतीने गाळण उडाली होती. “ कुणीतरी जाऊन आपाला नांगर सोडवायला लावा ना रे ! ”

“ आता एक तरी कुणगी कसून झाल्याशिवाय नांगर सोडणार नाही तो. तू जाऊन झोप जा. ” देवकीने तिला हाताला धरून घरात नेली आणि दरवाजा ओढून घेतला. सुमन दाराआड बसून आपाच्या आवाजाची चाहूल घेत होती. बसल्या ठिकाणी तिला झोप येऊ लागली. ती तिथेच लवंडली.

सकाळी जाग आल्यावर सुमनने बाहेर येऊन पाहिलं तर आपा डोक्यावर कांबळ ओढून घेऊन माजघरात झोपला आहे. बराच वेळ ती त्याच्याजवळ मुकाट्याने उभी राहिली. आपाला तशा स्थितीत बघून तिला एक प्रकारची भीती वाटली. त्याला उठवावं म्हणून ती जवळ गेली तर कण्हण्याचा आवाज आला.

“ आपा, आपा ! ”

आपाने तोंडावरचं पांघरूण काढलं. थोडा वेळ प्रकाशाने दिपावल्यासारखे त्याचे डोळे उघड-झाप करीत होते. “ आपा, मध्यरात्री जाऊन तू नांगर का धरलास ? ”

“ डोंगरापलीकडे समुद्राची गाज तुला ऐकू नाही येत ? नदीचा प्रवाह

सुकून आकाशात पोचला. पाऊस येऊन डोंगरावर टेकला तरी हे लोक बी-बियाणं घरीच घेऊन बसले आहेत. उद्या पाऊस एकदम कोसळला की बियाणं भाजून पेरा म्हणावं. ''

'' असं बोलू नकोस रे, आपा! ऊठ, मी चहा करून देते तुला. ''

गणेशने अगदी तीन वेळा कसून जमीन तयार करून ठेवली. रात्रंदिवस तो नुसता शेतात. एका खांद्यावर नांगराचं जोखड, दुसऱ्या खांद्यावर खोरं आणि कुदळ. समोर बैलांना हाकत रात्रंदिवस शेतात. बैलांना सोडलं की हातात कुदळ घेऊन कोपरे, कडा बारीक तुडवून घ्यायचा; मग सगळ्या लहान-मोठ्या ढेकळांची पूड करायचा. कुठून एवढी ताकद त्याने गोळा केली होती, देव जाणे! थकणं त्याला माहीतच नव्हतं. चैत्र-वैशाखाच्या रणरणत्या उन्हात, भर दुपारी हा शेतात असायचा.

भेटलेल्या सगळ्यांना तो सांगत सुटला होता, '' अरे, पाऊस येऊन आकाशाला भिडला आहे. तो तुम्हाला फसवायला थांबला आहे. ''

लोकांनी एकदाचं सुपात बी घेऊन शेतात उडी घेतली. सगळीकडे बैल धावत होते, त्यांच्या पाठीवर छड्या फुटत होत्या. सगळा गाव शेतात. कोण कसत होते, कोण खत-पाणी घालत होते, कोण कडा-कोपरे तुडवत होते, मेर धरत होते, एकूण सारी धडपड!

गणेशने पेरणी करायला मूठ मारली आणि जरादेखील उसंत न घेता त्याने आपलं सहा खंडीचं शेत पंधरा दिवसात पेरून टाकलं. त्याने सुमनला पण उसंत घेऊ दिली नाही. डोक्यावर बी भरलेली पाटी, वरती सूप आणि हातात फडक्यात गुंडाळलेल्या भाकऱ्या. दिवस माथ्यावर येईपर्यंत ती आपाबरोबर शेतात राहायची. वरून आपाचा तापटपणा. कामाच्या मागे तिला नुसतं पळवायचा. आपाचंच खाणं, जेवण नव्हे तर बैलांचं गवत, पेज-पाणीदेखील ती शेतात आणून पोचवायची.

पेरणी संपली आणि एकदम जमिनीला पाय टेकल्यासारखा त्याच्यावरचा भार उतरला. आता तो उगाचच कडानी फिरायचा.

पेरत असताना बी मुठीतच घेऊन रामदादाने म्हटलं, '' गणेश, लवकरच पेरून टाकलंस की रे तू! ''

'' शेत तयारच होतं, रामदादा. टाकलं पेरून. आधीच उशीर झाला आहे. ''

'' तुझं बरं रे! तुझं शेतच कसं छान! बी पेरलं आणि पावसाची वाट बघत राहिलं. आमच्यासारखं नाही. ''

" खरंच माझं शेत छान. खंडीला कुंभभर पीक देणारं."

" असू दे बाबा. कुंभभर पिकूं दे तुझ्या शेतात. आता नांगर-धुण्याची 'सागुती' कधी रे?"

" नांगर-धुणी इतक्या लवकर? घरी असलेलं सगळं आणून शेतात ओतलं. आकाश अजून आग ओकतं आहे. एवढ्या लवकर नांगर-धुण्याचं काय बोलतोस तू रामदादा? आधी पेरलेलं उगवू दे तर खरं. बी रुजेल तेव्हा खरं."

रामदादाची बायको नवऱ्याला म्हणाली, " उगाचच लोक म्हणतात, गणेशचं डोकं फिरलं आहे म्हणून. मला तर तो चांगला शहाणा वाटला."

" अग, पण आधी तो कुठं एवढा बोलायचा? आता कामसुद्धा तसंच अंगात आल्यासारखं करतो आणि बोलतोही खूप. काय ते देवालाच माहीत."

पेरणी झाली आणि दुसरे दिवशी सकाळी सुमन बैलांच्या गळ्यातली कानी काढायला म्हणून गोठ्यात गेली. पाहते तर शिबऱ्या बैलाचा खांदा सुजून जू घ्यायच्या जागी एवढं मोठं गळूं. तो मानदेखील हलवू शकत नव्हता. रडल्यासारखं डोळ्यांतून पाणी गळत होतं, डोळ्यांभोवती पूर साचला होता. पाठीवर हात ठेवला तर थरारणं पण नाही. सुमनने तिथूनच मोठमोठ्याने हाका मारल्या, " आपा, इथं ये आपा. शिबऱ्याला काय झालं आहे बघ!"

आपा अंगणात उभा होता, " काय झालं ग, बायूल?" म्हणत तिथं आला. सुमनच्या हाका ऐकून गायरीपाशी खत भरणारा केशव, शेतात जायला निघालेला खुशाली वगैरे आले.

वस्तीतल्या लोकांची गुरं पावसाळ्यात वरच्या वाटेने डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या गोठ्यात असतात. उन्हाळ्यात मात्र वस्तीभोवती गव्हाणी घालतात. प्रत्येक झाडाच्या बुंध्याशी सावलीत एक गव्हाण आणि वर झावळ्यांचं छप्पर.

सगळेच तिथं आले आणि त्यांनी बैलाला पाहिलं. खुशाली म्हणाला, " अरे बाबा, गणेशदादा, बैलाला खांदा आलाय की रे! नांगर उभा धरूनच तुला कसायला हवं. वरून छड्या मारून बैलांना पळवतोस. गेले दहा-बारा दिवस क्षणाचीही उसंत न देता त्यांना झोडून काढलंस. कोंबडा आरवला की जोत बांधायचं आणि दिवस माथ्यावर आला तरी सोडायचं नाही. संध्याकाळी आणि पुन्हा तेच. काय अंगात आलं आहे तुझ्या? मुकं जनावर ते बिचारं. शेतकऱ्यानेच त्याचा जीव संभाळायला पाहिजे!"

गणेश जवळ गेला. शिबऱ्याला गोंजारत " माझा शहाणा, माझा गुणी

तो. काय झालं रे देवा'' म्हणत रडायलाच लागला.

"काही होणार नाही, गणेशदादा. दुखायचं थांबलं की बरा होईल तो. एक मात्र कर. रानात जाऊन पोडलीच्या झाडाच्या साली आण. त्याचा चांगला अर्क काढ आणि गरम गरम शेक दे.''

"कीड लागलेलं वर्ष आहे हे, केशव. संक्रांत उंटावर बसून आली आहे ते माहीत आहे ना तुला? मी सांगतो बघ, या वर्षी मघाचा पाऊस मुळीच पडणार नाही. धान्य सुकून जाईल. म्हशीवर बसल्यास महापूर आणि उंटावर बसल्यास दुष्काळ. नाहीतर हत्तीसारखा माझा बैल, त्याची अशी दशा का व्हावी?''

गणेश रानात गेला आणि पोडलीच्या सालींचा भारा बांधून घेऊन आला. कोयतीने बारीक कापून दगडावर ठेवून त्याने ती ठेचली. मग हंडीत घालून चांगली शिजवून अर्क काढला. संध्याकाळभर तो शिबऱ्याला शेकत राहिला.

रात्री खांद्यावर कांबळ टाकली आणि तो म्हणाला, "बायूल, दाराला कडी लावून घे. मी बैलाजवळ जाऊन झोपतो.''

"नको आपा, तू इथं माजघरातच झोप. आता त्याच्याजवळ झोपून काय होणार आहे?''

"माझं वासरू तिथं वेदनेने कळवळतं आणि मी त्याला सोडून इथं झोपू? आता त्याच्या खांद्यावर जू ठेवणं शक्य नाही ग बायूल, किती दिवस घेणांर तो खांद्यावर जू? माझा हातच राक्षसी. पाठीवर छड्या पडल्या आणि हे अपसरण आलं. बायसारखाच हा शिबऱ्यादेखील नरम, मधाचं पोळं. बाय आता मला ठेवणार नाही. मी तिला सांगणार, बाय आता छडी कायमची सुटली. जू पण नाही आणि छडी पण!''

तो वेड्यासारखा बडबडत गव्हाणीकडे जात होता. सुमन कावरीबावरी होऊन त्याला बघत होती. कशाला जातो आहे हा तिथं झोपायला? तिने "आपा'' म्हणून पुन्हा हाक मारली. ती हाक काळोखात कुठं गडप झाली कळलंच नाही.

ती आत आली. चिमणीचा लालसर, काळसर प्रकाश आतल्या पसाऱ्यावर पसरला होता. कोपऱ्यात मुड्यांची चळत, लोंबकळत ठेवलेली टरबुजं, दुधी भोपळे, लाल भोपळे, दोऱ्या, तारा, मडकी सगळ्यांचं तिथं एक कोंडाळंच पडलं होतं. त्यात गोंधळून गेलेली सुमन घाबरल्यासारखी झाली. तशीच लगबगीने ती बाहेर आली.

"गोविंद, अरे गोविंद, तू तरी ये ना रे बाबा. आपाला जरा सोबत

कर. नाहीतर असाच येऊन माजघरात बस. का दुरावलास रे तू ? ''

खरंच गोविंदाला हाका मारल्या का मनातच आपण हे सगळं पाठ करीत होतो तिला काहीच कळेना. पण मग तिला आठवलं, आज संध्याकाळी आपा पोडलीच्या साली बडवीत होता तेव्हा गोविंद त्याच्याजवळ येऊन बसला होता. पण मलाच काहीतरी झालं आहे. त्याला बघून मी बावरते का ? कुणाला घाबरते ?

ती त्वरेने माजघराच्या पूर्वेला गेली. गोविंदच्या मामाचं घर, तिथली झाडं, सगळं अंधारात बुडालेलं होतं. माडीवर एक कंदील मंद जळत होता पण खिडकीत कुणीच दिसत नव्हतं. एखादी सावली तरी हलते का म्हणून सुमन बराच वेळ तिथं बघत उभी राहिली !

वस्तीवरच्या लोकांची पेरणी झाली होती. लोक आतुरतेने पावसाची वाट बघत होते. पण मृग नक्षत्र संपायला आलं तरी पावसाचा थेंब नव्हता. वरती निरभ्र आकाश. खाली तहानलेली, उन्हात करपून गेलेली धरणी. आकाशात कुठे एखादा काळा ढग दिसत नव्हता. रात्री तारकांचा झगझगाट दिवसा उन्हाचा रखरखाट. लोक आकाशाकडे तोंड करून म्हणत होते, मृगाच्या दिवसात असं भकास आकाश कुणी पाहिलं होतं ! माणसाची नियत बिघडली की देवाची कृपापण कमी होते.

उन्हाचा रखरखाट वाढला आणि गणेशच्या मनाचा ठाव चुकला. सकाळी, संध्याकाळी, दुपारच्या रणरणत्या उन्हात देखील तो शेताची कडन्कड हिंडून येत असे. तापलेल्या धुळीत अनवाणी चालून चालून त्याच्या पायाच्या काहिली झाल्या होत्या. उन्हात करपून चेहऱ्यावरची कातडी काळवंडली होती.

एके दिवशी अंबूमावशी विहिरीवर पाणी भरत होती. कळशी, विहिरीच्या तळाला लागायची आणि गढूळ पाण्याने अर्धवट भरून यायची. ती वैतागून तणतणली, '' धरतीचा पान्हाच सुकला आहे तिथे विहिरीला पाझर कुठून येणार ? आकाशावर कुठे एवढासुद्धा ओलसरपणा नाही ! '' सहज तिने मान वर करून पाहिलं, लांब शेतात उघड्या माथ्याने, उन्हाच्या रखरखात कुणीतरी शेताच्या कडा तुडवीत येत आहे. कोण हा आग तुडवीत येत असेल ?

जवळ आल्यावर पाहिलं तर गणेश. एवढ्या उन्हातनं चालत येऊनसुद्धा त्याच्या चेहऱ्यावर घामाचा थेंब नव्हता. उगाच उन्हात वाळल्या- सारखा दिसत होता. अंबूमावशी त्याला ओरडली, '' गणेश, कसली अवदसा आठवली आहे तुला ? का असा उन्हात हिंडतोस ? का असा स्वतःला जिवंत जाळून घेतोस ? ''

आपल्या तळहातावर भात असल्यासारखा हात तिच्यासमोर नाचवीत गणेश म्हणाला, "पाहिलंस ना अंबूवैनी, शेतात पेरलेल्या बियाणाच्या लाह्या फुलू लागल्या आहेत. आता मेलो तरी पाऊस पडणार नाही. शंभर वर्ष झाली ना ग, इथं खुंटी पुरून, मठी बांधून! शंभर वर्षांचा वायदा! आता गाशा गुंडाळून तयार राहावं. खुंटी उपटायची आणि...."

"कसले भिकेचे बोल रे बाबा हे? इथं पुरलेली खुंटी कायमची आहे! ती उपटली तर कुळाचं मूळ तुटेल!"

"कळकीला काटा आला आहे ते माहीत आहे का तुला? या वर्षी पाऊस नाही तोच काटा कांडून खावा लागेल सगळ्यांना. अनसूयाला शेवटची जास्वंदीची फुलं तूच माळली होतीस ना ग? कसला प्रलयकाळाचा पाऊस! चितेवर रचलेली लाकडं भिजून गेली होती तरीपण कापरासारखी जळालीच ना ती? छेः, आता तसा पाऊस कधीच पडणार नाही. विषारी उन्हात आपण भाजून जायचं!"

अंबूमावशीने कळशी कडेवर घेतली. "भोग आहेत हे. वयात आलेली मुलगी गळ्याला लागली आहे आणि हा टाळकं फिरवून संसारातून उठला आहे!"

एक दिवस अचानक झाडं उन्मळून टाकणारा सोसाट्याचा वारा सुटला. बघता बघता आकाश काळ्या ढगांनी आच्छादून गेलं. मधेच कुणीतरी आकाशाचा ढोल वाजवला आणि ते कडकडाटून वाजलं. आधी पावसाची रिमझिम सुरू झाली, मग काही क्षणातच त्याने धार धरली. पावसाला बघून केवळ लोकच सुखावले असं नाही तर माड नि झाडं- देखील पानांचे तुरे फुलवून मोरासारखे थुईथुई नाचताहेत असं वाटू लागलं.

माजघरात बसून आपा पागोळ्या गळतात ते बघत होता. तीन दिवस तहानलेल्या माणसाने पाण्याचा एकेक घोट प्यावा तसा तो संतोषून बघत होता. अचानक तो उठला, डोक्यावर कांबळ टाकली अन् उघड्या अंगानेच बाहेर निघाला.

"आपा, पावसातून कुठं चाललास?"

"जरा शेतातनं फिरून येतो ग. बांध-बिंध बघायला पाहिजेत ना? सगळंच वाहून गेलं तर थेट नदीतच जाईल. कसला मुसळधार पाऊस! जीव जरा भिजवून घेतो. बायूल, तुझी आई गेली ना, त्या दिवशी अस्साच पाऊस होता, कुणालाच अडवता आला नाही."

आपा बोलत बोलत पावसातून जात होता. त्याच्या कांबळीच्या दशांतून

पाणी गळत होतं. सुमन उभी राहून निमूटपणेच त्याला बघत होती.

पण अंधार पडून रात्र झाली तरी आपा आला नाही तेव्हा ती घाबरली. बाहेर थांबून थांबून पाऊस पडतच होता, पाण्याचा जणू पांढरा धूर होऊन काळोखात मिसळला होता. बाहेर डोळ्यांसमोर एक काळा-पांढरा पडदा आणि त्याच्या पलीकडे मात्र आरपार नसलेला काळोख.

सुमन उभी राहून आपाला हाका मारीत होती, वस्तीतले लोक आतूनच तिच्या हाका ऐकत होते. कुठं गेलाय हा असल्या मुसळधार पावसात ? आधीच डोकं फिरलं आहे !

आता सुमनच्या हाकांना रडवेली धार आली. व्याकुळ होऊन ती बोलावत होती, "कुठं गेलास रे तू ? आपा, आपा रे !"

इतका वेळ खिडकीतून पाहत असलेली आवडूआजी दारात आली. त्या बाजूने सुमित्रा आणि तिचा नवरा नरसिंह आले. गोकुळमावशी, खुशाली वगैरेही आले. समोरून भास्करअण्णा आणि त्याचा भाचा गोविंदही आले. कुणी माजघरात तर कुणी डोक्यावर काहीतरी घेऊन अंगणात उभे राहिले.

खुशालीने अंगणाच्या कडेला उभं राहून आपल्या पुरुषी आवाजात काही वेळ मोठमोठ्याने हाका मारल्या पण उत्तर नव्हतं. भास्करअण्णा हातात कंदील आणि कापडाची छत्री घेऊन अंगणात उभा होता. तो म्हणाला, "कुठं गेला असेल हा हाकेच्या पलीकडे ? खुशाली, नरसिंह, तुम्ही हा कंदील घ्या आणि जरा आजूबाजूला शोधून या. देवळाजवळ, झालंच तर देऊळवाड्यापर्यंत जाऊन या."

नरसिंहाने कंदील हातात घेतला. तो व आणखी दोघेजण जायला निघाले. तेवढ्यात गोविंदने लगेच मामाच्या हातातली छत्री घेतली. "तू आणखी कशाला जातोस, गोविंद ?"

"जातो मामा, मी पण जातो शोधायला."

पुरुष मंडळी निघाली आणि सदाशिवची बायको विश्रांती समोर येऊन सांगू लागली, "मघाशी काळोख पडायला आला होता तेव्हा मी खत घालून शेतातून परत घरी येत होते. तेव्हा गणेशभावोजी मला शेतात दिसला होता. नुसताच उभा होता."

खुशाली तिच्यावर ओरडला, "इतका वेळ कुठं होतीस ? आता सांगतेस ती ?"

आवडूआजी म्हणाली, "अरे, ती बाळाला पाजता पाजता झोपली असणार. लहान बाळ आहे ना रे तिचं ?"

पुरुष हाका मारीत फिरत होते. कुणाच्या डोक्यावर कांबळ तर कुणाच्या हातात छत्री होती. पावसात सगळीकडेच पाणी आणि राडा झाला होता. मधेच पाय घसरून कुणाचा तरी तोल जायचा आणि तो पाण्यात पडायचा. गोविंद त्यांच्यामागून मुकाट्याने चालत होता.

एकीकडे एका बांधाचा उंचसा कोपरा होता तिथं लिंगाड्याच्या काही फांद्या होत्या. त्या फांद्याना टेकून कोपऱ्यात गणेश बसला होता. त्याला पाहिल्यावर सगळे जण त्याच्याभोवती एकत्र झाले. गोविंदने 'मामा' म्हणून त्याला मिठी मारली. कंदिलाचा उजेड त्याच्या चेहऱ्यावर धरून पाहिलं. त्याचे डोळे उघडेच होते आणि तो टकमका बघत होता. डोक्यावरची कांबळ खाली पडली होती आणि तो पूर्ण भिजून गेला होता. खाली पसरलेले पाय शेतातल्या पाण्यात बुडाले होते.

"गणेशबाब, इथं कशासाठी असा पडून राहिला आहेस?"

सगळ्यांनी धरून त्याला उभं केलं. "ऊं, ऊं" करीत जाग आल्यासारखा तो उभा राहिला.

"गणेशमामा, आपण घरी जाऊ या."

त्याला मागेपुढे धरूनच ते घरी घेऊन आले. त्यांना तसे येताना बघून सुमनची छाती दडपलीच. ती माजघरात धप्पकन बसकण मारून दाराजवळ बसली. धड रडू पण येत नव्हतं आणि काही सुचतदेखील नव्हतं.

वस्तीतली माणसं मात्र आत-बाहेर वावरत होती. पुरुषांनी त्याला कोरड्या फडक्याने नीट पुसून काढलं, दुसरा पंचा नेसवला. अंबूमावशीने भांड्यात निखारे आणून समोर ठेवले. सुमित्राने आपल्या घरातून एक अंडं आणलं आणि ते जमिनीवर आपटून कचकन फोडलं आणि ते देशी कच्च अंडं तसंच त्याच्या घशात ओतलं व म्हणाली, "अंगात जरा ऊब येईल." गणेशदेखील देवासारखा मुकाट्याने सगळं करून घेत होता. गोकुळमावशी मधेच सुमनवर खेकसली, "अग, अशी फतकल मारून काय बसली आहेस? वाढून आण त्याला."

दुपारी तिने कोलंबी घालून आठळ्याचं कालवण केलं होतं. ताट वाढून घेतलं आणि ती बाहेर आली. "आपा, जेव." म्हणाली तर तो नुसताच तोंडात हात घालून भात मुरडीत राहिला. सुमनने एक घास त्याला भरवला. त्याबरोबर त्याला काय वाटलं कोण जाणे, एक मोठा घास घेऊन त्याने तोंडात टाकला. मग घासावर घास तोंडात टाकत राहिला.

सकाळी उठून पाहिल्यास आकाश स्वच्छ झालं होतं आणि आपा अंगणात उभा होता. त्याने आतलं खोरं उचलून खांद्यावर घेतलं तेव्हा सुमनने विचारलं,

" कुठं चाललास आपा ? होईल का रे, तुझ्याच्याने ? "

" शेतात चाललोय ग. बांध, कडा वगैरे बघायला नको का ? अनसूयाने वेणणी केलेलं शेत ते. तसं आता परत कधी चवरणार आहे का ? स्वतःशीच बडबडत तो चालू लागला, " आपा, मी चहा, भाकरी घेऊन येते हं शेतात. "

आपाला बरं नाही म्हणून कळल्यावर एक दिवस मंजूळ धावत आली. सासरा म्हणत होता, " घरात एवढं दीड खंडीचं बियाणं आहे पेरायचं आणि तू कुठं निघालीस ? या दिवसांत माहेरी जायचं काय अडलंय ? " पण तिने काहीएक न ऐकता मुलाला कडेवर घेतलं आणि ती निघाली.

आपाच्या काळजीने विचारांच्या तंद्रीत नदी पार करून ती कधी माहेरच्या अंगणात पोचली तिला कळलं देखील नाही. गायीने पाडसाला अधीर मनाने डोळ्यांत प्राण गोळा करून बघावं तसा तो तिला बघतच राहिला. आणि चारच शब्द तो बोलला, " बायूल, बाय आली आहे. चार नारळ सोलून तिच्या ओटीत घाल. " आणि मग तो गप्पच झाला.

मंजुळा आपाच्या समोर बसून मुकाट्याने खूप वेळ रडली. थोडीशी सावरल्यावर मायेने आपाच्या अंगावर हात फिरवीत ती म्हणाली, " आपा, नको रे असं करू. जरा नीट राहा ना. माझ जाऊ दे, पण बायूलला कोण आहे रे ? उद्या तिचं सगळं कोण करणार ? तू काहीच मनात धरून बसू नकोस. देवाच्या मनात असेल तसं होईल. पण तू आधी नीट राहा. "

मंजुळा आली आहे म्हणून समजल्यावर वस्तीतल्या काही बायका माजघरात येऊन बसल्या काळजीयुक्त स्वरात त्या आपाच्या विचित्र बोलण्याचं, वागण्याचं विश्लेषण करून सांगत होत्या. मंजुळा जास्तच धास्तावली. ती डोक्यावर हात घेऊन बसली.

सुमन मात्र बायच्या मुलाला, रमेशबाळाला घेऊन खेळवत होती. दोन वर्षांचा तो पोरगादेखील मावशीकडे छान हसत खेळत होता. सुमनने त्याला कडेवर घेऊन सगळ्या वस्तीतून फिरवून आणलं. आधणातला थोडा भात काढून त्यात गूळ, खोबरं घालून तो पुन्हा शिजवला व त्याची थोडी खीर केली. मग तिने ती रमेशला भरवली. बाय परत जाताना बाळाला तिच्याकडे द्यायचं सुमनच्या अगदी जिवावर आलं होतं. तो गुलामदेखील मावशीला अगदी घट्ट चिकटून होता.

मंजूळ सकाळी आली आणि संध्याकाळी गेली. जाताना तिने " आपा, मी निघते हं, " म्हटलं तर तो उगाच, " बाय जाते, बाय जाते " करीत घोकत

राहिला.

मंजुळा निघताना फाटकापाशी उभी राहून सुमनला सांगत होती, " पेरणी झाली की दहा-पंधरा दिवसांनी परत येते मी. मग आपण आपाकरता भगत, जोशी वगैरे करू. नाहीतर कारवारला जाऊन डॉक्टरला दाखवू. मघाशी येताना वाटेत सदाशिवअण्णा भेटला होता. तो म्हणत होता, गेल्या वर्षी म्हणे चिंचेकडच्या वस्तीतला एक माणूस बकुळीच्या झाडावरून पडून मेला. त्याचं क्रिया-कर्म वगैरे नीट झालं नाही त्यामुळं तो भूत होऊन फिरतोय. कुठल्या तरी भलत्या क्षणी आपाला गाठलं असेल त्याने. "

" मला काहीच कळत नाही ग बाय, भीतीच वाटते. "

" मुळीसुद्धा घाबरायचं नाही बरं. आपलाच बाप आहे तो, आपणच संभाळलं पाहिजे. तू एक मात्र कर, कसंही करून दिवसातून चार घास त्याला जेवायला लावच, उपाशी राहू देऊ नकोस. काही कमी-जास्त झाल्यास गणपतआजोबाला, भास्करअण्णाला वगैरे सांग. वडील-चुलते धावत आल्याशिवाय राहणार नाहीत. "

चालत चालत त्या जरा पुढं गेल्या. अतिशय काळजीने जीव खचून गेल्यागत मंजुळा सुमनला म्हणाली, " तीन महिने झाले. तुझ्या भावोजीचं पत्रच नाही ग. तुला काही आलं होतं ? "

" नाही ग, काय झालं असेल न लिहायला ? "

" जाऊ दे. येईल. तू जा आता घरी. "

इतक्यात मामाच्या दारातून धावत येत असलेला गोविंद दिसला.

" ताई, तू आलीस आणि मला न सांगता निघालीस काय ग ? "

" घाईत आहे रे, गोविंद. पाटी तशीच शेतात टाकून आले आहे. "

" भावोजीचं पत्र वगैरे आलं आहे ना ग, ताई ? "

" होय. "

" तू बरी आहेस ना ? "

" होय रे. "

" येतोस काय रे ? " म्हणून रमेशबाळाला त्याने हात पुढे केले तर तो आईच्या कुशीत लपू लागला.

" असू दे. मी येते हं, गोविंद. आपाला सांभाळा तुम्ही. "

आपा आता अंगणात येऊन उभा राहिला होता, पूर्वीसारखाच ताठ. तो मोठ्याने ओरडून म्हणाला, " तुझ्या सासऱ्याला सांग, येत्या अमावास्येला उलट्या पंखांचा कोंबडा हवा आहे, वेताळाला जागवायला. मीच शिजवणार

आहे.''

मंजुळाने न ऐकल्यासारखं केलं तरी पण तिने मोठ्या मायेने, आस्थेने एकवार आपाला पाहिलं. तिला वाटलं, आता आपल्याला रडूच कोसळणार, तोंड फिरवून ती चालायला लागली.

गोविंद आणि सुमन दोघंही येऊन माजघरात बसली. मुकाट्याने ती तशीच कितीतरी वेळ बसली होती पण एकही शब्द न बोलता.

चार महिने झाले तरी पत्र नाही तेव्हा मात्र मंजुळा हैराण झाली. दिवसभर ती वाटेकडे डोळे लावून बसायची. नदीतून होडी येताना दिसली, तार ओलांडून कुणी या वाटेनं पावलं टाकताना दिसला की तिची छाती धडधडायची. जीव डोळ्यांत आणून ती पाहायची. गावात पोस्टमन आल्याचं समजलं की धावत फाटकाकडे जायची. पण दिवसामागून दिवस जातच राहिले. तिचा जीव टांगणीला लागलेला !

सासऱ्याचाही आता जीव हरपला होता. त्याने चार पत्रं लिहिली तरी उत्तर नव्हतं. शेवटच्या महिन्यात तर तो जमिनीला खिळल्यासारखाच झाला. अंगावरची कातडी लोंबू लागली, आवाज घोगरा होऊन थरथरू लागला. आता तो बैलांवर ओरडत नव्हता, सुनेवर राग काढीत नव्हता. शेतात वगैरे जाऊन आल्यावर कण्हत पडायचा. मधेच तो मोठ्याने म्हणायचा, ''नारायणा, माझा मुलगा कुठं आहे रे !''

एक दिवस तो एक कोरं आंतर्देशीय घेऊन मंजुळाकडे आला. ''हे पत्र तू लिही, कुणाकडून तरी लिहून घे. जरा प्रेमाच्या लाडीगोडीने लिही.''

''तूच लिही, बाप्पा.''

''बापावर कसला तरी राग धरून बसला असेल तो. मला नाही उत्तर पाठवायचा.''

थरथरत्या हाताने ते पत्र तिने बोटांच्या चिमटीत धरलं. बाहेर जाताना सासरा बडबडत होता, ''नवऱ्याला प्रेमाने बांधून ठेवायची हुशारी नाही तुझ्याकडे. आताच्या मुली किती हुशार असतात. नवऱ्याला अगदी मुठीत ठेवतात.''

सासऱ्याचे शब्द ऐकून मंजुळाला आश्चर्य वाटलं पण राग मात्र आला नाही. ती मनात म्हणाली, ''सगळी तुझीच सत्ता आणि तुझाच दरारा, माझं कधी काही चाललं होतं का ? त्याने बायकोला नेतो म्हटलं तर तूच आडकाठी आणायचास, वरून म्हणायचास बायकोलाच कवटाळून बसतोस म्हणून.''

मंजुळाने आताशा नवीनच सुरू केलं होतं. कारवारच्या कुठल्याही गावात, आर्मीतला कुणी रजेवर आला आहे म्हणून समजलं की धावत त्या गावी जायची, कधी मुलाला कडेवर घेऊन तर कधी घरी सोडून. बाड, सदाशिवगड, माजाळी, असनोटी, हणकोण ही गावं तर तिने महिन्याभरातचं तुडवली. असनोटीला बाबूराव नावाच्या माणसाकडे गेली होती. येताना गाडी नव्हती तर पंधरा मैल ती पायी चालत आली. मधे दोन नद्या, हणकोण आणि हळगे.

हणकोणच्या होडीवर चढताना ती त्या राड्यात घसरून पडणारच होती. दोन-तीन पावलं घसरली आणि होडीवर पालथीच पडली. लुगडं सगळं भिजून गेलं. नावाडी निरखून बघत होता, कुठली ही अनोळखी बाई? या वाटेने कधी पाहिली नव्हती.

"कुठली ग तू, बाळे? पहिल्यांदा या वाटेने येताना पाहतोय तुला."

मंजुळाला रडूच कोसळलं. "हळगे भागातली आहे मी, मामा. नवरा मिलिटरीत आहे. चार-पाच महिने झाले, पत्रच नाही. समाचाराला म्हणून गेले होते, असनोटीला."

"हल्ली तर लढाईची पण गडबड नाही. मग का नाही लिहीत तो? मिळाला का काही समाचार?"

"नाही, तो म्हणे दुसऱ्याच भागात आहे."

असंच व्हायचं. श्रीधर होता आसामात, सप्लाय खात्यात आणि तो रजेवर येणारा दुसरीकडूनच कुठूनतरी आलेला असायचा. काश्मीर, पंजाब नाहीतर दिल्लीहून. हरवलेल्याचं मन बाराकडे म्हणतात तसं मंजुळा आपली उगाच कुणी आर्मीतून आला म्हटलं की धावत जायची.

होडीत आणखीन एक जण वयस्कर असा माणूस बसला होता. त्याने खाकी हाफपँट घातली होती आणि वर मोठ्या बटणांचा पांढरा कोट. तो चांगला धिप्पाड आणि उंच होता. त्याच्या मिश्या आणि भुवया पूर्ण पांढऱ्या पण डोक्यावरचे केस मात्र पूर्ण काळे होते. त्याने विचारलं, "मुली, तुझा नवरा मिलिटरीत कुठल्या खात्यात आहे ते माहीत आहे का तुला?"

"सप्लायमधे. आता आसामला आहे."

"मग उगाच अशी फिरू नकोस. कारवारचे हे सगळे बैलोबा इन्फन्ट्रीत नाहीतर आर्टिलरीत असतात. मीसुद्धा इन्फन्ट्रीतच होतो. तू एक काम कर. आधी कारवारचा कुणी सप्लायमधे आहे का बघ. तो रजेवर आला असेल तर, किंवा त्याला पत्र पाठवून माहिती काढ. मी पण काढतो. तुझ्या नवऱ्याचं नाव सांग."

मंजुळा नवऱ्याची, सासऱ्याची सगळी माहिती सांगेपर्यंत तार किनाऱ्याला लागली. मंजुळा उतरत असताना नावाड्याने तळहातावर थोडं पाणी घेतलं आणि तिच्या डोक्यावर शिंपडलं, " हे काय, मामा ? "

" तीर्थ आहे ते. तुला माहीत आहे, हणकोणची सातेरी, कद्रेची महामाया आणि तिनईची अंबेका, ह्या तिन्ही देवतांच्या पायांखालून आलेलं हे पाणी नदीतून वाहतंय. सदैव सवाष्ण राहशील तू. "

मंजुळाच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. ते लपवण्याकरता ती त्वरेने पावलं टाकू लागली. जरा पुढं गेल्यावर तिने मागे वळून पाहिलं, उन्हात करपून काळवंडलेला नावाडी हातात वल्हं घेऊन होडीच्या मधोमध उघड्याच अंगाने उभा होता. तो वयस्कर गृहस्थ मात्र ताठ शरीराने लांब लांब पावलं टाकीत आपल्या वाटेने जात होता. मागे वळून पाहत तो पुन्हा एकदा म्हणाला, " मी काढतो माहिती, तू काळजी करू नकोस. "

असेच मध्यंतरी पंधरा-वीस दिवस गेले. सासऱ्याचा जणू मुडदाच झाला होता. सकाळी उठायचा आणि डोक्यावर हात घेऊन ओटीवर बसायचा. कमरेची एक चावी सोडल्यास त्याला कसलंच भान नव्हतं.

तशी मंजूळ मनाने कणखर होती. सगळा परिसर रखरखून सुकू लागला की झाडांची मुळं खोल जमिनीतील आर्द्रता शोषून घेतात तशी ती सगळी शक्ती गोळा करीत होती. हळूहळू तिला कळून चुकलं, आता बरं- वाईट काहीही असो. तिने एकटीनेच तोंड उघडायला हवं. होडीत भेटलेल्या वयस्कर गृहस्थाने तिला आणखीन एक गोष्ट सांगितली होती, " काही बरं-वाईट असलं तर त्याचे सीनिअर्स त्याच्या घरी कळवल्याशिवाय राहणार नाहीत. " त्यामुळेही तिला थोडासा धीर वाटत होता.

शिद्दरला जाऊन आल्यास अडीच महिने होत आले पण आपाची काहीच बातमी समजली नव्हती. ते पण एक दुःख छळत होतं. इथं हे संकट तर तिकडे आपाची तशी अवस्था. विचार करून करून तिचं डोकं बधिर होत होतं. मग ती एकटीच बसून रडून घ्यायची.

कधी कधी मंजुळाला वाटायचं, हा हट्टानेच आम्हाला त्रास देण्याकरता पत्र लिहीत नसता राहिला आहे आणि मग तिला रागच यायचा. मग ती विचार करायची, त्याचं शेवटचं पत्र माघ पौर्णिमेला आलं होतं, त्यात कुठलाही राग, वैताग नव्हता. बायकोला म्हणून देखील दोन शब्द लिहिले होते. शिवाय आपा, बायूल कसे आहेत म्हणूनही चौकशी केली होती.

" बाप्पा, शेताची वेणणी, खुडणी राहिली आहे ना या वर्षी ? कामवाल्या

मिळाल्या तर घेऊ या ना. मी राहते त्यांच्याबरोबर.''

''मरू दे ग ते शेत. मला सगळंच नकोसं झालंय.'' मधेच तो खेकसला, ''इथं सहा महिने नवऱ्याचा समाचार नाही आणि तू शेताचा विचार करतेस? उद्या गिळायला हवं ना?''

एक दिवस घरातलं काम आटोपून मंजूळ अंगणात उभी होती. बघते तर शाळेच्या माळावरून शेताचे बांध तुडवीत कुणीतरी दोघेजण तिच्याच घराच्या दिशेने येताहेत. पाऊस पडून शेतं वर आली की तिथून येणारी माणसं विरळाच. पावसातले तीन-चार महिने हा परिसर बाजूलाच पडल्यासारखा व्हायचा. मग हे कोण बरं येत असतील? मंजुळावर सगळाच आकांत. ''बाप्पा, बघ कोण येताहेत या वाटेनं.'' ती धप्पकन ओटीवर बसली.

सासरा अंगणात आला. ते लांब असतानाच त्याने विचारलं, ''कोण हो?''

ते आणखीन थोडेसे जवळ आल्यावर मंजूळने पाहिलं, त्यातला एक जण त्या दिवशी होडीवर भेटलेला, पांढऱ्या मिश्यांचा वयस्कर गृहस्थ. लांबूनच हात हलवीत तो म्हणाला, ''श्रीधर ठीक आहे, सुखरूप आहे तो.''

''मग त्याची पत्रं का ना येत?''

''सांगतो. चला बसू या.'' म्हणत सासऱ्याला घेऊन ते पडवीत येऊन बसले. मंजुळा मात्र तिथून हलली नाही. कोण, कशाला आले आहेत, काय सांगताहेत, काय चाललं आहे हे समजून घ्यायलाच तिला विलंब लागला.

ते दोघे आत जाऊन बाकावर बसले, सासरा आपल्या चामड्याच्या खुर्चीवर. मंजुळा कशीबशी उठून खिडकीपाशी आली आणि धरून उभी राहिली.

''मुली, आत ये ना.''

''मामा, कोणती बातमी आणली आहेस?'' म्हणत मंजुळा आत आली आणि दारातच फतकल मारून बसली.

''ऐक, म्हाळूमामा. हे आमच्या कारवारच्या सोल्जर बोर्डाचे माहीतगार. सरकारी माणूस. आम्ही श्रीधरची माहिती काढली. त्याच्या मिलिटरीतल्या सीनिअरना पत्र लिहून विचारलं आणि त्यांचं लगेच उत्तरही आलं. बरं का मुली, त्या दिवशी तुला भेटल्यापासून मी त्याच उपद्व्यापात होतो. आमच्या कारवारचा मुलगा मिलिटरीत आहे आणि त्याची माहिती मिळत नाही म्हणजे काय? चांगलंच खडसावून विचारलं त्यांना.''

मंजूळाचे आणि सासऱ्याचे प्राण डोळ्यांत गोळा झाले. काय सांगणार आहेत हे लोक?

“ त्याच्याकडून एक चूक घडली आहे. कसली चूक वगैरे काही नाही, मिलिटरीच ती. शिस्तीबाहेर जरासुद्धा काही झालं तरी पुरे, शिक्षा ही होणारच. त्याचं म्हणे कोर्टमार्शल झालं. ”

“ काय, काय झालं म्हणता ? ”

सोल्जर बोर्डाचा तो माणूस तरुणच होता. तो म्हणाला, “ स्पष्टच सांगतो तुम्हाला, उगाच लपवा-छपवी नको. माझी जबाबदारीच आहे ती. श्रीधर आणि त्याचे काही मित्र कँप सोडून रात्री गावात घुसले. तिथं काहीतरी भलतं कृत्य त्यांच्या हातून घडलं. मग गावातल्या लोकांनी त्यांना पकडून कँपमधे ऑफिसरकडे आणलं. नंतर चौकशी वगैरे होऊन त्यांना तीन महिन्यांच्या कैदेची शिक्षा झाली. नोकरीदेखील सुटली. ”

सासऱ्याने एक आवंढा गिळला, कोरड्या घशाने विचारलं, “ आता कुठं आहे तो ? ”

“ आसाममधे, एका सिव्हिल तुरुंगात. आतापर्यंत सुटलाही असेल. ”

सासरा लहान मुलासारखा रडू लागला. मंजुळा मात्र एकसुद्धा अश्रू न ढाळता तशीच ढिम्म बसून राहिली, अश्रू गोठून गेल्यासारखी.

ते दोघेही उठले. शब्दच संपल्यासारखा तो वयस्कर गृहस्थही मुकाट झाला होता. तरी देखील जाता जाता अंगणातूनच तो म्हणाला, “ काही हरकत नाही. इथं बापाचंच आहे ते नीट पाहिलं तरी पोट भरण्यासारखं आहे. उपाशी नाही पडणार तो. ”

मंजूळ उठून आत गेली. तांब्या भरून आणून सासऱ्याला दिला आणि म्हटलं, “ रडू नकोस, बाप्पा. जाऊन तोंड धुऊन ये. ” ती परत आत गेली. पेज उतू जाऊन जाऊन सुकली होती. तिने पुन्हा थोडं पाणी घातलं आणि विस्तव नीट केला. थोडी पेज ताटात वाढून घेतली आणि मुलाला भरवू लागली.

दुसऱ्या दिवशी श्रीधरची बहीण सुमती आली. कासावीस झाल्या- सारखी बाहेर ओटीवरच बसली, “ मला काळजीच वाटते ग बाई, काय झालं ते सांग ना. लोक काहीच्या बाहीच बोलतात. माझ्या भावाची काळजी वाटते ग मला. देवा, महादेवा, त्याला नीट आणून पोचव रे बाबा. ”

मंजुळा दारातच होती. तिने म्हटलं, “ काही झालं नाही त्याला. ठीक आहे तो. नोकरी सोडली आहे, सोडू दे. इथं आला तर उपाशी नाही पडायचा. वैनी, तू बाहेरच का बसली आहेस ? ” तिला हाताला धरून मंजुळाने स्वयंपाकघरात नेली.

सुमतीने एकवार घरभर नजर फिरवली. एकाएकी तिला हुंदकाच फुटला.

लगबगीने तिने तोंडात पदराचा बोळा कोंबला. बाप्पा मधल्या खोलीत खाटेवर झोपला होता, जागाच असावा. त्याला एकदा स्थिर नजरेने तिने पाहिलं. खूप दिवस अंथरुणाला खिळलेल्या आजारी माणसासारखा दिसत होता तो. पण त्याला काही विचारायचा, बोलायचा धीर मात्र झाला नाही तिला. मधेच जाग आल्यासारखं बाप्पाने विचारलं, "कोण आलं आहे ग, कावेरी?"

सुमती लगबगीने धावतच बाहेर आली. 'गप्प राहा' म्हणून खुणेनेच मंजुळाला सांगितलं. आणि अंगणात येऊन उभी राहून मंजुळाला जवळ बोलावलं आणि म्हटलं, "आईची चांगली दोन-तीन जरीची लगुडी होती पेटीत. दिली का तुला बाप्पाने?"

"नाही गं, पेटीतच दाबून ठेवली आहे त्याने."

"त्यातलं मला एक काढून देशील? या घरातलं काहीसुद्धा नेलं नाही ग मी. नेसत्या वस्त्रानिशी मी त्याच्याबरोबर गेले."

"पण किल्ली त्याच्याकडे आहे ना ग?"

"आईच्या अंगावरचं वस्त्र माझ्या अंगाला लावायची खूप इच्छा होती ग माझी. असू दे येते मी."

"जेवून तरी जायचं होतंस."

"नको, जाते मी. श्रीधरविषयी पुन्हा काही समजलं तर सांगून पाठव. काळजीच वाटते ग."

ती झरझर चालू लागली. वाळून इतक्या बारीक किडकिडीत झालेल्या बाईची चालायची ती तऱ्हा बघून मंजुळाला नवल वाटलं. आत्ताच शेतात उतरली होती ती, बघता बघता शेत पार करून शाळेच्या माळावर पोचली देखील. बिच्चारी! आज नोकरदार शिपायाची बायको म्हणून खाऊन पिऊन सुखात राहिली असती. का म्हणून उघड्या डोळ्यांनी हे दुःख विकत घेतलं तिने? एकदा विचारायलाच हवं, "वैनी, पहिल्या नवऱ्याला सोडून आल्याबद्दल वाईट वाटतं का तुला?"

छेः! वेडीच आहे मी. असले उत्तर नसलेले प्रश्न कधी कुणाला विचारायचे असतात का? ती सुखी नसती तर आपल्या नवऱ्यासाठी, मुलांसाठी अशी धडपडली असती? कुणीतरी सांगत होतं, नवरा म्हणे सकाळी उठून चिऱ्यांच्या खाणीवर कामाला जातो चिरे काढायला आणि ही त्याच्या मागोमाग चुंबळ-पाटी घेऊन त्याला खाणीतली माती काढून द्यायला जाते. कदाचित खरोखर सुखी असेल ती!

तिच्या सुखाविषयी विचार करता करता मंजुळाला स्वतःच्या दुःखाचे

ओरखडे डोळ्यांसमोर दिसू लागले. बळेच गोळा केलेला धीर गळून गेल्यासारखा झाला.

ती आत आली आणि मुलाला जवळ घेऊन तशीच भिंतीला टेकून गप्प बसून राहिली. सासऱ्याचाही आवाज नव्हता. सगळ्या घराचा जणू गळा दाबला होता. एवढी माहेरवाशीण लेक - कधी नव्हे ती येऊन गेली पण घराला कोणतीच ऊब नव्हती.

संध्याकाळ झाली तेव्हा मुका देवाप्पा आला. कांबळ पांघरून तो तसाच पडवीत बाकावर बसला. हल्ली तो संध्याकाळी यायचा आणि रात्री तिथेच पडवीत झोपायचा.

घरात कसलाच आवाज नव्हता ते बघून तो उठला आणि कानोसा घेत आत गेला. स्वयंपाकघराच्या उंबरठ्याशी एक मिणमिणता चिमणीचा दिवा पेटत होता. बाजूलाच भिंतीला टेकून, मुलाला मांडीवर घेऊन मंजूळ झोपल्यासारखी बसली होती. चिमणीच्या काळ्या उजेडात देवाप्पाने पाहिलं तेव्हा त्याला वाटलं, हिचा प्राण गेला आहे आणि हिला कुणीतरी अनादी काळापासून अशीच टेकवून बसवली आहे!

चुलीत अगदी विस्तव नव्हता आणि राखेने चूल भरली होती. तिच्यावर भांडंही नव्हतं. त्याने उंबरठ्यावरची चिमणी उचलली आणि जाऊन सगळी भांडी पाहिली. दिवसभर मंजूळने स्वयंपाकच केला नव्हता, सकाळी केलेली पेज मात्र एका मडकीत शिळी होऊन पडली होती. त्याला तिचा रागच आला. पण मंजूळ हलली नाही.

मग त्याने राख बाजूला सारून चुलीत लाकडं सारली. बाहेर जाऊन चार चुडतं आणली, ती चिमणीवर धरून पेटवली आणि चुलीत विस्तव घातला. आता मात्र मंजूळला राहवेना, ती उठली आणि चुलीजवळ जाऊन " ऊठ मामा " म्हणत तिने मडकीत आधण ठेवलं.

देवाप्पा बाहेर आला. येताना मधल्या खोलीत झोपलेल्या म्हाळूची चाहूल घेतली. 'घर्रघर्रं' एका तालात तो घोरत होता. मरणाची वाट बघत पडून राहिल्यासारखा तो थंड पडला होता.

मध्यंतरी आणखीन एक महिना लोटला. टांगणीला लागल्यासारखे सात महिने! वाट पाहून मंजुळाचे डोळे थकले, शरीर वाळलं. बी पेरून आल्यापासून सासऱ्याने शेतात पाऊल ठेवलं नव्हतं. एवढ्या धडधाकट माणसाची ही अशी हालत मंजुळाला बघवत नव्हती. मंजूळ रोडावली होती, थकली होती, पण

मनाने कणखर होती. सुरुवातीला काही दिवस ती सैरभैर झाली होती पण नंतर तिने स्वतःला सावरलं. मुलाचं, सासऱ्याचं खाणं, जेवणं ती नीट सांभाळीत होती, शेतातही जात होती.

त्या दिवशी ती अशीच मागीलदारी उभी होती. एक होडी नदीची संध्याकाळची काळी धार कापीत येत होती. मागच्या डोंगरातलं सावट, नदीचा सावळा प्रवाह, त्यातून पांढरं शीड फुलवून येणारी होडी. मंजुळाच्या मनात उगाच हुरहूर. ही होडी एका दिगंतराहून दुसऱ्या दिगंतराला जाणार! आपल्या बंदराला नाही लागणार!

बघता बघता त्या होडीनं शीड गुंडाळलं, ती उघडी-बोडकी झाली. तिची उघडी डोलकाठी मागच्या डोंगरावर नाम ओढल्यासारखी उभी झाली. होडी बंदराला लागली पण कोण उतरलं ते दिसत नव्हतं. मधे शेतं, नदी, कांदळांची झाडं. फक्त ती उभी डोलकाठी तेवढीच दिसत होती.

पण मंजुळा दारातून हलली नाही. तिला उगाचच वाटलं, आपला कुणीतरी लांबचा पाहुणा या होडीतून येतो आहे.

थोड्या वेळाने निरखून पाहिलं तर वाढलेल्या शेतांच्या बांधावरून खरंच कुणीतरी येत आहे; त्याच्या खांद्यावर काहीतरी आहे. पण तो कोण, त्याच्या खांद्यावर ट्रंक आहे का पाटी, नीट काहीच कळत नव्हतं.

तो जवळ आला तशी मंजूळ त्याच्याकडे धावली. त्याच्या खांद्यावरची ट्रंक काढून तिने डोक्यावर घेतली. एका दमात तिने कितीतरी प्रश्न विचारले, "इतके दिवस पत्र का लिहिलं नाहीस? नोकरी गेली म्हणून काय झालं? बायको, मुलगा नाहीत का तुला? बाप धरणीला लागला आहे, मी काट्यालाच जीव घेऊन आहे. आम्ही समजायचं तरी काय?"

पण तो एक शब्द बोलला नाही. मुकाट्यानेच तिच्या मागून घरी आला आणि पडवीत बसला, गप्प. मंजुळाने ट्रंक आणून आत ठेवीत म्हटलं, "बाप्पा, तुझा लेक आला आहे!"

बाप्पा थाडकन उठून उभा राहिला आणि तोल सावरीत, धडपडत तो बाहेर आला. बाकावर बसलेल्या मुलावर त्याची नजर गेली आणि गार पाणी ओतल्यासारखं वाटलं. नैराश्याचा जणू एक डोंगरच अंगावर कोसळला. मुलाविषयीचा राग आणि प्रेमही– आळीपाळीने त्याच्या चेहऱ्यावर उमटत होती. तो वाळला होता, पोखरला होता आणि पांढरा फटफटीत पडला होता. लाचार, भिकाऱ्यासारखा आपल्याच घरात परकी होऊन त्या बाकावर गप्प

बसला होता.

हळूहळू एकेक पाऊल उचलीत बाप्पा जाऊन खुर्चीवर बसला. स्वतःशीच बोलल्यासारखं बडबडत राहिला. "आमचं दैवच खोटं, आता गावात तोंड दाखवायला जागा उरली नाही. आपलीच बुद्धी पाड, तिथं कोण काय करणार?"

पण श्रीधर गप्प राहिला. मधे बराच वेळ गेला. एकदम बाप चिडला, "अरे काय झालं ते निदान सांग तरी ना रे!"

मंजूळ आतून मुलाला घेऊन आली. त्याला नवऱ्याच्या कुशीत ठेवीत ती म्हणाली, "इतके दिवस मुलासाठी आतुर झाला होतास, आता मुलगा दृष्टीस पडताच एकदम चवताळलास का?"

ती तशीच न्हाणीघरात गेली; गोवऱ्या, सोडणं घालून तिने हंड्याला विस्तव केला. श्रीधर मुलाला अलगद मांडीवर घेऊन बसला होता. त्याच्याशी पण तो एकही शब्द बोलत नव्हता. ते मूल मग हळूच त्याच्या कुशीतून सरकून आईच्या मागे गेलं.

मंजुळा बारकाईने नवऱ्याला न्याहाळीत होती, त्याची दशा बघून काही अंदाज बांधीत होती. खरं तर तो आल्यापासून ती हवेतच तरंगत होती. तो नीट घरी पोचला आहे, एवढंच तिला पुरे होतं. तो कसा आला आहे, का वाळला आहे, त्याचं तिला काहीच वाटत नव्हतं. आधी तरी कुठे मारे बलभीम होता? पहिल्यापासून लुकडाच तो पण कणखर. अंगावरचं मांस काय - चार दिवस नीट खाल्ल्या-जेवल्यावर आपोआप अंगाने भरेल.

पाणी तापल्यावर तिने नवऱ्याला उठवून न्हाणीघरात नेलं. पँट, शर्ट उतरवून दांडीवर टाकलं. आणि घसाघसा अंगावर गरम पाणी ओतलं. साबण लावून, घासून अंगावरचा मळ काढला. आधी आपल्या पदराने त्याचं डोकं पुसलं नि मग अंग पुसायला त्याला टॉवेल दिला.

रात्री जेवल्यावर अंथरुणाची वळकटी घेऊन सासरा माडीवर गेला. माडीवर एक जुना पलंग होता. मधून मधून त्याला तिथं जाऊन झोपायची हुक्की यायची. विशेषतः घरात भांडण झालं किंवा त्याच्या मनासारखं काही झालं नाही की तो वळकटी काखेत घेऊन माडीच्या पायऱ्या चढायचा. आज पायऱ्या चढताना तो बडबडत होता, "कितीदा सांगितलं, परगावी गेल्या ठिकाणी नीट जपून राहा म्हणून. पण ऐकतोय कोण? आणि आता हा आळ!"

आता मात्र मंजुळाला त्याचा संताप आला. ती म्हणाली, "आता त्याच्या नोकरीचे पैसे मिळणार नाहीत ना, म्हणून चडफडतो आहेस तू. एकदासुद्धा बायकोला बरोबर नेऊ दिलं नाहीस, अडथळेच आणलेस. स्वार्थी माणूस तू.

आता मुलाला आणि सुनेला दोघांनाही घे शेतात राबवून चांगलं. इतके दिवस रडत होतास. आता शिंगं फुटली वाटतं तुला ? ''

खरं तर लग्न झाल्यापासून आज पहिल्यांदाच ती सासऱ्याला असं टोचून बोलली होती. सासरा रागाने ओरडला, '' आज चांगलीच तणतणायला लागली आहेस ? अशा नष्ट उदाहरणाने उद्या तुम्हाला मातीच खावी लागणार आहे. जरासुद्धा मान-मर्यादा बाळगीत नाहीस. तुझा पायगुणच वाईट नाहीतर... '' तो आणखीन काय काय बडबडत होता आणि मग गळा दाबल्यासारखा थंड पडला.

श्रीधर जेवून मधल्या खोलीत मुढ्याला टेकून बसला होता. मंजुळाने अंथरूण घातलं नि त्याला हाताला धरून तिकडे नेलं. मुलाला पण त्याच्या कुशीतच झोपवलं.

'' बोलत का नाहीस तू ? का एवढं मनाला लावून घेत बसला आहेस ? ''

तो गप्पच. '' काय झालं ते सांग ना मला. ''

'' .... ''

'' सांगितल्याशिवाय सोडणारच नाही तुला. रात्रभर झोपू देणार नाही. '' ती त्याच्या अगदी जवळ सरकली आणि त्याला मिठीत घेतलं. मग श्रीधरने पण तिला जवळ ओढून घेतली.

'' सांग ना. ''

'' काय कर्म सांगू ? ''

'' काहीपण असू दे. तू सांग मला. ''

तो पुन्हा गप्प. त्याला वाटत होतं, बायकोला सारं, सारं सांगून टाकावं, ओकून टाकावं मनातलं सगळं. क्षणभर त्याला वाटलंसुद्धा, आपण खरंच बायकोला सांगतो आहोत, मन हलकं होतं आहे...

...कळलं ना मंजूळ, तो दिवस युनिटला रम वाटण्याचा दिवस होता. पण ती रम आम्हाला पुरली नाही, कमीच पडली. मग मी आणि माझा एक मित्र दोघे मिळनू चोरून शेजारच्या गावात गेलो. तिथं एका घरात मद्य मिळायचं पण आम्ही वाट चुकून भलत्याच कुठल्या तरी एका घरात गेलो. तिथं बायका वगैरे होत्या. त्यांची बोंबाबोंब. मग आजूबाजूचे लोक धावत आले. आम्ही त्यांना सांगायचा खूप प्रयत्न करीत होतो पण आमची भाषा जुळत नव्हती. त्यांनी आम्हाला खूप चोपलं. बदडून, बदडून अंग सुजवून टाकलं. नंतर ओढून आणून कँपमधे गार्डच्या स्वाधीन केलं. मग जेल, चौकशा नि शेवटी कोर्टमार्शल. कोर्टमार्शल म्हणजे काय माहीत आहे ? मिलिटरीचं कोर्ट शिक्षा फर्मावतं. शिक्षा

फर्मावल्यावर त्याला बेड्या घालून बराकीसमोरून, परेड ग्राऊंडवरून पळवून आणतात. मग अंगावरचे मिलिटरी कपडे उतरवून घेतात आणि सिव्हिल पोलिसांच्या स्वाधीन करतात. मिलिटरी कोर्टने फर्मावलेली सजा सिव्हिल जेलमधेच भोगायची असते...!

"कसला विचार करतोस, सांग ना?"

"...."

"इथं सोल्जर बोर्डाचा माणूस आला होता. तो सांगत होता, तीन महिने..."

"तीन महिने राहिलो नाही. दोन महिन्यांनीच सोडलं आम्हाला"

"मग इतके दिवस कुठं होतास तर तू?"

"दोन महिने मुंबईत राहिलो. तिथं एक नोकरी देखील पाहिली होती. गावाला जाऊच नये असं वाटत होतं."

"मग बरा आलास तो."

"तुझी पुष्कळ आठवण यायची मला. एकदा रेल्वेखाली जीव द्यायला गेलो पण तू डोळ्यांपुढं उभी राहिलीस!"

. त्याच्या कुशीत खोल खोल शिरून मंजूळ रडू लागली. त्याच्या छातीवर डोकं घुसळीत ती रडली. मधेच ती रडायची थांबली नि म्हणाली, "झोप तू आता. प्रवासातून आला आहेस, थकला असशील."

"अजूनही मला जीव द्यावासा वाटतो ग. माझ्या ध्यास सोड तू."

मंजुळाने एकदम दरडावलं, "मग आम्ही तरी कशाला राहायचं? सगळीच जाऊ आणि काळ्या नदीत जीव देऊ. मुलाला ढकलून देते आणि मी पण उडी मारते तुझ्याबरोबर."

मग बराच वेळ सगळं शांत! सासऱ्याचं पण कण्हणं थांबलं होतं. शाळेच्या माळावरचा गजबजाटही ऐकू येत नव्हता. नदीत गेलेल्या पागणाऱ्यांचे 'कुकारे' मात्र लांबून हळूहळू ऐकू येत होते. झावळांतून वारा सळसळत होता.

एकदम मंजूळने विचारलं, "तू त्या गावात गेला होतास तेव्हा बाईवर हात..."

पटदिशी तो उठून बसला नि म्हणाला, "नाही ग, खरंच नाही. उगाचच आळ आहे तो." मग तो रागाने म्हणाला, "कुणी सांगितलं तुला हे, मंजूळ?"

"कुणी नाही, उगाच आपलं, असंच विचारलं. वाऱ्यावरची बातमी. सोल्जर बोर्डाच्या माणसाला देखील खरं काय ते माहीत नव्हतं."

रडकुंडीला आल्यागत तो म्हणाला, "आपलेच ग्रह बरोबर नाहीत.

दैव फिरलं की वाऱ्याला देखील दात फुटतात. ''

"तू काहीसुद्धा मनाला लावून घेऊ नकोस. पण मला एक सांग, तू कशाला गेला होतास त्या गावात ? ''

"प्यायला. मी आणि माझा मित्र, दोघे मिळून गेलो होतो प्यायला म्हणून. ''

मंजुळाला एकदम धडकीच भरली, हे तर आणखीनच वाईट. तो इतक्या उघडपणे सांगत होता. पण मंजूळला काय बोलावं काहीच सुचेना. थोड्या वेळाने त्याला झोप लागली. बाळही त्याच्या कुशीत छान झोपला होता. पण मंजूळ मात्र डोळे उघडे ठेवून जागत होती. तिला वाटलं, असंच गुपचुप उठून जावं आणि नदीत जीव द्यावा !

दुसरे दिवशी दिवसभर तो घरातच बसून होता. मंजूळ परत परत मुलाला आणून त्याच्या कडेवर देत होती. तो त्याला घ्यायचा पण वरवर, जरासुद्धा माया दाखवत नसताना. सकाळी त्याचे दोघे मित्र, आणि दूरचा एक चुलता रघुनाथ येऊन गेले. ते आले आंणि मुकाट्याने बसून निघून गेले. त्यांनीही याला काही विचारलं नाही आणि हा पण काही बोलला नाही. त्याचा रामदास नावाचा मित्र आधी किती बोलायचा, 'वैनी वैनी' करून घरभर हिंडायचा; चुलीजवळ येऊन बसायचा आणि 'चहा ठेव' म्हणायचा. तो पण आज मुकाट्यानेच उठून गेला. चुलता मात्र जातो, जातो म्हणत होता, "मिलिटरीची शिस्त, साधंसुधं काम नव्हे. आम्ही नाही का काढली कितीतरी वर्षं ? ''

संध्याकाळी जरा अंधार पडल्यावर श्रीधरने अंगात शर्ट घातला आणि तो बाहेर जायला निघाला. "कुठं जातोस ? '' म्हणून विचारीत मंजुळा फाटकापर्यंत आली पण तो केव्हाच पाटक ओलांडून शेतात उ़तरला होता आणि माळाच्या दिशेने पावलं टाकीत होता.

बराच उशीर झाला तरी तो परतला नाही. मंजुळाने कंदील आणून अंगणातल्या दांडीवर लोंबकळत ठेवला, फाटकापर्यंत त्याचा उजेड पोचेल अशा दृष्टीने, आणि ती वाट बघत ओटीवर बसली. सासऱ्याला म्हणाली, "बाप्पा, त्याला जरा बघून ये ना ! '' तर तो म्हणाला, "लहान मूल नव्हे तो. आपल्या घराची वाट त्याला माहीत नाही काय ? ''

बऱ्याच वेळाने तो आला. पावलोपावली त्याचा तोल जात होता. डोळे आणि चेहरा लाल, लाल ! मंजुळाने विचारलं, "पिऊन आला आहेस तू ? ''

"हो, पिऊन आलो आहे. तुला घाबरतो की काय ? कुणालाच घाबरत नाही मी. कुणाची कदर नाही करणार मी. ''

बाप्पाने आतून म्हटलं, “आता सगळंच सोडलं आहेस तू. घाबरणार कशाला?”

तो एकदम जोरात ओरडला, “बाप्पा, उद्या माझ्या पैशांची मनीऑर्डर येणार नाही म्हणून खवळला आहेस तू. सात वर्षांत सतरा हजार दिले मी तुला, आता मला हवे आहेत ते. दुकान घालणार, कारखाना घालणार मी. सगळ्यांना लाथाडणार.”

मंजुळाने त्याला धरून ओढलं नि आत नेलं. त्याची बडबड सुरूच होती. अंथरुणात घातल्यावर तो तिथंच पालथा पडला. बडबडता, बडबडता रडायला लागला. मग तशीच त्याला झोप लागली. येताना शेतातल्या राड्यात पडून पाय बरबटले होते पण तो तसाच झोपला.

मंजूळने कुणालाच जेवायला उठवलं नाही. निमूटपणे त्याच्या शेजारी बसून राहिली. सासरा आत जाऊन ग्लासभर पाणी पिऊन आला आणि तसाच जाऊन झोपला.

आता श्रीधरचं हे नेहमीचंच झालं होतं. दिवसभर उगाच इकडे तिकडे फिरायचं आणि संध्याकाळी जाऊन दडपून, जाम पिऊन यायचं. मग घरात गडबड, सासऱ्याचं आणि त्याचं नेहमी भांडण. मध्ये मंजुळाचं मरण!

दिवसभर तसा तो देवासारखा गप्प राहायचा. संध्याकाळी पिऊन आल्यावर मात्र खवीस!

एक दिवस सासरा आरडाओरडा करीत होता, “शेतात मोहोर आल्यासारखा नेर फुलला आहे, सारं शेत म्हातारीच्या केसांसारखं पांढरं झालं आहे आणि घरात पाळणा हलवीत बसले आहेत.” त्याने खांद्यावर कांबळ टाकली आणि तो शेताकडे गेला. मग मंजुळाने घाईघाईने घरातलं काम आटोपलं, मुलाला नेऊन मागच्या पार्वतीअक्काकडे ठेवलं आणि नवऱ्याला म्हणाली,

“चल, शेतात जाऊ आपण.”

एकही शब्द न बोलता, खांद्यावर टॉवेल टाकून तो मुकाट्याने मंजुळाच्या मागे शेतात गेला. तिघांनी मिळून दुपारपर्यंत बरंच साफ केलं. तिघंही तीन बाजूनी ‘तण’ उपटीत होती. मंजूळला खूप बरं वाटलं, सगळं नीट थाऱ्यावर पडल्यासारखं.

दुपारी परतताना श्रीधर म्हणाला, “मी जरा दुकानाकडे जाऊन येतो.”

“दुकानातून काही आणायचं आहे का?”

“नाही, असाच. असाच जरा जाऊन येतो.”

त्या दिवशी तो दुपारीच पिऊन आलेला पाहून मात्र तिला एकदम धक्काच बसला. तिची सगळी उमेद, सगळं धैर्य पार गळून गेलं.

" गोकुळमावशी, शिमग्याच्या पौर्णिमेला जत्रेला म्हणून बायने बोलावलं आहे. दोन दिवस जरा जाऊन येईन. "

" जाऊन ये बाळा. आणखीन कुठं जाशील ? एक मामा आहे पण तोसुद्धा कधी येऊन घेऊन जात नाही. "

" नाही ग मावशी, मामाने बरेच वेळा मला बोलावलं होतं. पण आपाला टाकून मीच जात नाही. तो आपल्या विवंचनेत, त्याच्या पाच मुली. नुसत्या शेतीवर त्यांची लग्नं कशी काय करायची म्हणून कधी कधी डोक्यावर हात घेऊन बसतो. "

" जाऊन येतेस ना तू हुळग्याला, मंजुळाकडे ? "

" पण दोन दिवस आपाच्या जेवणाचं... म्हणूनच तुला विचारायला आले आहे मी. "

" काही काळजी करू नकोस. मी पोचवते जेवण दोन दिवस. "

" मावशी मी तांदूळ देऊन जाते. "

आतून खुशालीअण्णाने दरडावून म्हटलं, " मोठी आली तांदूळ देणारी. तुझा तो बाप आमचा देखील चुलतभाऊ आहे, माहीत आहे ना ? "

या खुशालीअण्णाची सुमनला नेहमीच भीती वाटे. उग्र, चौकोनी चेहऱ्याचा, उंचापुरा, धडधाकट शरीरयष्टीचा खुशाली चालायला लागला की वाट दणदण हलायची. एवढंसं काही मनाविरुद्ध झालं की चटकन कुणाच्याही अंगावर धावून जायचा. शेताच्या बांधाजवळ वर्षातून एकदा तरी याचं कुणाशी तरी हाणामारीचं भांडण असायचंच. पण चांगला असला की एकदम चांगला, स्वतःचं काळीज काढून देईल. देवळात वर्षातून एकदा, चैत्र पौर्णिमेला कानडी खेळ असायचा, त्यात तो भाग घ्यायचाच. काय थयथय नाचायचा तो. कमरेला गुंडाळलेला पंचा सोडल्यास त्याच्या अंगावर एकदेखील वस्त्र नसायचं. पण खेळात मात्र जरीची वस्त्रं घातल्यावर राजाचा राजा दिसायचा. रंगवल्यावर त्याचा चौकोनी चेहरा खूप सुंदर दिसायचा.

खुशालीअण्णाचं ऐकून आपलं चुकलं म्हणून एवढंसं तोंड करून ती उभी होती. गोकुळमावशीने तिला जवळ बोलावलं, " सुमन, तुझा भावोजी गेले पाच-सहा महिने घरीच आहे म्हणून ऐकते की ग. परत नोकरीवर गेला नाही का तो ? "

" मला नीटसं माहीत नाही ग, मावशी. बाय पण काही सांगत नाही."

" ती आणि सांगेल? चिरली तरी हां हूं करणारी नव्हे ती, रक्त दिसेल तेव्हाच समजायचं."

" बाय खरच त्रासात असावीसं वाटतं ग, मावशी."

आतून खुशाली रागाने म्हणाला, " परवा पिऊन बेवडा होऊन हुळगेच्या माळावर पडला होता म्हणे, मेला."

सुमन तिथे आणखीन थांबली नाही, डोळ्यांतील अश्रू लपवीत मागे फिरली. गोकुळमावशी म्हणाली, " जाऊन ये तू हुळग्याला. मंजुळाचा समाचार तरी समजेल."

सुमन घरात आली. लग्न झाल्यावर पहिल्यांदा भावोजीची काही पत्रं आली होती. ती सगळी एका कोपऱ्यात तारेच्या आकड्यावर लावून ठेवली होती, मळून काळी पडली होती. सुमनला वाटलं, आता ती पत्रं वाचावी, पण तिला धीर झाला नाही. बायने त्याला पहिल्या रात्री पांघरायला दिलेली ती चादर, तिची आता लक्तरं झाली होती आणि ती दांडीवर लोंबकळत होती. बाय त्याला पाणी प्यायला द्यायची तो फुलं रेखाटलेला तांब्या-बायने एके दिवशी तो घासून पुसून फडताळ्यावर काढून ठेवला आणि म्हटलं, " बायूल, संभाळ ग हा तांब्या. बघ किती सुंदर फुलं आहेत ही. तुझ्या हातनं या तांब्यातून एक घोटभर जरी पाणी तुझा नवरा प्यायला ना तर जन्मभर तुझाच होऊन राहील तो."

वेडी बाय! त्या तांब्याचा तिला रागच आला, काढून त्याला एक पोचा घालावासा वाटला.

सुमन आत गेली आणि तिने ट्रंक उघडली. मागे एकदा रजेवर आल्यावेळी भावोजीने तिला कपडा आणला होता. मुद्दाम कोडीबागला जाऊन तिने छान फ्रॉक शिवून घेतले होते. किती जपून ठेवले होते तिने ते! त्यांचा रंगदेखील तिला खूप आवडायचा. उद्या बायकडे जत्रेला जाताना तेच फ्रॉक घालणार आहे मी आणि भावोजीला विचारणार आहे, " भावोजी, इतका चांगला होतास तू, आता असं का वागतोस? बायला त्रास देऊ नको रे!"

सकाळी जाताना, " आपा, मी जाते." म्हटल्यावर तो म्हणू लागला, " वशाडावर वशाड, आणि कुठं जातेस रहाट ओढायला? बायला सांग, नदी आटण्यापूर्वीच ओलांडून जा म्हणावं. घांग्रीच्या दगडावर जाईपर्यंत उशीर होईल."

सुमन जायला निघाली. तरी आपाचं एक बरं होतं, ताळतंत्र नसलेलं

काहीपण बडबडत असला तरी आपले स्वतःचे उद्योग नीट करायचा. व्यवस्थित आंघोळ, जेवण, गुरांना घेऊन डोंगरावर जायचा, शेताचे बांध बघायचा. पण तोंडाने मात्र अर्थहीन बडबड.

घरातून निघून फाटकापर्यंत पोचेपर्यंत तिची नजर गोविंदला शोधायला भिरभिरत होती. कुठं गेला असेल हा? भेटला असता तर विचारलं असतं, "मी कशी दिसते, गोविंद?"

पण तो कुठंच नव्हता. ती नदीच्या दिशेने चालायला लागली. खरं म्हटलं तर बायने तिला जत्रेला मुळी बोलावलंच नव्हतं. बायच्या गावात जत्रा आहे म्हणून समजल्याबरोबर तिला तिच्याकडे जायची ओढ लागली. गेले चार-पाच महिने तिने बायला पाहिलं नव्हतं. तिला बघायला तिचा जीव व्याकुळ झाला होता.

झरझर पावलं उचलीत ती तारीजवळ जात होती. खरं तर या शिद्दर गावाला स्वतःच बंदरच नाही. गावासमोर दोन बेटं– आंबे आणि खारगे. तिथं जायला सरळ तार नव्हती. त्या बाजूने खारगे गावातून किंवा या बाजूने किन्नर गावात जाऊन तार पकडावी लागत असे. तसे हे तिन्ही गाव एकमेकांना लागूनच होते. कुठल्याही तारीवर जायला तासाभरापेक्षा जास्त वेळ लागत नसे. सुमन खारग्याच्या तारीवर जायला बघत होती. तिथून नदी पार केली की हुळगे– बायचा गाव. बायचं घर तर नदीच्या तीरावरच.

ती शेतातून जाताना आडोशाला असलेला गोविंद एकदम समोर आला.

"अरे गोविंद, तू इथं काय करतोस?"

"तुला बघायला थांबलो होतो ग. तू जत्रेला जायच्या कपड्यांत कशी दिसतेस ते मला पाहायचं होतं."

"पण असं लपूनछपून येणं बरं नव्हे, गोविंद."

"वस्तीतले लोक उगाच चिडवतात, संशय घेतात."

"घाबरतोस तू?"

"नाही, पण...."

तो एवढंसं तोंड करून बावरल्यासारखा उभा होता. सुमनला त्याच्याविषयी एकदमच प्रेम, राग, दया वाटली. "यापुढं घाबरायचं नाही, गोविंद. पूर्वी लहानपणापासून आपण भेटत होतो तसंच भेटत राहायचं. लोकांना हवं ते बोलू दे. गेलं वर्षभर मी किती सोसलं माहीत आहे? तू घरी ये, लोकांसमोर बोलत बैस."

"हो ग, सुमन. घाबरल्यावर मनाला त्रास होतो, असं लपून छपून

भेटावंसं वाटू लागतं."

"येते मी आता" ती जायला निघाली. थोडं पुढं गेल्यावर तिने विचारलं, "कशी दिसते मी, गोविंद?"

"फारच सुंदर दिसतेस ग. म्हणूनच तुला बघायला आसुसलो होतो मी."

होडीत पसरट शरीराची एक काळी बाई बसली होती. तिच्या पोटाच्या, कमरेच्या काळ्या तेलकट वळकट्या तिच्या लुगड्यावर लोंबत होत्या. शरीरासारखाच तिचा चेहराही पसरट, काळा होता. तिचं कपाळ टाळूपर्यंत उघडं होतं आणि मागनं केसांचा बुचडा बांदलेला होता. त्यात जास्वंदीचं एक फूल खोचलं होतं. कपाळावर मोठ्ठं कुंकू. सुमनला त्या बाईला कुठंतरी पाहिल्यासारखं वाटत होतं, पण लक्षात येईना. तिने सुमनला मधेच विचारलं, "कुठं जातेस ग तू?"

"हुळग्याला बहीण दिली आहे माझी, तिच्याकडे."

"कुणाकडे?"

"भावोजीचं नाव श्रीधर आहे."

आपल्या चिरक्या आवाजात कितीतरी मोठ्याने ती बाई ओरडली, "कोण, म्हाळूमामाचा श्रीधर का ग? ह्या हुळगे गावातल्या पुरुषांना काय झालं आहे, देव जाणे..."

मधेच नावाडी म्हणाला, "गुलाबी, तू तुझ्याच पुरुषाचं बघ, बाकीच्यांचं तुला नको. हणकोणपासून काणकोणपर्यंतच्या भानगडी हव्यात तुला. तिकडे रथावर पताका चढवून रथ तयार झाला आणि अजून तू इथंच."

"मला काय रथासमोर नारळ फोडायचा आहे की देवदासीसारखं नाचायचं आहे?"

"गावकरीण ना ग तू?"

"कसली गावकरीण? स्वयंपाकीण म्हणून देवाची पंधरा कुडवांची जमीन दिली होती, शेतजमीन. तीदेखील बाळसूने खाल्ली ना?"

"पण तू सोडायचीच नव्हतीस."

"काय करणार? हा बेवडा म्हणून बाळसूकडे भागीदारीने दिली. तीन वर्षं नीट कसली. माझा हिस्सा पण मला दिला. पण चौथ्या वर्षी आपलीच जमीन म्हणून ट्रायब्यूनलला लिहून पाठवलं. मी सांगते तुला पांडू, त्याला ती जमीन लाभणार नाही. निःसंतान होईल त्याचं. त्याच्या मसणावर टाकळा उगवेल. देवाची जमीन आहे ती. महादेव क्षमा नाही करणार त्याला"

"आज तुझी पाटी कुठं आहे ग?"

"पाटी सोडली. काल गेले होते, उधारी वसूल करायला. हे बघ, हिंडून हिंडून पाच-सात कुडव भात वसूल करून आणलं आहे."

"इतक्या वर्षांची पाटी, बरी सोडलीस की ग तू!"

"मुलगा म्हणतो, मी पणजीला ऑफिसमधे नोकरी करतो आणि तू सुकी कोलंबी, तिसऱ्यांची सुकी मासं, यांची पाटी घेऊन का फिरतेस? नाहीतरी मला नकोसाच झाला आहे हा धंदा. उधार दे म्हणायचं आणि मागायला गेले की रडवायचं, भाताचं फोलपट घालून द्यायचं. मी तुला सांगते बघ, या आठ-दहा गावचे खोत माझ्या शेर-अर्ध्या शेराच्या कर्जात आहेत."

"अग, पाटी सोडलीस, आता नवऱ्याला दारूला पैसे कुठून देणार?"

"कुठंतरी रस्त्यावर जाऊन पिऊ दे नाहीतर मरू दे तो. उबग आला आहे!"

"अग, त्याच्या नावाने रुपयाएवढं कुंकू लावतेस, कुणाचंही फूलझाड दिसलं की फांदी ओढून फुलं तोडून माळतेस आणि नवऱ्याला असं म्हणतेस?"

"कुंकूवाला आधार म्हणून तर इतकी वर्षं सहन केलं ना?"

सुमनला त्या बाईच्या शेजारी बसून कंटाळा आला होता, कधी एकदा होडी किनाऱ्याला लागेल असं झालं होतं. होडी किनाऱ्याजवळ आली तशी गुडघाभर पाण्यात उतरून ती भरभर चालायला लागली. एकूण त्या बाईने तिच्या सगळ्या उमेदीचा भंग केला होता.

ती बायच्या घराजवळ पोचली तेव्हा सूर्य वर आला होता, उन्हाची झळ लागत होती.

बायच्या घरी पोचली तर सगळं सामसूम. सणाचा कोणताही मागमूस नव्हता. माडाच्या आळ्याशी एक कळशी उपडी पडली होती. अंगणातही हा एवढा कचरा. बागेच्या एका कोपऱ्यातून झाडाआडून 'घुमाघुम्म' काहीतरी आपटल्याचा आवाज येत होता.

ती भरभर आत गेली. मंजूळ चुलीजवळ बसून विस्तवाला फुंकर मारीत होती. "बाय" मंजूळने मागे वळून पाहिलं आणि एकदम आनंदाची पखरण झाल्यासारखं तोंड भरून हसली. तिचे कपडे मळलेले होते. केसही विंचरले नव्हते. चुलीजवळ बसून फुंकर मारताना चुलीतली राख तिच्या चेहऱ्यावर, केसांवर उडाली होती. घरातलं औदासीन्य, तिथला पसारा आणि मधे बायचं नितळ हास्य, सुमनला काहीतरी विचित्रसं वाटलं.

"सुमन, आलीस पोरी, बैस. जत्रेला ये म्हणून तुला कुणाकडून तरी

निरोप पाठवायला बघत होते ग मी, पण कुणी भेटलंच नाही. ''

'' असू दे ग. तुमची जत्रा म्हटल्यावर माझं मन राहीना. तुझं लग्न झाल्यापासून ही जत्रा चुकवली नाही मी. ''

'' आलीस ते छान केलंस. माझ्या मनाला तेवढंच समाधान. ''

'' पण हे काय ग बाय? आज सणाच्या दिवशी तू हे पोतेरं गुंडाळून का बसली आहेस? ''

मंजुळाच्या चेहऱ्यावर अचानक सावट आलं, '' बरं नाही ग जिवाला. कसलाच उत्साह वाटत नाही. ''

'' काय झालं आहे? तुला काही होतंय का ग? ''

'' काही नाही ग. बस तू. मी स्वयंपाक करते. रात्री उडदाच्या पोळ्यांसाठी वाटून ठेवलं आहे. सासऱ्याला सांगते एक नीरफणस काढून द्यायला. छान भाजी करू या. मूग पण भिजत घातले आहेत मी. पोळे, खतखते आणि पायस. ''

'' बाळ कुठं आहे ग? ''

'' मघाशी देवाप्पामामा घेऊन गेला होता. असेल त्याच्याकडे. ''

'' आणि भावोजी?

'' असेल देवाच्या माळाजवळ. ''

'' बरा आहे ना ग तो? ''

'' हो ग; बरा नसायला काय झालंय त्याला? ''

'' मग तू अशी का? दुर्मुखल्यासारखी? ''

मंजुळा खोल हसली. '' दुर्मुखलेली' का? आता तू आली आहेस ना, आता बघ. झकास सण आणि जत्रा साजरे करू या. ''

दोघी बहिणी कामाला लागल्या. सुमनने नवे कपडे बदलून बरोबर आणलेले जुने घातले. झाडू घेऊन आधी सगळं घर, अंगण स्वच्छ झाडून घेतलं. मग शिंतोडा टाकला, शेडीने उंबरठा रंगवला.

'' बाय, तुझं ते वस्त्राचं तोरण कुठं आहे ग? सणावारी तरी लावायचंस. किती सुरेख केलं होतंस तू! ''

'' असू दे ग आता ते. ''

'' दे ना, मी लावते. ''

मंजुळाने ट्रंकेतून ते वेली-फुलांनी भरतकाम केलेलं तोरण काढून दिलं. सुमनने ते मुख्य दरवाज्याला नीट लावलं. आता घराला खरंच सणाचं स्वरूप आलं. मग ती बिंदगा आणि कळशी घेऊन विहिरीवर गेली. तिथे तिला कुजलेली

सोडणं बदडून काढीत असलेला सासरा दिसला. तिने मनात म्हटलं, सणावारी ह्या अभद्र माणसाने हे काय आरंभलं आहे ? तो हातात कुडती घेऊन, ओली कुजलेली सोडणं धुप्पधुप्प बडवीतच होता. त्याचं सगळं अंग घाणीने भरलं होतं. चारी बाजूंनी कुजट वास येत होता. सुमनला त्याचा रागच आला. हातातली कुडती घेऊन त्याच्या डोक्यावर हाणावीसं वाटलं.

दिवस माथ्यावर येईपर्यंत त्या दोघींनी स्वयंपाक संपवला. मग सुमन मंजुळाला जवळ घेऊन तिचे केस विंचरू लागली. इतक्यात न्हाणीघरातून हंड्यात तांब्या घातल्याचा आवाज आला. मंजुळा म्हणाली, " येऊन आंघोळीला गेला आहे वाटतं सासरा. तुळशीला वाडी काढायला हवी. "

" काढशील नंतर. आधी तू नवीन साडी नेस बघू. "

ती नेसून येईपर्यंत सासरा आंघोळ करून आला. " कावेरी, वाडी काढ. "

" पण केळीची पानं कुठं काढून आणली आहेस ? मघाशी नीरफणस काढून दे म्हणून सांगणार होते तर तू आपल्याच कामात. मीच कसातरी फांदी वाकवून, वाकवून काढला. "

तो विळा घेऊन केळीची पानं काढायला गेला. सुमनने काळजीच्या स्वरात विचारलं, " बाय, भावोजी आला नाही अजून ? "

मंजुळाने झटकून टाकल्यासारखं म्हटलं, " येईल तो. जाणार कुठं न येता ? " पण तिची नजर माळाच्या वाटेकडे लागली होती.

सासऱ्याने पानं काढून आणल्यावर ती वाडी काढायला स्वयंपाक- खोलीत गेली. मागनं तो गुणगुणत होता, " मी असेपर्यंत अमावास्या- पौर्णिमेला माझ्या आई-वडलांना वाढतो. मी मात्र मेल्यावर लोंबकळत वणवण करायला हवी. हा मुलगा घासभर अन्न देणार आहे का मला ? जिवंत असतानाही नाही आणि मेल्यावरही नाही. "

मंजुळाला त्याच्या बोलण्याचं काहीच वाटलं नाही पण सुमन मात्र बिचारी आतल्या आत थिजल्यासारखी झाली.

मंजुळाने आत जाऊन तीन पानं वाढली, एक तुळशीला, एक गाईला आणि एक कावळ्याला. केलेल्या स्वयंपाकातलं सगळं एवढं एवढं घातलं. तोपर्यंत सासऱ्याने गंध-फूल तयार केलं. गायीच्या पानावर पाणी सोडून तुळशीचं पान घेऊन बाहेर गेला. पान तुळशीच्या पायरीवर ठेवून तो तुळशीची आणि आतल्या गणपतीची पूजा करू लागला. " राम, राम, राम, हरी ॐ, हरी ॐ. "

तेवढ्यात एक कुत्रा पान हुंगत जवळ आला. सासरा 'हडत' करून

शिव्यांचा वर्षाव करीत त्याच्या मागे लागला. त्याला लांब हाकलून परत आला आणि त्याने पूजा करायला सुरुवात केली. ते सगळं बघून सुमनला हसूच येत होतं.

मंजुळा पुनःपुन्हा बाहेर येऊन, " हा देवाप्पा बाळाला घेऊन कुठं गेलाय मरायला " म्हणून काळजी करीत होती. सुमनपण त्याला अंगावर खेळवायला आतुर झाली होती.

थोड्या वेळाने देवाप्पामामा आला. बाळाच्या हातात एक मोठ्ठा फुगा होता. बरंच काय काय खाऊन त्याचं तोंड बरबटलं होतं. " देवाप्पामामा, तू त्याला जत्रेला घेऊन गेला होतास ? "

देवाप्पा उगीचच हसला.

" देवाप्पामामा, जत्रेत पुष्कळ दुकानं आली आहेत ? "

देवाप्पाने, " हो, हो " म्हणून मान हलवली. आता मंजूळ त्याची भाषा छान शिकली होती. त्याच्याशी चांगल्या गप्पा मारू शकत होती.

" देवाप्पामामा, हा दिसला होता ? "

आता मात्र आपल्याला काहीच समजलं नाही अशा तऱ्हेने तो जायला लागला. मंजूळ धावत जाऊन त्याच्यासमोर राहिली अन् म्हणाली, " जेवायला थांब. आज तू स्वयंपाक नको करूस. "

" येतो, येतो, मग येतो " असं खुणांनी सांगून त्याने पावलं उचलली.

सुमन रमेशला कवटाळून त्याचे लाड करण्यात मग्न झाली होती. तो लबाडदेखील ' खी खी ' करून छान हसत होता. थोडा वेळ घर आनंदाने भरून गेले. पहिल्यांदाच मंजुळाच्या लक्षात आलं, ' आज आमच्या घरी सण आहे ! '

बराच वेळ झाला तरी तो आला नाही. मंजुळा सासऱ्याला म्हणाली, " तू जेवून घे, तो येईल मग. "

" येऊ दे त्याला. केव्हा यायचं तेव्हा येऊ दे नाहीतर भर सणाच्या दिवशी माझा उपवास. "

तो माडीच्या पायऱ्या चढू लागला. त्याला बघताना मंजुळाला वाटलं, " किती वाळला आहे हा ! अंगावरची कातडी चिमटली आहे, अंगावरून ती अलगद लोंबकळायला लागली आहे.

" सुमन, तुला वाढते मी. तू जेव आणि बाळाला पण जरा भरव. "

" नको ग, बाय. घरातलं मोठं माणूस कुणीच जेवलं नाही आणि मीच जेवू होय ? "

“तू पाहुणी आहेस ग. तू जेवलीस की सवाष्ण पावणार. पाहुण्याने आधी जेवायचं.”

समोर बसून मंजुळाने तिला वाढलं. ती नको, नको म्हणत असताना पोटभर जेवायला लावलं. “नको का म्हणतेस? मुगांची भाजी तर तुला खूप आवडते.”

घरासमोर शेतात कुणाची तरी गडबड ऐकू आली. त्वरेने मंजुळा बाहेर आली. सुमनपण हात धुऊन तिच्या पाठोपाठ बाहेर आली. तो येत होता, तोंडाने बडबडत, गोंधळ घालीत, वाकडी-तिकडी पावलं टाकीत येत होता. असं वाटत होतं की, आता पुढच्या पावलाला तो खालीच कोसळणार.

जवळ आल्यावर पाहिलं तेव्हा त्याच्या एका हातात मळकट कपड्यात बांधलेल्या दोन-तीन पाटोळ्या होत्या आणि दुसऱ्या हातात नाकातून दोरी ओवलेला पालू.

“गुलाबीने सांगितलं मला, अरे तुझी मेव्हणी आली आहे. मार शिट्टी. मग घेतलं खाजे, मिठाई, हलवा. हा पालू घेताना तो हळग्याचा सोनार भारी पडत होता. त्याच्या नाकावर टिच्चून डबल पैसे मोजून हा पालू आणला मी.”

सुमन अवाक् होऊन बघत होती. ती भिऊन थरथरत होती.

“अग सुमन, भावोजीशी दोन शब्द तरी बोल ना ग! सहा महिने झाले मला येऊन. एक दिवस समाचाराला सुद्धा यायचं नाही का भावोजीच्या?”

“तू पण शिद्दरला नाही आलास, भावोजी.”

“मी रिकामटेकडा. नोकरीवर लाथ मारून आलोय ना ग! अग कावेरी-मंजूळ, हा पालू घे आणि झक्कास हुमण कर. सागुती व्हायला हवी, सागुती.”

मंजुळाने संतापून त्याच्याकडे पाहिलं. तिने पालू हातात घेऊन फेकून टाकला. तो थेट अंगणातच्या मेरेवर जाऊन पडला.

“पिऊन ना शुद्ध ना भान! एक पाऊल धड पडत नाही आणि म्हणे पालू घेऊन आलो आहे. कुणाच्या मढ्यावर घालायला?”

“मंजूळ, तू माझा पालू फेकून दिलास? एवढी मस्ती तुला?” तो तिच्या अंगावर धावून गेला. सुमन घाबरून मधे पडली. मंजुळाने तिला बाजूला ढकलीत हळूच म्हटलं, “तू गप्प बस. हात नाही लावणार तो माझ्या अंगाला.”

सुमनने लगबगीने जाऊन तो पालू उचलून आणला. झोकांड्या खात तो घरात गेला आणि तोल जाऊन मधल्या खोलीत तो जमिनीवरच पडला.

मंजुळाने पुढे जाऊन त्याला उठवायचा प्रयत्न केला पण तो हलत नव्हता. मग तिने आत जाऊन एक चटई आणली व त्याच्या बाजूला अंथरली आणि तसाच ढकलून त्याला नीट चटईवर घातला. तो शुद्ध गेल्यासारखा पडून राहिला.

आयुष्यात मंजुळा एवढी निराश कधीच झाली नव्हती. निराशा, वैफल्य, जीव द्यायची तीव्र इच्छा– काय काय तिच्या मनात येत राहिलं. ती आत जाऊन गप्प बसून राहिली. बाजूला मुलगा झोपला होता त्याच्याकडे पाहायचा देखील तिला धीर होत नव्हता.

सुमन मात्र झटपट कामाला लागली. विळी घेऊन आधी तिने तो पालू नीट केला. तो धुऊन आत आणून ठेवला आणि मग हुमणाचा मसाला काढला. ती बायला काय काय विचारीत होती पण मंजुळा एक शब्दसुद्धा बोलत नव्हती. मग तिने आपल्याच मनाने सगळं केलं.

आता दिवस अगदी मावळायला आला होता, ''बाय, तुझा सासराही जेवला नाही की ग. त्याला वाढायला हवं ना ? ''

''बायूल, तुला आठवतं ? लहानपणी एकदा मोठ्ठा महापूर आला होता. सगळं काही वाहून गेलं होतं. तसाच महापूर आणखीन एकदा यावा आणि हे घर, या घरातली माणसं सगळं काही त्या महापुरात वाहून जावं. ''

सुमनचं काळीज कापलं गेलं ! ती निमूटपणे तशीच उभी राहिली.

''बायूल, एक ताट वाढ आणि पाणी भरून तांब्या नेऊन दे त्याला. माडीवर. वाडी घातली आहे त्याने, त्याला उपाशी ठेवून चालायचं नाही. ''

सुमन ताट घेऊन माडीवर गेली तेव्हा सासरा डोळे मिटून पलंगावर गप्प पडलेला होता. पावलांच्या आवाजाने त्याने डोळे उघडले, ''मामा, जेवून घे तू. ''

तो उठून बसला. ताट ठेवून परतताना तो म्हणत होता, ''गणेशच्या तुम्ही दोन्ही मुली गुणी आहात. पण नशिबातलं कोण काढू शकतो ? ''

सुमन वरून खाली येत होती तेव्हा श्रीधर मधेच जाग आल्यासारखा उठून बसला आणि त्याने ओकून घाण केली. दारूची, खरकट्याची दुर्गंधी घरभर पसरली. तो उठून बसलेला तसाच पुन्हा आडवा पडला.

सुमनला तो उकिरडा सहन होईना. ती लगबगीने आत गेली. आत जाऊन मागील दारी गप्प उभी राहिली. बायला पण तिने काहीच सांगितलं नाही. काय करावं ते सुचत नव्हतं आणि ती दुर्गंधीपण सहन होत नव्हती.

थोड्या वेळाने ती एक फडका घेऊन आली आणि ओकलेलं सगळं

त्या फडक्याने एकत्र केलं आणि ते माडाच्या आळ्यात नेऊन टाकलं. मग एक स्वच्छ फडका आणून भावोजीचं तोंड पुसून काढलं. सगळीकडे झाडू फिरवला, थोडं शेण आणून सारवून घेतलं.

" बाय, थोडंस जेवून घे ना ग. "

" नको सुमन. " तिने आपला पदर तिथंच जमिनीवर सोडला आणि ती आडवी झाली.

बाहेर आता अंधार पसरला होता. सुमनला झोप येत होती. आतून एक चटई आणून ती पण बायच्या बाजूला आडवी झाली. तिला लगेच झोपही लागली.

बऱ्याच रात्री भावोजी बायला उठवीत होता ते तिला ऐकू आलं. आधी बराच वेळ मंजुळा गप्पच राहिली. मग ती म्हणाली, " आता शुद्धीवर आला वाटतं. म्हणून याला भूक लागली आहे. "

" मंजूळ, ऊठ ना ग. वाढ मला. "

" पिऊन पोट भरलं नाही वाटतं ? कधी नव्हे ती पोरगी आली होती. तुझं ओकलेलं सगळं काढलं तिने. "

" ऊठ तू, मला वाढ आणि तिलाही वाढ. "

मंजुळा रागाने उठली. " ती जेवणार नाही आणि मी पण नाही जेवणार. तुला पाहिजे तर वाढते. "

तिने एक तांब्या आणून त्याला दिला. मागीलदारी पायरीवर उभा राहून त्याने नीट तोंड धुतलं आणि तो आत आला. मंजुळाने एकच पान वाढलेले पाहून तो म्हणाला, " सगळेच जेवू ना ग ! "

" सांगितलं ना, मी नाही जेवणार म्हणून ? "

" मग मीही नाही जेवणार. " तो उठून बाहेर जाऊ लागला. मंजुळा म्हणाली, " थांब, बस इथं पाटावर जरा. "

मग तिने सुमनला उठवलं आणि तोंड धुऊन यायला लावलं. आणखीन दोन ताटं वाढली आणि ती तिघंही एकत्र जेवायला बसली. ताटात हात घालण्यापूर्वीच मंजुळा उठली आणि जिन्याशी आली. खालूनच तिने आवाज दिला, " बाप्पा, जागा आहेस ? "

" मला आणि झोप कुठली ? माझी झोप खवीस घेऊन गेला. "

" जेवायला ये. "

" संध्याकाळी दिवस मावळताना जेवलो होतो ना ग. जेवलेलं गळ्याशीच आहे अजून. "

मंजुळा आली आणि ताटावर बसली. मधेच श्रीधरने म्हटलं, “ माशांचं कालवण खूपच छान झालं आहे, मंजुळा. ”

मंजुळाने सुमनला पाहिलं, तिचं लक्षच नव्हतं. एका बाजूने ती एकेक घास तोंडात टाकीत होती आणि दुसरीकडे अश्रू गाळीत होती. मंजुळा काहीच बोलली नाही. तिने चिमणीचा दिवा हळूच फिरवला आणि सुमनच्या चेहऱ्यावर काळोख पडेल असा ठेवला. मनात ती म्हणत होती, “ तू कशाला रडतेस, बायूल ? माझे अश्रू घेऊन तू कशाला रडतेस ? रडून घे थोडं बायच्या नावाने ! ”

ती झोपायला गेली तेव्हा देवळाच्या माळावर आतषबाजी चालली होती. वाजंत्री वाजत होती. मधेच लोकांचा कलकलाट. तिने मनात म्हटलं, पालखी देवळातून बाहेर निघून माळावर फिरते आहे वाटतं.

थोड्या वेळाने सगळीच झोपायला गेली पण मंजुळाला झोप येत नव्हती. छातीवर मणामणांचं ओझं आणि दडपण ! तळ किंवा अंत नसलेल्या खोल खोल विहिरीत पडल्यासारखी ती भांबावून गेली होती.

सकाळी उठल्यावर भावोजी मुकाट्यानेच सगळे व्यवहार करीत होता. त्याने दाढी केली, आंघोळ केली, आपले काही कपडेही धुऊन टाकले.

सुमनला सारखं वाटत होतं, आपण भावोजीशी काहीतरी बोलावं, तू आणि बाय एकदा शिद्दरला एक दिवस या म्हणावं. पण तो घुम्म, गप्पच होता. “ भावोजी, तू एकदा तरी पूर्वीसारखा चेष्टा-मस्करी करीत बोल ना ! ‘ बायूल, बायूल, उचल लवकर पाऊल ’ असं एकदा तरी म्हण ना ! बायला बरं वाटेल !

आंघोळ करून तो स्वच्छ कपडे घालून तयार झाला, “ मंजूळ, मी पुढं जातो, सुमनला घेऊन तू मग ये जत्रेला. देवाला वगैरे जाऊन या. ”

“ आपण सगळेच बरोबर जाऊ या ना ! ”

सुमन तिथंच होती, ती पण म्हणाली, “ आपण बरोबरच जाऊ, भावोजी. ”

“ नको, मी पुढं जातो. ” त्याने खिशातून दहा रुपयांची एक नोट काढून सुमनला देत म्हटलं, “ ही घे तुला. जत्रेसाठी. ”

सुमन तशीच गप्प उभी हाती. मंजुळा म्हणाली, “ घे. घे ग तू. ”

तो निघून गेला आणि मंजुळाच्या मनात सारखी धाकधूक. याला मी एकटं सोडायला नको होतं !

“ बायूल, जत्रेला जायची उमेदच नाही ग मला. ”

“ तू नाही आलीस तर मी पण नाही जाणार, बाय. ”

मंजुळाने सुमनचे केस विंचरून छान अंबाडा घातला. वर अबोलीची, मोती-मोगरीची वेणी माळली. आपली एक नवीन साडी तिला नेसवली. चेहऱ्यावर पावडर लावली, डोळ्यांत काजळ घातलं. गळ्यात, हातात दागिने घातले. मग तिला जवळ घेऊन कवटाळीत ती म्हणाली, "बायूल, बघ किती सुंदर दिसतेस तू, देवताच जशी! म्हणूनच भाचा वेडा झाला आहे तुझ्यासाठी!"

सुमन लाजून चूर झाली. "बाय, तू मलाच शृंगारतेस आणि तू अजून अशीच?"

"माझं काय ग, काहीपण..." म्हणत तिने दांडीवरचं नऊवारी लुगडं ओढलं. सुमनने ते लुगडं ओढून घेऊन बाजूला ठेवलं. बाय, तू पण माझ्यासारखीच पाचवारी साडी नेस ना."

"माझ्याकडे आणखी पाचवारी साडी नाही ग."

"खोटं सांगतेस तू. भावोजी पूर्वी येताना पाचवारीच साड्या आणायचा तुझ्यासाठी. मागे एकदा तू शिद्दरला चार दिवस राहायला आली होतीस तेव्हा नेसलेली, ती अबोली रंगाची नेस ना."

"पण तो बघ, पहाऱ्यावर असल्यासारखा सासरा आहे ना? त्याला नाही आवडत. त्यानेच तर मला सुरुवातीला नऊवारी नेसायला लावलं."

"त्याला कशाला घाबरतेस तू? मी तर त्याला कधीच गुंडाळून ठेवलं असतं. नेस तू काही नाही म्हणणार तो. काल तर तो तुझं किती कौतुक करीत होता."

"तसाच आहे ग तो. आत्ता कौतुक करतो म्हणेपर्यंत जमिनीवर आपटतो."

मग मंजुळा आत गेली. ट्रंकेच्या तळाशी ठेवलेली ती अबोली रंगाची साडी आणून नेसली.

"बायूल, मी ना, फक्त शिद्दरला गेल्यावेळीच पाचवारी नेसायची, इथं कधीच नेसले नव्हते."

"असू दे ग" सुमनने उरलेली सगळी फुलं तिच्या केसांत घातली. सकाळी लवकर उठून, बागभर हिंडून तिने ती फुलं गोळा केली होती आणि गुंफली होती.

बायला सजवून तिचं कौतुक करीत मोठ्या प्रेमाने ती म्हणाली, "वस्तीतल्या बायका काय म्हणतात माहीत आहे? सुमन गोरी खरी पण मंजुळाचं सौंदर्य मात्र तिला नाही. खरंच आहे त्याचं म्हणणं."

त्या जत्रेला जाण्यासाठी घरातून बाहेर पडल्या. घरासमोरच्या शेतात

पोचल्यावर त्यांनी मागे वळून पाहिलं तर सासरा कुलूप लावून खांद्यावर खोरं टाकून शेतात जायला निघाला होता, जत्रेला पाठ करून. ''

त्या आणखीन थोडं पुढं गेल्या तेव्हा त्यांना एक तरुण मुलगा '' वैनी, वैनी '' करीत मागे येताना दिसला. मंजुळा म्हणाली, '' हा बघ, आला वैनीला मस्का लावायला. ''

'' असं का म्हणतेस, बाय ? ''

'' अग, तो पलीकडच्या घरातला प्रभाकर आहे. म्हणतो कसा, ' वैनी, मी तुझ्या बहिणीशी लग्न करणार ' सारखा माझ्या भोवती रुंजी घालीत असतो. ''

'' काय करतो ग तो ? ''

'' काही नाही, बेकारच आहे. एक भाऊ गोव्याला पोलिसात असतो, दुसरा मुंबईला. म्हणतो, गावकऱ्यांनी शाळेत नोकरी दिली आहे आपल्याला. नवीन शाळा काढली आहे ना ? ''

'' काय शिकलाय ग तो ? ''

'' कुठे ग काय ? असेल चौथी पाचवी. ''

'' मग नोकरी कसली घंटा वाजवायची ? ''

तो जवळ आला. त्याने चपचपीत तेल घालून केस विंचरले होते. कपाळावर केसांचा कोंबडा उभा केला होता. थोडं थोडं तेल कपाळावर देखील आलं होतं. नुकतेच फुटत असलेले दाढीचे खुंट तसेच चेहऱ्यावर दिसत होते. तो चांगलाच उंच पण बारीक, काळसरच होता. त्याची पँट इतकी आखूड होती की त्याचे लाल मोजे चांगले वीतभर तरी दिसत होते. बूटसुद्धा मळकट आणि सैल होते.

सुमनने हळूच बायच्या कानात विचारलं, '' याचे भाऊ अगदीच बुटके आहेत का ग ? ''

'' का ग ? ''

'' बघ, ती भावाची पँट किती तोकडी होते त्याला. ''

'' बरीच हुशार आहेस की ग तू ! '' म्हणत मंजुळा मोठ्याने म्हणाली, '' घरात हा एकटाच भिल्लमाडासारखा उंच झाला आहे. बाकीचे भाऊ कवाथे. ''

'' उंच माणसं चांगली दिसाता ना, वैनी ? ''

'' छान दिसतोस तू. रंगवलेल्या, नाटकातल्या नटासारखा. ''

'' मग ? ''

'' मग काय ? ''

'' मी तुझ्या बहिणीला ओळखतो, वैनी. ''

“ उपवर मुलींना सारं जग ओळखतं. ”

“ वैनी, परवा आई बाप्पाला काय सांगत होती माहीत आहे ? या वर्षी शेतात सुरय तांदूळ जास्त लावायचा म्हणून. या वर्षी बाबुल्याच्या लग्नाला सुरय तांदूळ लागणार म्हणत होती. ”

सुमनने त्याला ऐकू जाईलसं म्हटलं, “ भात लावायच्या आधी तव्यावर चांगलं भाजून घ्या म्हणावं. ”

“ वैनी, ती माझी चेष्टा करते ना ? ”

“ चेष्टेखोरच आहे रे ती. चेष्टा केल्याने खूप हसू येतं. खूप हसल्यावर भूक लागत नाही, तसंच पोट भरतं. ”

“ भूक लागली नाही तर चांगलं का ग ? ”

“ मग पोट भरायला काम करावं लागत नाही. ”

प्रभाकर उगाच ‘ छे, छे ’ करीत राहिला.

बायचा रमेश सुमनच्या कडेवर होता. “ मी घेतो त्याला ” म्हणत प्रभाकर पुढे आला. “ नको, नको ” म्हणत सुमन बाजूला सरकली. माळाजवळ पोचल्यावर त्याला कोणीतरी दिसला तेव्हा “ मी येतो रे ” म्हणत, धप्प धप्प बुटाचे पाय टाकीत तो पळायला लागला. सुमनला हसूच येत होतं. “ बाय, तुला तो लग्नात शालू आणणार काय ग ? ”

“ तोंड बघ शालू आणणाऱ्याचं. त्याचे आई-वडील चिक्कू-मारवाडी. आठ, आठ दिवसांचं शिळं, करपलेलं गरम करून खाणारी माणसं. ”

मग काही वेळ त्या मुकाट्यानेच चालत राहिल्या.

“ गोविंद काय म्हणतो ग ? ”

“ तो काय म्हणणार ? ”

“ घरी येतो का ? ”

“ भित्रा आहे तो. वस्तीवरच्या बायकांना घाबरतो. ”

“ चार दिवस घाबरेल. भास्करअण्णा त्याला दत्तक घेणार आहेत ना ? ”

“ म्हणूनच तर आणून ठेवला आहे ना ? ”

“ लग्नाबद्दल कधी काही बोलतो ? ”

“ तो काय बोलणार ? ”

“ तुला एक सांगते बायूल, प्रेम-बिम असू दे, पण लग्नाआधी त्याला खूप जवळ येऊ देऊ नकोस - स्वतःला संभाळ. ”

सुमनने नजर वर करून काहीशा रागानेच पाहिलं.

“ तुझ्यावर माझा विश्वास आहे ग, बायूल. तुझ्या हातून एवढंसुद्धा

गैर घडणार नाही. तरीपण वेळ काळ सांगून येत नाही. पाठचा-पुढचा विचार करायला हवा. माणसाचं मन म्हणजे विस्तवाची ठिणगी. आपणच आपल्याला जपायला हवं. ''

एवढ्यात जत्रेचा गोंगाट अगदी जवळ आला. त्या देवळाजवळ पोचल्या तेव्हा लोकांची नुसती खेटाखेट. भैरे, केरवडी, खारगे, हळगे, हुळगे, शिद्दर -- या भोवतालच्या गावातून बेसुमार लोक जत्रेला आले होते.

मंजुळा म्हणाली, ''देवाची भेट नंतर घेऊ. गर्दी जरा कमी होऊ दे. तोपर्यंत आपण जरा जत्रेत फिरून येऊ.''

पहाटे रात्रभर ओढून फिरवून आणलेला रथ आता देवळाच्या बाजूला संथ उभा होता. त्याच्या वरच्या पताका वाऱ्याने उडत होत्या. नाटकाच्या मंडपाचे पडदे आता उतरवले होते. आणि तो उंच मंडप आता उघडाच पडला होता. मंजूळ मनात म्हणाली, ''चांगलं नाटक होतं म्हणे. हा धड असता तर मीदेखील बायूलला घेऊन नाटक पाहायला आले असते.''

देवळाच्या माळावरचा परिसर नुसता फुलून गेला होता. देवळात वाजंत्री वाजत होती तर बाहेर शिट्या आणि पिपाण्या. लोकांचा हा गोंगाट. मधेच काही तरूण पोरांचा जमाव दशावतारी नाटकात नाचल्यासारखा नाचत गात जात होता. त्यांना वाट देता देता लोकांची धावपळ उडत होती. ते एकमेकांवर पडत होते. कुमारिका मुली ''आई ग'' करीत उगाच अंग सावरीत होत्या पण त्यांचा डोळा मात्र जमावातल्या प्रत्येक तरूणावर होता.

नुकत्याच 'दिवजं' आटोपून मोकळ्या झालेल्या दिवजंकरीणी एका झाडाखाली सावलीत बसल्या होत्या. सरबत पिऊन, केळी वगैरे खाऊन त्या आपल्या दीड दिवसाच्या उपासाचं पारणं फेडीत होत्या. कासोटा मारून आणि सोगा सोडून नेसलेल्या नव्या कोऱ्या साड्या, डोक्यावर ढीगभर अबोलीच्या फुलांचे गजरे, कपाळभर कुंकू, गळ्यात दहा-बारा तोळ्यांची गंठणं बघून आत्ताच पूजा करून आणि ओटी भरून स्थापन केलेल्या देवीसारख्या त्या दिसत होत्या.

सुमनने बाळाला एक खुळखुळा विकत घेतला. तोदेखील मुठीत घेऊन तो खुळखुळ वाजवू लागला. ते बघून सुमनही त्याच्याबरोबर खेळू लागली.

एवढ्यात जोरजोरात कसली तरी गडबड ऐकू यायला लागली. कोण भांडतात, शिव्या देतात का उगाच मोठमोठ्याने बोलतात. काहीच कळत नव्हतं.

मंजुळाच्या काळजात धस्स झालं. ''सुमन, मला जरा धर ग.''

''काय झालं ग बाय तुला ?'' त्या दोघीही पावलं उचलीत गोंधळाच्या

दिशेने जाऊ लागल्या. आता गलबला त्यांच्या अगदी कानांशी, डोळ्यांसमोर आला.

श्रीधर खूप प्यायला होता, अगदी तर्र झाला होता. कुणाला तरी ‘ गोळ्या ’ घालीत होता. मधेच तोल जाऊन कुणावर तरी पडत होता आणि तो माणूस त्याला दुसऱ्यावर ढकलून देत होता. भोवताली कोंडाळं करून राहिलेले लोक त्याला जास्तच चिडवायचे आणि तो मग शिव्यांचा वर्षाव करायचा.

मंजुळाला वाटलं, आता ही धरणी दुभंगेल आणि आपल्याला पोटात घेईल. आणि मग आपलं हे दुःख, भीती, शरम सगळं एका क्षणात क़ायमचं नाहीसं होईल.

“ बाळ सुमन, कसला गोंधळ आहे ग ? कोण कुणाला ठोकतो ? देवाचा असा दगड कसा झाला ? ”

सुमन फक्त बायला जपत होती. कडेवर रमेश आणि दुसरा हात बायच्या भोवती घालून ती उभी होती. भर जत्रेत, दहा गावचे लोक जमलेले असताना या माणसाने अशी लाजलज्जा गुंडाळून टाकावी ? यातले कितीतरी लोक तर ओळखीचेच आहेत. तो पाहा, शिद्दरचा शंकर देवळी... माझी बाय अगदी गरीब, मेणासारखी मऊ मनाची... बाय तू कशाला याची बायको झालीस ग ? माझी आईसारखी बहीणच होऊन का नाही राहिलीस ?

“ सुमन, आपण घरी जाऊ या. ”

“ हो बाय, आपण जाऊ या. ”

त्या तिथून बाजूला वळल्या. तिथं एक बकुळीचा वृक्ष होता, त्याच्याखाली जाऊन त्या बसल्या. मघाचा जीव घेणारा तो गोंगाट आता दूर, दूर जाऊन नाहीसा झाला. त्यांना जरा हायसं वाटलं.

मंजुळाचं सगळं अंग घामाने भिजलं होतं आणि तिला भरलेली हुडहुडी काही केल्या थांबत नव्हती. सुमनने तिच्याच पदराने तिचा घाम पुसून काढला.

“ बाय, आपण देवाची भेट घेऊन येऊ. ”

“ नको, आता आणि देवाची भेट नको. ”

“ जरा थांब हं, बाय ” म्हणत सुमन पळतच देवळांच्या बाजूला गेली. साडी पायात येत होती ती तिने वर उचलून घेतली. जाऊन ती एक फुगा घेऊन आली आणि तो तिने रमेशच्या हातात दिला.

“ त्या कर्मकरंट्याला फुगा आणि कशाला आणलास ग तू ? ”

“ काहीतरी काय बोलतेस ग, बाय ? ”

त्या जायला निघाल्या. मंजुळाच्या पायात त्राणच नव्हते. पाठीमागे वळून

देवळाकडे पाहिलं तेव्हा तिच्या डोळ्यांसमोर सगळा अंधार. तिला वाटलं, तिथं एक काळा ढग दाटून आला आहे आणि रथ, पालखी, तिथली सारी माणसं त्यात बुडून हरवली आहेत. आता हा देऊळमाळा कधी फुलून येणार नाही. आता इथं परत जत्रा कधी होणार नाही. देवाचं अस्तित्व नाही तर तो रथ, ती जत्रा कशासाठी? ती मधेच सुमननवर चिडली. "तू आणि मोठ्या कौतुकाने जत्रेला आली आहेस! बोलावलं नाही, काही नाही. तुला जत्रा हवी होती. बघितलीस ना ही दुर्दशा?"

सुमन काहीच बोलली नाही. मुकाट्याने चालत राहिली. मंजुळाने पाहिलं, तिचा चेहरा काळवंडला होता, ती आत्ताच रडायला लागेल असं वाटत होतं. एवढी गोरी ती पण क्षणातच तिचं नितळ गोरेपणदेखील काळवंडलं होतं. तरीदेखील मंजूळ काहीच बोलली नाही. "माझं दुःख तू पण थोडं सहन कर ग, बायूल" म्हटल्यासारखं ती गप्प होती.

त्या घरी पोचल्या तेव्हा सासरा बाहेर ओटीवर कांबळ अंथरून झोपला होता. मंजूळने म्हटलं, "बघ, भर दुपारच्या प्रहरी हा अवलक्षणी कसा दारातच झोपला आहे."

त्यांची चाहूल लागल्यावर तो उठला आणि म्हणाला, "अरे रमेश, जत्रेला जाऊन आलास ना रे? आज्याला खाज्याची एक काडी तरी आणलीस की नाही?"

मंजूळ एकदम चिडून म्हणाली, "जत्रेला जाताना आज्याने एक आणा तरी हातावर ठेवला होता का?"

त्याचे खाली लोंबकळणारे ओठ जरा वेळ खाली वर हलले. "अग कावेरी, असं का म्हणतेस तू? आज्याचं आहे ते सगळं त्याचंच नाही का?"

"आहे काय असं? पूर आला तर कुजून जाणारं शेत आणि चिऱ्यांनी रचलेलं घर. ते पण उद्या बापाने दारूसाठी विकलं तर तेही राहणार नाही."

सासऱ्याने अंगाखालची कांबळ गुंडाळून बाजूला फेकली. तो थरथरत उभा राहिला. सुमनला वाटलं, आता तो रागाने खूप शिव्या देईल. पण तो मुकाट्याने फाटक ओलांडून नदीच्या दिशेने चालायला लागला. शेवटी जीव द्यायला निघाल्यासारखा. जाता जाता तो बडबडत होता, "घर फिरलं की घराचे वासे पण फिरतात. आपलंच नाणं खोटं तेव्हा कर्मालाच रडायचं आता."

रात्री कुठल्या तरी घरातून किंकाळी ऐकू आली. सुमनने झोपल्या ठिकाणी काहीसं दचकूनच ऐकलं— कुणीतरी काळीज फाडून किंचाळलं का? काय झालं

कुणाला ?

गणेश डोक्यावरून पांघरूण घेऊन झोपला होता पण पांघरुणाच्या आत तो झोपला का जागा आहे काही कळत नव्हतं.

त्या किंकाळीने सुमनची झोप पार उडाली, उगाच हुरहूर लागली. कोण किंचाळलं असेल? अचानक बाहेर अंगणात मांजराच्या पावलांनी कुणीतरी धावत येत असल्यासारखा आवाज आला. मग हळूहळू थाप मारल्याचा आवाज – " सुमन, दार उघड सुमन. " आवाजात थरथर आणि भीती.

" कोण, कोण आहे तिकडे ? "

" मी आहे ग, दार उघड ! "

सुमनने कानोसा घेतला. हातात दिवा घेऊन धडपडत जाऊन दार उघडलं. दारात शोभा उभी होती. एवढ्या थंडीत देखील ती घामाने चिंब भिजली होती. दातखिळी बसल्यासारखी चाचरत होती.

" काय झालं शोभावैनी ? "

ती आत गेली आणि सुमन झोपली होती त्या चटईवर जाऊन धप्पकन बसली. तिला दम लागला होता. थोडा वेळ थांबून तिने पदराने घाम पुसला. नवरा गेल्यापासून ती कापरासारखी करपून गेली होती. हसायचं तर ती विसरूनच गेली होती. पण तिचा तो दाट केशसंभार आणि चेहऱ्यावरचं लहान बाळासारखं नितळ निरागसपण मात्र तसंच कायम होतं. डोळ्यांतलं तेजही मावळलं नव्हतं.

" काय झालं, शोभावैनी ? "

शोभाने जरा वेळ रडून घेतलं. रडता रडताच ती म्हणाली, " पूर्वीपासूनच मला त्याची भीती वाटत होती. नवऱ्याचं मिळालेलं सगळं त्याला अर्पण केलं. सगळा पैसा गट्टम् केला. पेन्शन येते ती पण सही करून मी घेते आणि तशीच सासूच्या स्वाधीन करते. तो मग तिच्याकडून ओरबाडून घेतो. आता माझ्यावर उठला आहे. सासरा म्हणजे वडीलच नाही का ग... ? "

" काय झालं ग ? " विचारताना सुमनचं हृदय कलकलत होतं.

शोभाने आपला आवाज एकदम हळू केला. " किती जपत होते मी स्वतःला ! आंघोळ करायला, नेसायला सुद्धा धड देत नव्हता. कावळ्याच्या नजरेने बघायचा. कसलंतरी निमित्त काढून बाजूला घुटमळायचा, पापी मेला. माझा मुळीच विश्वास नव्हता त्याच्यावर. सासूच्या बरोबरीने राहायची मी. खळ्यावर किंवा उसाच्या मळ्यावर गेले तरी सासूबरोबरच परत यायची मी म्हणून त्याला राग यायचा. सासूला मग उगाच शिव्या द्यायचा. काल सासू

माजाळीला गेली होती, तिचा एक मावसभाऊ वारला म्हणून. संधी साधून हा माझा घात करायला आला ग. काळोखात मला काहीच समजेना. मी त्याच्या मुलीसारखी, अंगावर असा हात घालावा का ग?'' ती पुन्हा रडू लागली.

सुमन अवाक् होऊन ऐकत होती, तिला कमालीचं आश्चर्य वाटत होतं. डोकं फिरल्यासारखी ती काही वेळ गप्पच राहिली. जगात असं काही घडू शकतं यावर तिचा विश्वासच बसत नव्हता. तरीपण ती म्हणाली, ''रडू नकोस तू शोभावैनी. लांबच राहा तू...'' 'दुसऱ्या खेपेला रजेवर आलो ना की तुला बरोबरच घेऊन जाणार आहे मी' म्हणत होता ग! आता मीसुद्धा त्याच्याबरोबर स्मशानात जायला हवं. हा जीव नकोसाच झाला आहे ग सुमन!''

सुमनला काय बोलावं सुचेना. ती उठली आणि आतून पाण्याचा तांब्या घेऊन आली.

''शोभावैनी, रडून रडून डोळे सुजले आहेत बघ तुझे. आधी तोंड धुऊन घे. वाटल्यास इथंच झोप.''

शोभा घटाघटा अर्धं पाणी प्यायली. तांब्या पायाकडे ठेवून ती सुमनच्या अंथरुणावर पडली. ''मी इथं आहे म्हणून कुणाला सांगू नकोस हं, सुमन.''

तिच्या कुशीत एक गोधडी अंथरून सुमनही झोपली. तिला वाटलं, शोभाच्या अंगावर हात घालून लहान मुलासारखं तिला जवळ ओढून घ्यावं पण धीर झाला नाही. ती तशीच पडून राहिली. शोभाला बघून तिला वाटलं, देठासहित एक पांढरं कमळ वाटेवर पडलं आहे आणि कुणातरी एका राक्षसाचा पाय त्याला तुडवण्यासाठी थांबला आहे! चिमणीच्या उजेडात तिला दिसलं, गळालेले अश्रू तिच्या गोऱ्या गालांवर तसेच सुकले आहेत. तिच्या ओक्या गळ्याकडे, चेहऱ्याकडे तिला पाहवेना. तिने पटकन दिवा मालवून टाकला.

झोपल्यावर रात्रभर सुमनला सारखा भास होत होता, शोभावैनी आसवं गाळीत सारखी रडतेच आहे. पण चाचपून तिचे अश्रू बघायचा धीर मात्र तिला झाला नाही. तिला वाटलं, शोभावैनीच्या अश्रूंना आगीची झळ आहे, रक्ताचा वास आहे!

पहाटे काळोखातच शोभा उठली. सुमनला म्हणाली, ''मी जाते सुमन.'' पण सुमन झोपेतच होती, तिने नुसतंच ''ऊं ऊं'' केलं आणि ती कुशीवर वळून झोपली. शोभा कधी गेली तिला कळलंच नाही. शोभा गेली आणि आवडूआजीचा कोंबडा घसा खरडून आरवायला लागला. मग तो एकसारखा एकावर एक साद घालीत राहिला. त्याची साद इतक्या जोरात होती की चारी

बाजूंचा परिसर हलत होता. सुमनचे कान किटले. जागी होता होता ती मनात म्हणाली, कोण संचारलं आहे ह्याच्या अंगात, दुःश्चिन्ह मेलं, कशाला ओरडतो आहे ?

आवडूआजीचा हा कोंबडा दिसायला राक्षसासारखा होता, सादही तसाच घालायचा. त्याच्या मानेकडचा भाग कांबळीची चिंधी गुंडाळल्या- सारखा करड्या रंगाचा होता, पंख मात्र लाल होते. फिरकी घेत तो साऱ्या वस्तीभर फिरायचा. मधेच दोन्ही पाय जमिनीवर खिळून ठेवीत मान वर करून साद घालायचा. “ आवडूआजी, हा एवढा मोठा कोंबडा पोसून मोकाट कशाला सोडला आहेस ? ” म्हणून कुणी विचारलं तर ती सांगायची, “ नवसाचा कोंबडा आहे तो. वेताळाच्या जागवणीला देवासमोर मारायचा आहे. ”

सुमन विचार करीत होती, एवढ्या पहाटे उठून शोभावैनी कुठं गेली असेल? सकाळी तिचा सासरा सोयरू उगाचच कानोसा घेतल्यासारखा सगळीकडे फिरत होता.

अंबूमावशीने विचारलं, “ रात्री घरात किंकाळीशी ऐकू आली होती ? ”

सोयरू म्हणाला, “ आमच्या बोक्याने काळोखात भिंतीवरून सुनेच्या अंगावर उडी मारली ना ! तरी बरं, बोचकारलं वगैरे नाही. ”

सुमनच्या छातीत धडकी ! कुठं गेली असेल ही शोभावैनी ? त्यांच्या घराजवळ जाऊन बघायचा धीर होत नव्हता तरीपण उगाच त्यांच्या घराभोवती एक चक्कर मारून आली. पण शोभा कुठे दिसली नाही. पण खरोखर एक काळा बोका कोहळ्याच्या वेलामधे बसलेला होता. बाजूला मोठ्ठाले कोहळे. सुमनला वाटलं, हे कोहळे आता वेलावरून तुटून दारात पडणार आणि फुटणार, त्यांचा गर दारात सगळीकडे पसरणार.

दुपारी शोभाची सासू माजाळीहून परत आली. बघते तर सून घरात नाही. आणि सकाळपासून चूलही पेटलेली नाही दिसत. नवऱ्याला विचारलं तर तो उलट तिच्यावरच खेकसला, “ तू गेलीस माजाळीला, ती गेली असेल आमदळीला. भटकत राहा दोघीही. ”

पार्वती आल्यापासून सारखी हाका मारीत होती, “ शोभा, कुठं गेलीस ग पोरी ? ”

पण शोभाचा आवाज नव्हता. हळूहळू तिच्या हाकांना रडवेली धार येऊ लागली. आता लोकही सावध झाले. प्रत्येक जण आपापल्या परीने शोभाला शोधू लागला. आधी घराघरात जाऊन विचारणा झाली, कुणी पाहिली असल्यास, कुठे लपून बसलेली असल्यास सांगावं म्हणून. पण कुणालाच

माहीत नव्हतं. सुमनदेखील त्यांच्याबरोबर शोधायला फिरत होती. पण रात्री ती आपल्या बरोबर होती हे मात्र तिने कुणाला सांगितलं नाही.

रात्रीची ती किंकाळी आणि आता शोभा घरी नाही. लोकांच्या मनात भीती आणि संशय. आता ते वस्तीबाहेर येऊन आजूबाजूच्या झाडाझुडुपांत, विहिरीत शोध घेऊ लागले. शोधता शोधता सदाशिव जोरजोरात तणतणत होता, "पोरीने जिवाचं काही बरं-वाईट करून घेतलं असेल तर त्यांना सोडणार नाही मी. घरातल्या लोकांना बेड्या घालून कारवारला नेणार."

खाली उसाच्या मळ्यावर असलेल्या विहिरीवर उभा राहून एक जण छाती बडवून जोरजोरात किंचाळत होता, "या रे, लवकर पळत या, पळत या!" वस्तीवरचे सगळे लोक, पुरुष-बायका, मुलं सगळे तिथं पळाले. तो किंचाळणारा मुलगा मनू– तो पण मघाशीच शोभावैनीला शोधायला बाहेर पडला होता. शोभाचं प्रेत विहिरीच्या पाण्यावर तरंगत होतं. अंगावरचं पांढरं लुगडं देहाभोवती पसरलं हातं. लांबसडक मोकळे सुटलेले केस चवऱ्यांसारखे उडत होते. दोन्ही हात कवटाळायला थांबल्यासारखे पसरले होते. कुस्करून पाण्यात टाकलेल्या पांढऱ्या कमळासारखी दिसत होती ती.

शोभाने विहिरीत उडी टाकून जीव तिला होता!

सासू सुनेला कवटाळून खूप रडली. मुलगा गेला तेव्हासुद्धा रडली नव्हती इतकी रडली.

सुमन आठ दिवस अगदी सैरभैर. सारी वस्तीच दुःखात बुडाली होती. या नदीच्या पलीकडे असलेल्या बायला हाका मारून बोलवावं नाहीतर आपणच नदीतून पोहत, तरंगत बायजवळ जावं, "बाय, शोभावैनीचं पाहिलंस ना? तू आपलं खूप मनाला लावून घेऊ नकोस ग!"

कोंडाळं करून ढोलीत बसलेल्या नागिणीसारखा नदीचा प्रवाह काळोखात लपला होता. खारट, राडा कुजलेला वास नदीवरून वाऱ्याबरोबर वाहत येत होता. नदीकडचा सगळा परिसर एवढा शांत होता की कुठूनही कोळ्याची, नावाड्याची एखादी हाकदेखील ऐकू येत नव्हती. मंजूळ चिमणीचा दिवा समोर ठेवून दारातच बसली होती. बरीच रात्र उलटली तरी श्रीधर अजून आला नव्हता. मधेच दावणीला बांधलेल्या बैलांची शिंगं खुंटाला आपटून खडखड आवाज यायचा. मंजुळा लगेच कान देऊन ऐकायची. काही वेळाने फाटकाजवळ कुणीतरी बोलल्याचा आवाज ऐकू आला. चिमणीच्या उजेडात धूसरसं दिसत होतं. गावातले तिघेजण श्रीधरला उचलून आणीत होते. मंजूळ लगबगीने पुढे

गेली. “ काय झालं? ”

“ खूप प्यायला आहे वाटतं, चिंचेजवळ पडलेला होता. ”

मग त्यांनी मुकाट्यानेच श्रीधरला आणून चटईवर घातलं आणि ते निघून गेले.

इतके दिवस तो प्यायचा पण असा रस्त्यात कधीच पडला नव्हता. मंजूळला खूप वाईट वाटलं, शरमेने जीव मरायला टेकला. घेऊन आलेल्यांपैकी एकजण शाळामास्तर होता, त्याची बायको शिद्दरची. तो मंजूळला चांगलं ओळखायचा. कुठेही भेटल्यास आस्थेने चौकशी करायचा आणि मंजूळ- देखील भावोजी म्हणून त्याच्याशी मायेने वागायची.

दुसरे दिवशी श्रीधर दिवसभर झोपूनच राहिला, डोक्यावर पांघरूण घेऊन. मंजूळने परत परत उठवून जबरदस्तीने त्याला दोन घास जेवायला लावले. दिवसभर तो एक शब्दही बोलला नाही. कसल्या तरी खोल विचारात गढल्यासारखा तो गप्पच होता. नाही म्हणायला रात्री जेवून उठल्यावर तो म्हणाला, “ मला आता हा गाव नकोसा झालाय! ”

पण मंजूळने तिकडे लक्ष दिलं नाही. “ ह्याचं हे नेहमीचंच! ”

नेहमीप्रमाणे कोंबडा आरवल्यावर तिला जाग आली, पण गात्रात त्राण नव्हतं, उमेद नव्हती. ती तशीच बराच वेळ अंथरुणात पडून राहिली. नवरा मधल्या खोलीत झोपला होता. कानोसा घेतला तर त्याचा कुठेही जरासुद्धा आवाज नव्हता. तसा तो घोरत नव्हता पण झोपल्यावर ‘ गूं गूं ’ असा त्याच्या घशातून एका तालात आवाज यायचा. पण बाहेर तर सगळं शांत होतं.

ती हळूच उठली, दिवा लावून घेऊन बाहेर आली. बघते तर अंथरुणात तो नव्हताच. फक्त एक चटई अंथरलेली होती. अंगावरची कांबळ, अंथरलेली चादर तीही नव्हती. त्वरेने ती बाहेरच्या दरवाज्यापाशी आली. तो उघडा होता. तिने दिवा हातात घेऊन हाक मारली, “ कुठं आहेस तू? ” पण आवाज नव्हता. आता मात्र ती खरीच घाबरली. माडीवर झोपलेल्या सासऱ्याला तिने हाका मारून उठवलं. आत जाऊन सगळीकडे बारकाईने न्याहाळलं. पाहिलं तर मधल्या खोलीत त्याने एकावर एक असे रचून ठेवलेले तीन ट्रंक होते त्यातला एक छोटा नव्हता. खुंटीला अडकवलेले कपडे नव्हते. “ हा रात्रीच्या बोटीने कुठंतरी लांब गेला असावा! ”

घाईघाईने तिने सासऱ्याला बंदरावर पाठवलं. “ बाप्पा, बघ ना जाऊन तो कुठं गेला आहे ते. ”

बाप्पा उघड्या अंगानेच झिळमिळत्या उजेडात तसाच धडपडत

बंदराजवळ गेला. पण सकाळच्या प्रहरी ओहोटीच्या प्रवाहात आणि उलटा वारा शिडात भरून घेऊन जाणाऱ्या बोटी कधीच्या हुळगे पार करून गेल्या होत्या. आता त्या किन्नरजवळ पोचल्या होत्या. बंदराजवळ दोघे तिघे उभे होते. बाप्पाने विचारलं, " शिवा, माझ्या मुलाला बोटीत वगैरे चढलेला पाहिलास का तू ? "

" मघाशीच बाबाजानच्या बोटीत बसून निघून गेला ना तो. हातात एक ट्रंक होती. आज बोटी जरा लवकरच आल्या होत्या. ओहोटीमुळे सरसर पळाल्या त्या. "

बाप्पा मुकाट्याने परत आला. माजघरात गेला आणि तुटून पडल्यासारखा धप्पकन बसला. " बाप्पा, काही पत्ता लागला का ? "

" आधीच गेला तो बोटीत बसून. कुठच्या दिगंतराला निघून गेला आहे, देवाला माहीत ! आता आपल्या नशिबात नुसते भोग, कावेरी. नुसते भोग ! "

सासऱ्याचा मूळचा गोरा रंग आता तेज गेल्यासारखा काळवंडला होता. चेहऱ्यावरची कातडी कबुतराच्या पंखासारखी लोंबत होती. डोळे नेहमी रडून रडून थिजल्यासारखे लाल, सुजलेले. जबरदस्तीने स्वतःला ढकलून नेल्यासारखा सकाळपासून संध्याकाळपर्यंत तो कामात गुरफटून राहायचा. कधी कधी तोल गेल्यासारखं व्हायचं पण तो काम करायचं सोडीत नव्हता.

जिवाला मरणाचा घोर लागल्यासारखी मंजुळा हातपाय गाळून पडली होती. मधेच उठून मागीलदारी जायची, काळ्या नदीच्या प्रवाहाकडे दूरवर डोळे लावून बसायची. स्वयंपाक, जेवण, आंघोळ, धुणं-पुसणं तिने सगळं सोडलं होतं. सकाळी पेज करायची. हवी असल्यास कुणी ती पोटाच्या भुकेसाठी थोडी खावी. या दिवसांत शेजारच्या एका घरातली सुरेखा नावाची मुलगी रोज त्यांच्याकडे यायची. मंजुळाला ' मामी, मामी ' म्हणत मोठ्या मायेने तिच्या भोवती वावरायची. तिचा बाप फॉरेस्ट खात्यात लांब नोकरीला होता तेव्हा त्याने शाळेसाठी तिला मामाकडे ठेवली होती. आजी- आजोबाबरोबर ती राहायची. मंजूळच्या रमेशचा तिला खूप लळा लागला होता. ती सारखी सारखी येऊन त्याला उचलून घ्यायची. ह्या दिवसांत तो तिच्याचकडे असायचा.

श्रीधर गेल्यापासून दिवसांचा हिशेब चुकला होता. तो गेल्यानंतर पंधरा-वीस दिवसांनी एक दिवस तिला एकाएकी चक्कर आल्यासारखं झालं. सारखी सारखी चक्कर आल्याने डोकं जमिनीला टेकून झोपावं असंच वाटू लागलं. काळीज धडधडत होतं, काहीसुद्धा नकोसं वाटत होतं. वरून सारख्या

उलट्या. मंजूळला आधी वाटलं, इतके दिवस छातीवर काळजीचं, चिंतेचं ओझं असल्यामुळे जीव कासावीस झाला असेल. पण मग मात्र तिच्या लक्षात आलं, आपल्याला दिवस गेले आहेत!! हे आणखीन का म्हणून माझ्या पदरी टाकून गेला तो?

लग्नानंतर चार वर्षांनी मुलगा झाला होता. पण या वेळी लवकरच झालं, मुलगा दोनच वर्षांचा असताना. तिला मनापासून वाटत होतं, आता हे गरोदरपण नको होतं. शरीराने ती अगदी पोखरली होती, मनाने सैरभैर झाली होती. हे आपण पेलवूच शकणार नाही असं तिला वाटत हातं.

मुलाच्या वेळी तिला डोहाळ्यांचा मुळीच त्रास झाला नव्हता. आपल्याला दिवस गेले आहेत हे समजलं तेव्हा केवढी खूष झाली होती ती. तिला कसलाच त्रास जाणवला नव्हता. पण या वेळी तिची सगळी दैनाच झाली होती. भलत्या चिंता, डोहाळ्यांचा त्रास त्यात धड अन्न-पाणीही नाही. काही घेतलेलंही पोटात राहत नसे.

एक दिवस ती बैलांना गवत टाकायला म्हणून गेली तर तिथेच चक्कर येऊन पडली. जरा सावध झाली तेव्हा अंगात त्राणच नसल्याने ती तशीच पडून राहिली. त्या वाटेने मुका देवाप्पा येत होता त्याने तिला पाहिली. घशातून आवाज काढीत त्याने इतकी गडबड केली की बाजूला एक बाई परसाला पाणी घालीत होती ती धावतच आली. त्या दोघांनी मिळून तिला घरात नेली. त्या बाईने कुठूनतरी एक लिंबू आणून तिला थोडं सरबत करून दिलं आणि ती म्हणाली, ''तू आता इथं राहू नकोस. जिवाला बरं वाटेपर्यंत माहेरी जाऊन राहा.'' सासरा तिथेच उभा होता तो म्हणाला, ''हो, इथं कोण करणार तुझं? माहेरी जाऊन रहा काही दिवस.'' दुसरे दिवशी मुलाला घेऊन मंजूळ जायला तयार झाली तेव्हा म्हणाली, ''बाप्पा, मी येते.''

सासरा सद्‌गदित झाला. नातवाला जवळ घेऊन आसवं गाळीत रडला आणि म्हणाला, ''ह्याला नीट सांभाळ हं.''

पटकन मंजुळा म्हणाली, ''बाप्पा, मला सासूचं एक जरीचं लुगडं देतोस?''

मुकाट्याने करगोट्याची चावी काढून मंजुळाजवळ देत तो म्हणाला, ''ट्रंकेत आहेत, तुला पाहिजे ती काढून घे.''

विंचू हातात धरावा तशी ती चावी विचित्र वाटली तिला. पहिल्यांदाच तिने ती हातात घेतली होती. भीत भीतच तिने त्या खोलीचं दार उघडलं. काळोखात आतल्या पसाऱ्याची भूतं होऊन तिच्यासमोर उभी राहिली. एका

कोपऱ्यात लाल लुगडं नेसलेली, कपाळावरचं कुंकू ओघळलेली कुणी- तरी बाई उभी आहे असा भास झाला तिला. ती खोलीत न जाता तशीच त्वरेने परत आली नि म्हणाली, " बाप्पा, तूच काढून दे मला. "

सासऱ्याने जाऊन एकावर एक ठेवलेली पेटी खाली काढून आतलं एक लुगडं काढलं आणि मंजूळजवळ दिलं. जुनं, धुरकटलेलं ते लुगडं, पण मंजुळाला मौल्यवान वाटलं. तिने ते घाईघाईने गुंडाळून पिशवीत कोंबलं.

फाटक ओलांडून बाहेर पडताना तिला वाटलं, हा पांगारा जास्तच मातला आहे. त्याच्याजवळ लाल फुलांचे कितीतरी गुच्छ फुलले होते. फुलं झडून रस्त्यात पडली होती. ती तुडवीत ती बाहेर आली आणि माळाच्या बाजूने चालू लागली.

सासरा दारात उभा राहून पाहत होता. ही बंदरावर जायच्या ऐवजी इकडे माळाच्या बाजूने का जातेय ? " अग, कावेरी, कुठं चाललीस तू ? "

" सुमतीवैनीकडे जरा जाऊन येते. "

सासरा काहीच बोलला नाही. गप्प जाऊन आत बसला.

मंजूळ शेत, देऊळमाळ पार करून टेकडीच्या बाजूने चालू लागली. हातापायाच्या काड्या झाल्या होत्या, पाऊल टाकताना पाय कडकडत होते पण सगळी शक्ती एकवटून ती टेकडी चढत होती. या बाजूला आलेल्या वेळी बऱ्याच जणांनी तिला बोट दाखवून सांगितलं होतं, " ते बघ, तुझ्या नणदेचं घर. " पण तिच्या घरी ती पहिल्यांदाच जात होती. नणदेला तिच्या आईचं ते लुगडं द्यायचं होतं तिला. जमल्यास तिच्या भावाची हकीकत सांगून गळ्यात गळा घालून रडायचं होतं.

दोन-तीन पाग्यांची घर ओलांडून ती वर चढून आली आणि नणदेच्या घरासमोर येऊन उभी राहिली. घर बंद होतं. दार ओढून घेतलं होतं आणि दोन खुंटे तिरके लावून ठेवले होते. दारात, अंगणात, एखादं कुत्रं-मांजर- देखील नव्हतं. अंगणात वरच्या झाडांचा खूप पाचोळा पडला होता. एक पाग्यांची बाई आपल्या घरातून बाहेर आली आणि तिने सांगितलं, " तो कैगापलीकडे रान मारायच्या कामावर गेला आहे, जाताना बायको-मुलांनाही बरोबर घेऊन गेला आहे. "

" आधी इथंच काम करायचा ना तो ? "

" ती खाण कसलातरी तंटा होऊन बंद पडली आहे. "

मंजूळ मुलाला कडेवर घेऊन टेकडी उतरू लागली. पाठीमागून ती बाई म्हणत होती, " म्हाळूमामाची सून ना ग तू ? सुमती खूप आठवण काढायची

तुझी. आपली वैनी खूप चांगली आहे म्हणत होती.''

मंजुळाला अगदीच नाळ तुटल्यासारखं वाटत होतं. सात वर्षं झाली माझं लग्न होऊन. या नणदेकरता काहीसुद्धा केलं नाही मी. माझ्याच जखमांवर फुंकर घालीत राहिले. आता तर सगळ्याच वाटा बंद झाल्या आहेत!

नदी पार करून शिद्दरला येईपर्यंत दिवस माथ्यावर पोचला होता. उन्हाच्या रखरखाने जीव होरपळत होता. मधे मधे सावलीत बसत, पुन्हा उठत ती कशीबशी एकदाची येऊन पोचली.

सुमन न्हाणीघरात विस्तव घालीत होती. बायला बघून ती धावतच आली. मुलाला घेऊन बायला धरून ती घरात आली. बायची दशा बघून तिचा जीव गलबलून गेला. ''बरं नाही का ग तुला, बाय?''

''हो ग, बायूल, मला बरं नाही.''

''काय झालं ग?''

''आपा कसा आहे?''

''रात्रंदिवस शेतात नाहीतर बांधावर असतो. घरात आला तरी गप्प बसून राहतो. पूर्वीसारखा बडबडत मात्र नाही.''

''बायूल, मला जरा चटई घालून दे, मी पडते.'' मंजूळ घरात आली आणि गप्प पडून राहिली.

''बाय, काय होतं ग तुला?''

''काही नाही ग.''

''भावोजी न सांगताच गेला म्हणे?''

झटकन मान वर करून मंजुळाने विचारलं, ''कुणी सांगितलं तुला?''

''इथं सगळ्यांनाच माहीत आहे, बाय!''

मंजुळाचं काळीज तुटल्यासारखं झालं. तिचं दुःख चेहऱ्यावर पसरलं. प्राण गेल्यासारखी ती निपचित पडून राहिली.

बऱ्याच वेळानंतर आपा आला. एखाद्या ब्रहिऱ्या माणसाला सांगावं तसं सुमनने मोठ्याने ओरडून सांगितलं, ''बाय आली आहे, आपा.''

आपा खरंच मंजुळासमोर येऊन उभा राहिला, एकटक तिला बघत. पण चेहरा खरखरीत कोरडा. वाचासुद्धा जणू कुणीतरी आतल्या आत ओढून घेतली होती. असहाय, ओल्या नजरेने मंजुळा आपाला बघत होती, ''बायूल, बघ ना ग, आपा कसा बघतो मला!''

अचानक आपाच्या दोन्ही डोळ्यांतून झरझर धारा वाहू लागल्या. तो तसाच बाहेर आला आणि ओसरीवर बसून बडबडायला लागला. ''ही शंभर

नारळांची पेंडी. फोडलेल्या प्रत्येक नारळात भळभळीत रक्त, पाणी नाहीच. आता लोकांनी घशात काय घालायचं?...''

आपा बोलतो ते ऐकून सुमन लगबगीने बाहेर आली. ''पाहिलंस ना, बाय, सहा महिने झाले, एक शब्दसुद्धा बोलला नव्हता हा. बोलायला लागला तर तेसुद्धा पूर्वीसारखंच वेडपणाचं.''

मंजुळा मात्र तशीच निमूटपणे पडून राहिली...

श्रीधरला जाऊन सहा महिने होत आले पण त्याची एवढी बोटभर चिठीदेखील कुणाला आली नव्हती. वस्तीतला कुणीही हुळग्याला जाणारा असेल तर मंजूळ त्याला आपल्या घरी जाऊन जरा चौकशी करून यायला सांगायची. पण त्याची काहीच बातमी समजत नव्हती. दिवसाचे दिवस ती तशीच लांब डोळे लावून बसून राहायची. रोज संध्याकाळ झाली की तिच्यावर दुःखाचा, काळजीचा डोंगर पडल्यासारखं होई. धड जेवत नव्हती की खात नव्हती. सतत चिंता आणि प्रतीक्षा!

तिला आता सातवा महिना लागला होता. हातापायांच्या काड्या झाल्या होत्या आणि नुसतं पोट तेवढं दिसत होतं. तिला बघून बायका म्हणायच्या, ''हिच्यात जरासुद्धा शक्ती नाही, बाळंतपणाच्या वेदना कशा सहन करणार ही?''

महिनाभर माहेरी राहून बरं वाटलं की परत जायचं ह्या हेतूने ती आली होती. पण दिवसेंदिवस ती कापरासारखी जळत चालली होती. जीव थकत, भागत चालला होता. घरातून बाहेर पडायची शक्ती आणि इच्छासुद्धा मेली होती. मुलगा नसता तर ती कधीच जमिनीला लागली असती. त्याच्या- करता जीव वरखाली व्हायचा. पोटातल्या जिवाविषयी तिला जरासुद्धा उत्सुकता नव्हती.

एकटी सुमन मात्र कणखर होती. ती आपाचं, बायचं सगळं व्यवस्थित करीत होती. बायला बळेच उठवून आंघोळ करायला, जेवायला लावायची. आपाचा हात धरून भाताचे चार घास भरवायची, जेव म्हणून सांगायची. तो वेडाच झाला होता खरा पण शेताची कामे अवेळी, अर्धवट, वेडीवाकडी कशीतरी करायचा. न चुकता बैलांना चारा-पाणी द्यायचा. त्याची स्मरणशक्ती हरवली होती का काळजाची हुडी हरवली हाती काहीच कळत नव्हतं. पण बायच्या अवस्थेपासून तो लांब पळायचा एवढं मात्र खरं.

''बायूल, आपाला आपण जोशी-भगत, औषध-पाणी काहीतरी करायला

हवं ग. वर्ष होऊन गेलं तरी हा थाऱ्यावर नाही आणि आपण गप्पच आहोत. ''

" तेच सांगायचं होतं तुला, बाय. भिकूअण्णा किती दिवसांपासून सांगतो आहे. गोपतिठ्यावरच्या रानात एक कुणबी आहे म्हणे. तो वेड बरं करतो म्हणे. त्याचा आरडाओरडा ऐकून भुतं-खेतं असल्यास पळून जात म्हणे. ''

" कोण बोलावून आणेल त्याला ? ''

" बघते, विश्रामदादाला वगैरे सांगून. ''

विश्राम आणि पंढरी रानात जाऊन त्या मांत्रिकाला बोलावून घेऊन आले. अमावास्येच्या आधल्या दिवशी दिवेलागणीच्या सुमारास तो अंगणात येऊन बसला. तो चांगलाच काळा-कभिन्न आणि उंच होता. त्याच्या भुवया दाट होत्या त्यामुळे त्याचे डोळे झाकले जायचे. त्याच्या हातात एक लांब वेताची छडी होती. त्याने कमरेला एक आडवा पंचा गुंडाळला होता आणि डोक्याला लाल रुमाल बांधला होता. बाकी सगळं अंग उघडंच होतं. खांद्यावर ठेवलेल्या कांबळीच्या घडीत त्याने काही वस्तू भरून आणल्या होत्या. तो आल्याचं कळताच वस्तीतले काही पुरुष अंगणात येऊन उभे राहिले.

" उशीर केलास, मामा. ''

" हे काम 'देवाचारा'चं. रात्र पडल्यावर. सगळी भुतं, समंध वगैरे उचंबळ होतात, मानगुटीला धरून पकडता येतं. ''

लोकांनी मोठ्या श्रद्धेने त्याच्याकडे पाहिलं.

समोरच्या फणसाच्या झाडाखाली त्याने झाडून घेतलं आणि जागा तयार केली. कांबळीच्या झोळीतून भयंकर चेहऱ्याच्या चार बाहुल्या बाहेर काढल्या आणि चारी दिशांना उभ्या केल्या. त्यांच्यावर कुंकू शिंपडलं. मधे मोठा जाळ केला. तिथं एक बोणकी फणस ठेवला. त्या फणसाला मोठमोठे डोळे होते आणि त्या विस्तवाच्या उजेडात ते खरंच बघताहेत असं वाटत होतं. मांत्रिकाने आधीच सांगितल्याप्रमाणे पंढरीने एक मोठा कोंबडा आणून ठेवला होता. तो त्याने विस्तवाजवळ खड्डा खणून मानेपर्यंत पुरला. त्याचा गळा आणि तुरा तेवढाच दिसत होता. मांत्रिक तिथे पाट घेऊन बसला आणि त्याने गणेशला आण म्हणून फर्मावलं. दोघा-तिघांनी धरून गणेशला आणून त्याच्यासमोर बसवलं. तो खुरमांडी घालून लहान मुलासारखा टुकूटुकू बघत तिथे बसला.

पाटावर त्या मांत्रिकाने कसल्यातरी बिया ठेवल्या होत्या. त्या एका हाताने घोळवीत त्याने कुदायला सुरुवात केली. मधेच तो त्या बिया मुठीत घेऊन आगीत टाकीत होता आणि त्या बिया फुटताना फटफट असा मोठा

आवाज होत होता.

मांत्रिक कुदत होता तसा अचानकपणे गणेशही कुदू लागला, ' शो, शो ' करीत डोकं फिरवू लागला. मांत्रिक दरडावून ओरडला, " बघितलंस ना गावाच्या बुजुर्गा, कुडीत लपून बसलेल्या समंधाला मी आता टोचलं आहे, आता त्याला ही कूड सोडून सात सीमांच्या पलीकडे पळवणार आहे मी. बाटलीत भरून सात समुद्रांत नेऊन बुडवणार आहे. " मग तो काही वेळ बिया घोळवीत कुदत राहिला. मधेच ओरडायचा, " गावातला कुणी बुजुर्ग असल्यास समोर ये. "

विष्णूने रामदासला उठवून पुढे पाठवलं. मांत्रिक बोलू लागला, " जावई बसला आहे त्याच्या मानगुटीवर. "

" कोण, कुठला जावई ? "

" अरे, विसरलात का तुम्ही ती दुर्घटना ? बारा वर्षं झाली, ह्या गावचा एक जावई– आई-वडील नसलेला पोर– आषाढी अमावास्येला बायकोला न्यायला म्हणून हणकोणहून नदी पार करून आला होता. सासऱ्याने त्याला शिव्या देऊन, मारून, बदडून हाकललं. मग तसाच जाऊन त्याने नदीच्या काठावरल्या झाडाला टांगून घेतलं. "

" हो, हो माहीत आहे, त्याची बायको अजूनही डोकं आपटीत बसली आहे. "

" जावयाला अजून मुक्ती नाही, समंध होऊन तो ह्या परिसरात फिरतो आहे. "

" आपणच त्याचा बंदोबस्त करावा. "

त्यासरशी तो उठला, ' शो, शो ' करीत गणेशच्या भोवती एक फेरा घातला, त्याचे केस धरून जोरात हलवले, त्याला मातीत आडवा घालून लोळवलं; पुन्हा त्याला उठवून बसवीत आरडा-ओरडा करीत धमकावलं, " बऱ्या बोलाने सोडून जा ही कूड, आत्ताच्या आत्ता, नाहीतर चपलेने हाणीन, छडीने फोडून काढीन, समुद्रात नेऊन बुडवून मारीन. " हातातली छडी नाचवीत तो गणेशचे केस धरून हलवीत होता.

गणेश शुद्धीत नसल्यासारखा कुदत होता. आणि रडल्यासारखा तोंडातल्या तोंडातच काहीतरी बोलत होता. वस्तीतले बायका-पुरुष बाजूला उभे होते. सुमनही तिथं होती. मंजुळाला मात्र लोकांनी जवळ येऊ दिलं नाही. गरोदर बाईने अशा वेळी जवळ जायचं नसतं म्हणून तिला सांगितलं.

मांत्रिक अंगात आल्यासारखा गणेशच्या भोवती नाचत होता,

त्याच्यावरच्या समंधाला बोंबलत दरडावीत होता, त्याला जमिनीवर लोळवीत होता, " सोडून जा ही कूड, तुला नासाची आण, बम्र्याची आण, क्षेत्रपाळाची आण. "

अचानक त्याने हातातली छडी वाऱ्यावर हेलकावली आणि रप्दिशी गणेशच्या पाठीवर ओढली. तशीच दुसरी पायावर. सुमन 'आपा' म्हणत पुढे आली. " रामदादा, बघ ना, तो आपाला कसं मारतो ! "

मांत्रिकाने तसाच फेरा घालत, ओरडत पुन्हा छडी उचलली. सुमन धावत त्याच्याजवळ गेली आणि तिने ती छडी घट्ट पकडली. मांत्रिकावरचा अवसर एकदम उतरला. त्याने रागानेच सुमनकडे पाहिलं.

" मी नाही देणार आपाला असं मारायला ! "

रामदादाने घाईघाईने पुढे येत म्हटलं, " अग, त्या छड्या समंधाला बसतात, आपाच्या अंगाला नाही लागत त्या. "

" असू दे. पण मी कशीच देणार नाही मारायला ! "

काही वेळ अवाक् होऊन उभा असलेला मांत्रिक आता रागातच ओरडला, " हिने देवाकडचं सारं भ्रष्ट केलं आहे. इथं येऊन माझ्या देवाकडच्या छडीला हात घालतेस ? हा समंध आता तुझ्यावर बसल्याशिवाय राहणार नाही. तुझ्या छातीवर बसून तुझं नरडं दाबणार आहे तो. "

विश्रामने पुढे येत म्हटलं, " रागावू नका मामा, पोरच आहे ती. तुम्ही तुमचं काम चालू ठेवा. "

" ह्या नतद्रष्ट कार्टीने आमच्या सात पिढ्यांच्या देवपणाची मस्करी केली आहे. मी आता इथं मुळीच थांबणार नाही. हा समंध आता कायमचा तुम्हाला खात राहील. "

त्याने आपल्या सगळ्या जिनसा एकत्र केल्या आणि कांबळीच्या घडीत घातल्या. पुरलेला तो कोंबडा तसाच ठेवून तो जायला निघाला. कुणीच त्याला अडवलं नाही. गोळा झालेले सगळे लोकही हळूहळू मुकाट्यानेच परत गेले. जाता जाता आवडूआजी मात्र तणतणली, " या दळभद्रीच्या काय अंगात आलं आहे ? तो मांत्रिक चांगला समंध वगैरे काढून टाकणार असता. आता काही खरं नाही. बस म्हणावं त्या वेड्या बापाला तसाच घेऊन, समंध डोक्यावर बसलेल्या स्थितीत ! "

सुमनने आणि गोविंदने मिळून आपाला घरात आणलं. मंजूळ मधल्या दारात राहून सगळं ऐकत होती, तिला सगळं समजत होतं. ती लगबगीने पुढे आली आणि तिने आपाला चाचपून पाहिलं. त्याच्या अंगावर छडीचे तीन

वळ उठले होते. रक्त गोठलेले ते काळे वळ गोऱ्या अंगावर उठून दिसत होते. बघून मंजूळ कळवळली, "कसला ग बाई, हा मांत्रिक? मांत्रिक का राक्षस?"

गोविंद म्हणाला, "कळलं ना मंजूळताई, सुमन नसती तर त्याने मामाला फोडून काढलं असतं. त्या छड्या मामाला नव्हे समंधाला बसतात म्हणे! मग हे वळ कुठून आले?"

तो जमिनीत पुरलेला कोंबडा रात्रभर "कों कों" करून ओरडत होता. सगळे जण दचकून ऐकत होते, कुणालाच तिथं जायचा धीर होत नव्हता. सगळे जण आपापल्या घरात कुजबुजत होते, "आता तर त्या समंधाला जास्तच चाळवलं आहे!"

सकाळच्या प्रहरी त्या कोंबड्याचं ओरडणं थांबलं. सुमन सकाळी उठून हळूच तिकडे गेली. पाहतो तर कोंबडा मरून पडलेला. तिने इकडे तिकडे पाहिलं, कुणी नाहीसं बघून कोंबड्याची मानगूट पकडली नि त्याला उपटला आणि नेऊन वईच्या बाहेर झुडपामधे टाकला.

मंजुळा स्वतः तीन दिवस रडल्यासारखी कण्हत होती. ऊठ, बस, झोप सारखं चालू होतं. गुडघ्याला धरून उठायची पण उठून बसायची शक्ती नव्हती. तिसरे दिवशी तिने बायूलाला सांगितलं, "बायूल, जास्तच झालं आहे, संध्याकाळपर्यंत होईन. तू कुणाला तरी पाठवून सुईणीला बोलावून घे."

सांगावा मिळाल्यावर शेवंतू हातात आपली पिशवी घेऊन धावत आली. मंजूळला बघून तिला धक्काच बसल्यासारखं झालं. तिने म्हटलं, "हिची ताकद पुरेशी असेल?"

आपल्या कुशल हातांनी ती शेक, पूस करू लागली. पोटाला तेल लावताना ती आतल्या बाळाला म्हणत होती, "ये तू, सरक असा हं. डोकं असं घे. पाय नीट सोड. मस्ती नको हं तुझी. कुठंही रुसून अडून थांबायचं नाही. तुझ्या आईत तीळभरही त्राण नाही."

शेवंतू सुईण अंगाने काहीशी पसरट, घाणेरडीच दिसत होती. हात बोटं घट्ट, खरखरखीत. पण होती अतिशय कुशल. बोलायची पण पुष्कळ. म्हणायची, "या हातांनी नाळ कापलेलं एकही मूल गेलेलं नाही."

"त्या शांबाचा मुलगा महिन्याच्या आतच गेला ना ग?"

"ती माझी चूक नव्हती हं. त्याच्या बायकोने पंधरा दिवस व्हायच्या आत ताटभर अळूची भाजी खाल्ली. दुधातून थंडी पोटात उतरली आणि सदीनेच

मूल गेलं.''

तीन दिवस कुंथत, कण्हत, दात चावून रडत मंजूळने मुलीला जन्म दिला. मणभर ओझं डोक्यावरून उतरल्यासारखी ती बाळंत झाली आणि मुलीकडे पाठ करून प्राण गेल्यासारखी झोपली.

बाळंतीण झाली आणि दिवसेंदिवस तिचा जीव क्षीण होत गेला. कातडी पांढरी फिकट होऊन हाडांना चिकटली होती. अंगात त्राणच नव्हतं. मूल प्यायला जायचं आणि कोरडा स्तन ओढून ओढून थकल्यावर रडायला लागायचं.

सुमनची तर पार त्रेधातिरपीट उडत होती. आपा तसा झाल्याने तिने विठोबाची मनधरणी करून शेत नांगरून, पेरून घेतलं. शेता-भाटाचं काम, बायचं, आपाचं, मुलांचं करायचं. यात ती दिवसभर एवढी गुंतलेली असायची की रात्र होईपर्यंत ती झोपेने घेरलेली असायची. स्वतःच्या देहाचं तिला भानच नसायचं. देखभाल सोडली होती. तरुण मुलगी ती पण सतरा डाग आणि ठिगळं असलेले कपडे घालून दिवसभर कामात असायची. जणू ती स्वतःचं अस्तित्वच विसरली होती. त्यातच बायची काळजी, इतकी काळजी की तिचा जीव अर्धा झाला होता.

गोविंद मधेच यायचा, ''ताई, तुला बरं नाही का ग?'' म्हणत अंथरुणाजवळ येऊन बसायचा.

''बरं आहे रे, काही नाही व्हायचं मला.''

पण दरवेळी आल्यावर तो विचारायचाच, ''ताई, बरं नाही का ग तुला?''

गोविंद आला की घराला खरंच जाग आल्यासारखं व्हायचं, सुमनच्या डोळ्यांत चैतन्य भरल्यासारखं व्हायचं. पण जीविताविषयीची वासनाच उडाल्यासारखी ती वावरायची. गोविंदला कधी कधी राग यायचा. ''केसांना एखादी रिबन बांधायला काय होतंय हिला?''

पण कधी कधी त्याला वाटायचं, या मलीन अंगाच्या सुमनला असंच मिठीत घ्यावं, छळल्यासारखं धरून मुरडावं. किती काळापासूनची त्याची ही इच्छा! पण सुमन तर कामाच्या रहाटगाडग्याला बांधल्यासारखी थंडपणे वावरायची.

''बाय, काय होतंय ग तुला?''

''रडू नकोस ग, बायूल. तूच असे हातपाय गाळलेस तर कसं व्हायचं? पोरं कुठं आहेत बघ.''

“ ही काय इथंच आहेत.”

मोठ्या कष्टाने मान फिरवून मंजुळाने मुलांकडे पाहिलं. धाकटी एक महिन्याची मुलगी फडक्यात गुंडाळून ठेवल्यासारखी गोधडीवर झोपली होती. तीन वर्षांचा रमेश गंभीर चेहऱ्याने भिंतीला टेकून गप्प बसला होता. जणू त्याला कळत होतं की, आपल्या आईची ऊब आता हळूहळू आपल्याला दुरावत चालली आहे. मायेच्या उमाळ्याने पण असहाय नजरेने मंजूळने एकवार आपल्या मुलाकडे पाहिलं. खूप दुखत असल्यासारखं तिच्या चेहऱ्यावरच्या शिरा हलल्या. डोळे पाझरू लागले पण डोळे इतके खोल खड्ड्यात गेले होते की आसवं तिथंच साचल्यासारखी झाली. हळूहळू तिला चक्कर येत राहिली. मान टाकून ती तशीच पडून राहिली. सुमन “ बाय ” म्हणून किंचाळली. शेजारच्या गोकुळमावशी, सुमित्रामावशी धावत आल्या. कुणीतरी जाऊन साळूआजीला बोलावून आणलं. तिने त्वरेने कसले कसले इलाज केले, शेकलं, भाजलं, अंगाला औषध चोळलं. मग ती थोडीशी सावध झाली.

गरोदरपणापासूनच ती एवढा एवढासा जीव घेऊन जगत होती. एवढीशी सुद्धा ताकद नसताना तिने बाळंतपणाच्या कळा कशा सोसल्या, तिची सुटका कशी झाली ते एक आश्चर्यच होतं. शेवंतू सुईण तर सारखी म्हणत होती, “ तुम्ही तिला कारवारला न्यायच्या ऐवजी इथंच घेऊन बसला आहात, तिला आता देवानेच तारावं.”

पण दवाखान्याचं, डॉक्टरचं नाव काढलं की मंजुळा अगदी हात हलवून नको म्हणायची.

गणेश बाहेर ओसरीवर बसून फाटक्या कांबळीचे धागे सोडून त्यांची गुंडाळी करीत होता. सुमनने बाहेर येऊन त्याला सांगितलं, “ आपा, बायचं जास्त झालं आहे.”

“ मी तेव्हाच सांगितलं होतं, मला एक दीड वाव दोरी आणून द्या म्हणून. होडीवर बसून छान लाल पीतांबर नेसून आलेला तो कुठं दडी मारून बसला आहे...”

सुमनला संताप आला, “ सगळ्यांना खाऊन टाकणारं वेड आहे हे. तू वेड पांघरून गप्प बस, आम्हीच जातो मरून.”

संध्याकाळ होत आली. मंजूळचं जास्त झालं आहे म्हणून समजल्यावर पुरुषमंडळी बाहेर येऊन बसली होती. भास्करअण्णा सहसा कुणाकडे जाणारा नव्हे पण तोही येऊन बसला होता. पुरुष मधेमधे आत जाऊन मंजूळची विचारपूस करून येत होते पण ती थाऱ्यावर नव्हती. श्वास अडखळत होता आणि घशातून

घर्र घर्र आवाज येत होता. शुद्धीवर आहे की नाही तेही कळत नव्हतं. मधेच एक हात वर उचलायची, मग तो तसाच सोडून दिल्यावर खाली आपटायचा.

पुरुष चिंताग्रस्त होऊन बसले होते. "कसला दळभद्रा गाव आहे हा! सकाळी एकदा लाँच आणि होडी बंदर पार करून गेली की दिवसभर कोणतंच वाहन नाही. एष्टी येणार येणार म्हणतात पण किती वर्षं लोटली तरी पत्ता नाही."

"हळग्याला जाऊन डॉक्टरला बोलावून आणायचं का?"

"इतकी आजारी आहे ती, आता तो येऊन काय करणार? एकाच रात्रीची गोष्ट. उद्या सकाळच्या लाँचने नेऊ तिला कारवारला."

"हळग्याचा डॉक्टर तरी कुठं इतक्या रात्रीचा येणार आहे?"

"रात्रीचा आता बाहेर पडत नाही म्हणे तो."

रात्रभर मंजुळाचा श्वास चालू होता. वस्तीतल्या बायकांपैकी सतत कुणी ना कुणी जवळ बसत होत्या.

सकाळच्या प्रहरी मात्र जवळ कुणी नव्हतं. बायच्या उशीजवळ डोकं वाकवून सुमन पेंगत होती. चिमणीचा एक दिवा जळत होता तो आता इतका बारीक होत आला होता की त्याचा तांबडसर उजेड काळोखाला भेगा पाडल्यासारखा पसरला होता. बाहेर सगळं शांत होतं. मंजुळाने मोठ्या कष्टाने आपला हात वर उचलला आणि सुमनच्या डोक्याला टेकवला. ती जागी झाली, "काय ग बाय?"

खोल आवाजात तिने विचारलं, "मुलं कुठं आहेत? त्यांना आण." मग तिने आपली कूस मोकळी केल्यासारखं केलं.

सुमनने पलीकडे झोपलेल्या रमेशला आणून तिच्या कुशीत ठेवला. मुलीला मात्र ती आपल्याच अंगावर घेऊन बसली.

"बायूल, मुलांना तुझ्या पदरात टाकते, संभाळ त्यांना. पण तुझं..." तिने सुस्कारा सोडला. गालांवरून आसवं वाहू लागली.

"बाय, तू बरी होशील ग!"

मंजुळाने तिचा हात हातात घेतला. "वचन दे मला, मुलांना अंतर देणार नाही म्हणून सांग!"

सुमनला वाटलं, बायचा आवाज काहीसा प्रखर झाला आहे. ती घाबरली, म्हणाली, "मी वचन देते बाय, मुलांना मी अंतर देणार नाही."

खूप थकल्यासारखा मंजुळाचा जीव हरपू लागला, चक्कर आल्यासारखी ती पडून राहिली.

अतीव दुःखाने आणि करुणेने सुमनने एकवार बायकडे आणि मुलांकडे पाहिले. क्षणभर तिला वाटलं. बायच्या जागी आपणच झोपलो आहो, आपलाच जीव खोल खोल तळाला लागतो आहे. आता कोणीतरी येईल आणि आम्हा सगळ्यांना काळोख्या पोकळीत ढकलून देईल कायमचं !

सकाळी पुरुष मंडळी तिला कारवारला न्यायच्या तयारीला लागले. बंदरावर जायचं म्हणजे सुद्धा दोन मैलांची वाट. न्यायची कशी ? पिणग्यात बसवून न्यायची असं ठरलं आणि ते त्या तयारीला लागले.

कितीतरी वेळ मंजुळाच्या घशातून " सूं सूं " असा श्वास फिरल्यासारखा आवाज येत होता. " बाय, मंजूळ " म्हणून हाक मारल्यावर डोळ्यांची नुसतीच उघडझाप व्हायची. हळूहळू तिचा श्वास आणखी खोल जाऊ लागला. डोळेसुद्धा उघडायचं त्राण हरपलं. सुमन मात्र सारखी ' बाय, बाय ' म्हणून हाका मारीत होती.

डोलीची तयारी करून तिला उचलून बसवायला म्हणून पुढे आले तर तिची मान लवंडलेली आणि ती घट्ट लाकूड झालेली ! सगळे थिजल्यासारखे तिथंच उभे राहिले. सुमनने आकाश भेदून टाकणारी एक दिगंत, खोल किंचाळी मारली. ती किंचाळी झावळांतून, फांद्यांतून शिरत शिरत, शेतांतून, उसाच्या मळ्यांतून फिरत नदीच्या लाटांपर्यंत पोचली. क्षणभर सगळं हलल्यासारखं झालं.

अवघी वस्ती घरात, अंगणात गोळा झाली. " महिना झाला, पोर अंथरुणावर पडून होती. औषध, पाणी म्हटलं की नकोच म्हणायची. "

" बाळंतपणामुळे अशी झाली आहे, असं वाटलं. इतक्या लवकर जाईल असं कुणाला वाटलं नव्हतं. "

" दोन अजाण पोरांना टाकून गेली. मुलगी तर महिन्याचा जीव. त्यातून बापाची तीं तऱ्हा. "

गेल्या तीन महिन्यात गणेश असून नसल्यासारखाच झाला होता. शेता-भाटाचं कामही त्याने सोडलं होतं. दिवसाचे दिवस मुकाट्याने माजघरात बसून राहायचा. मध्येच तोंडातल्या तोंडात काहीतरी बडबडायचा.

वस्तीतला एकूण एक माणूस अंगणात, माजघरात येऊन बसला होता. या मातीत त्यांच्या डोळ्यांसमोर ती लहानाची मोठी झाली. तिला आमच्याच हातांनी अग्नी द्यायची पाळी यावी ? कुणालाही कसलीच इच्छा नव्हती. प्रत्येक जण या मुलीशी कोणत्या ना कोणत्या नात्याने बांधलेला होता.

खुशालीला आठवत होतं, बिचारीला लहानपणी फुलांची खूप हौस होती.

छोट्या बहिणीला कडेवर घेऊन, बकुळीच्या, सुरंगीच्या झाडांभोवती फिरायची, झाडा-झुडपांत घुसायची. एकदा दुपारी वस्तीच्या बाजूलाच असलेल्या सुरंगीच्या झाडाखाली फुलं गोळा करीत होती. फ्रॉकची ओटी भरलेली होती. खुशालीने उगाचच दम भरला. ''दुपारच्या प्रहरी झाडांतून हिंडतेस? भटकभवानी कुठची!'' फुलांची ओटी तशीच सोडून ती रडू लागली. मग खुशालीने पुढे जाऊन सगळी फुलं पुन्हा तिच्या ओटीत घातली व बहिणीला उचलून कडेवर दिली.

''...पोरीच्या शब्दात किती गोडवा! अण्णा म्हणून हाक मारली तर चेहऱ्यावर कळी फुलल्यासारखं व्हायचं. ओढच लागायची तिची. केवढी सहनशील, केवढी प्रेमळ! काल परवाच लग्न होऊन गेली आहे असं वाटतं.''

लग्न होऊन सासरी निघायच्या वेळी पोचवायला सारा गाव लोटला होता. प्रत्येक जण हुंदके देत होता. नऊवारी शालूतली ती एवढीशी नवरी अजून डोळ्यांसमोर येते.... नवऱ्याला दारूचं व्यसन. तो घर सोडून गेल्यावर ती पार गळून गेली. जगण्यावरची वांछाच गेली पोरीची! नेहमी बंदराच्या वाटेकडे डोळे लावून बसलेली असायची!

सुमन डोकं आपटून रड रड रडली आणि एकाएकी तिची शिळा झाली. मुकाट्याने ती गप्प बसली होती आणि खोल काळोखात बघत होती. मधेच गोविंद आहे– नाहीसा दिसायचा. बाय तर अनोळख्या काळ्या किरणांवर बसून दूर दूर जात होती. ''बाय, माझी स्वप्नं घेऊन कुठं चाललीस ग?.. बघ ना, तुझी अजाण बाळं दुधाला तहानलेली आहेत, पापा घ्यायला आसुसलेली आहेत! कोण भरवणार म्हणून थांबली आहेत! मला तुझ्यासारखं आई होता येणार नाही ग!''

बायका आत येऊन मंजुळाला नवीन साडी-पोलका नेसवीत होत्या. सुमन मेलेल्या नजरेने बघत होती... कुठं नेता आहात ग तुम्ही माझ्या बायला, माझ्या आईला...!

मंजुळा गेल्याचं कळताच वरच्या वाड्यावरून, देऊळवाड्यावरून कोण कोण आले. त्यात मुकुंदमामा पण होता. सुमन मुकुंदमामाला मिठी मारून खूप रडली.

विष्णू आणि नरसिंह शास्त्र, वेळ-काळ वगैरे विचारायला जोश्याकडे गेले होते, त्यांनी येताना मर्तिकाचं सारं सामान आणलं.

ते आल्यावर पुरुष मंडळी त्यांच्याजवळ गोळा झाली. नरसिंहाने सांगितलं, ''वेळ, काळ, नक्षत्र सगळं चांगलं आहे, पण माहेरवाशीण मुलीला

माहेरी अग्नी देता येत नाही. तिच्या नवऱ्याच्या गावाच्या सीमेच्या आत द्यायला हवा. तिच्या मुलाला अजून तीन वर्षं नाही झाली, दीड महिना कमी आहे म्हणे. त्याला अग्नी द्यायला स्मशानात नेता येणार नाही. ''

ते ऐकल्यावर वडीलधारी मंडळी पेचात पडली. रामदादा, गणपत आजोबा, भास्करअण्णा ह्यांच्यात चर्चा होऊ लागली.

रामदादा म्हणाला, '' आम्ही प्रेत नेऊन तिच्या नवऱ्याच्या घरी पोचवून येऊ. त्यांना हवं तसं करू दे. ''

खुशाली एकदम चिडून म्हणाला, '' बेवारशासारखं आपण तिचं प्रेत नवऱ्याच्या अंगणात टाकून यायचं? नाही, त्यांना सांगून पाठवा. हवं तर येऊन प्रेत नेऊ द्या. नाहीतर आमच्या मुलीला आम्ही आपल्या हातांनी अग्नी देऊ! ''

गणपतआजोबा पण म्हणाला, '' आधी त्यांना निरोप पाठवू मग बघू काय करायचं ते. ''

'' पण शास्त्रात बसत नाही ते, खुशाली. ''

'' शास्त्र गेलं चुलीत. ''

गणपतआजोबा पण म्हणाला, '' आधी त्यांना निरोप पाठवू, मग बघू काय करायचं ते. ''

पंढरी आणि यशवंत उघड्या डोक्यानेच हुळग्याला गेले. साऱ्या वाटेत ते गप्पच होते. साऱ्या परिसरावरचं दुःखाची एक मुकी छाया पसरली आहे असंच त्यांना राहून राहून वाटत होतं. नावाड्याने काहीही न बोलता होडी काढली आणि ती थेट हुळग्याला म्हाळूच्या घराखाली नेऊन लावली. ते उतरून जाताना नावाडी म्हणाला, '' तो आता माणसातल्या स्थितीत नाही आहे. जाऊन या तुम्ही. ''

मग तो स्वतःशीच बोलू लागला, '' पोर होडीत बसली की जणू देवी बसल्यासारखी वाटायची. लग्न झाल्यावर मीच जोडप्याला नदी पार करून आणलं होतं. ''

मंजुळाच्या सासऱ्याच्या घरी ते पोचले तेव्हा सगळं शांत होतं. दार उघडंच होतं आणि सगळेच निघून गेल्यासारखं थंड वातावरण, रिकामं, रिकामं. बागेतल्या केळीच्या झाडाखाली मोकाट सोडलेली गुरं पानं ओढून खात होती. त्यांनी तो केळीचा खांब तुडवून मातीत बरबटून टाकला होता. अंगण धुळीने आणि कचऱ्याने भरलं होतं. पावसाने कोसळलेली तुळस अजून तशीच पडली होती.

पंढरीने दारात जाऊन हाक मारली, '' घरात कोण आहे का? '' उत्तर

नाही. दार वाजवत त्याने पुन्हा हाक मारली, " घरात कुणी आहे का ? "

आतून कुठूनतरी खोल भुयारातून आल्यासारखा, त्रासलेला आवाज आला, " कोण आहे तिकडे ? कुणाचा जीव चालला आहे ? "

" आम्ही शिद्दरहून आलो आहोत. जरा बाहेर या. "

बराच वेळ कण्हल्याचा आवाज आला. मग म्हाळू लडखडत बाहेर आला. उंच, तगडा, माणूस थकून, पोखरून गेला होता. आजारी असल्या-सारखा तो कण्हत होता.

" बरं नाही का तुम्हाला ? "

" आता आणि कसलं आलं आहे बरं पण. आता मरणच काय झालं, कशाला आला आहात तुम्ही ? मला माहीत आहे, कसलीतरी वाईट बातमी घेऊन आला आहात. नाहीतर शिद्दरहून कशाला याल ? "

" हो, तुमची सून... मंजूळ... सहा महिने अंथरुणातच होती म्हटलं तरी चालेल. "

रडल्यासारखं तो बोलू लागला, " मला माहीतच होतं, ती आणखी तग धरणार नाही म्हणून. अतिशय मवाळ मनाची, खूप प्रेमळ. पण तिचा पायगुण चांगला नव्हता. ती या घरात आली आणि सगळंच विस्कटून गेलं. "

पंढरी जरा तापट डोक्याचा, तो काहीतरी कठोर बोलणार होता पण यशवंतने त्याला अडवलं. त्याने बाहेर नजर टाकली तेव्हा कुंपणापाशी कुणीतरी उभं असल्याचं, कानोसा घेत असल्याचं त्याला दिसलं. त्याने मनातच म्हटलं, यांना आधीच बातमी कळली की काय ? वाईट बातमी पोचायला वेळ लागत नाही. "

यशवंतने विचारलं, " प्रेताचं काय करायचं हो ? तुम्ही जाऊन आणा आणि अग्नी द्या. "

तो उभ्या उभ्याच थरथरला. यशवंतला वाटलं, हा आता कुठल्याही क्षणी कोलमडून पडणार. त्याने त्याला धरून खुर्चीवर बसवलं.

" तुमची सून नव्हे का ती ? याच मातीचा हक्क तिला. "

" मुलगाच मेला मला, सून कुठची उरली आहे ? मी असा आजारी, मोडका. मलाच पेजेचं पाणी देणारं कुणी नाही. तिला आणून काय करू ? तिच्या बापालाच करू दे काय करायचं ते. "

" दोन अजाण मुलं आहेत तिची. "

" त्यांचं नशीब त्यांच्याकडे. " तो उठला आणि पाठ फिरवत लटपटत आत गेला.

पंढरी आणि यशवंत परत यायला निघाले तेव्हा फाटकाजवळ त्या गावातले लोक मुकाट्यानेच गोळा झालेले दिसले. पंढरी त्यांच्यावर खेकसला, “ तुमच्या कुळातली एक सून तिथं मरून पडली आहे आणि तुम्ही इथं असे काय थांबला आहात ? प्रेताचं सगळं कुणी करायचं ? ”

एक जण म्हणाला, “ आम्ही प्रेत आणून भले आमच्या स्मशानात अग्नी देऊ पण पुढचं क्रियाकर्म कोण करणार ? आणून तसंच जाळून टाकलं नि मग स्मशानशुद्धी, बारावा, तेरावा केला नाही तर पाप लागेल; मेलेल्याच्या आत्म्यालाही मुक्ती मिळायची नाही. ”

त्यांचं पुढचं काही एक न ऐकता पंढरी आणि यशवंत झपझप पावलं टाकीत जायला निघाले. बरंच पुढं चालून आल्यावर त्यांनी सहज मागे वळून पाहिलं तर एक माणूस लाकडाचं एक खोड डोक्यावर घेऊन एकटाच चालत होता.

पंढरी म्हणाला, “ कोण रे हा ? ”

“ मी पण नाही ओळखत त्याला. ”

होडीच्या तिथं पोचेपर्यंत त्याने या दोघांना गाठलं. डोक्यावरचं खोड खांद्यावर टेकवून ते तो होडीत आडवं टाकायला जात होता. नावाड्याने म्हटलं, “ अरे, काय करतो आहेस तू ? ” पाहिलं तर त्याच्या डोळ्यांतून अश्रुधार लागलेली. रडल्यासारख्या आवाजात हातवारे आणि खुणा करीत त्याने काहीतरी सांगितलं. नावाडी गप्पच राहिला.

“ कोण हा, काय सांगतो, मामा ? ”

“ मुका देवाप्पा तो. गणेशच्या मुलीवर खूप जीव जडला होता त्याचा. सासरचं म्हणून एक तरी लाकूड तिच्या चितेवर पडावं म्हणून हे घेऊन चालला आहे तो. ”

सगळे जण मुकाट्यानेच, नदीचं पाणी कापीत होते. फक्त वल्हण्याचा तेवढा घस्स, घस्स आवाज येत होता. दोन्ही बाजूंनी शेतं, उसाचे मळे, भाजीचे मळे या सगळ्यांवर धूर पसरल्यासारखं मळकट दिसत होतं. चढत्या उन्हाला देखील चकाकी नव्हती.

वल्ह्यांच्या तालावर नावाडी सांगत होता, “ हा देवाप्पा लहानपणी मावशीच्या घरी गुरं राखीत होता. मावशी मेल्यावर याला हाकललं. पूर्वीपासूनच त्याला मुक्या जनावरांचं प्रेम. तिथं त्याला एक धन्वंतरी भेटला होता आणि त्याने याला गुरांसाठी काही औषधं शिकवली. आता त्याला एखादं वासरू आजारी आहे म्हणून कळलं तर हा धावत जातो तिथं. जनावरांचा वैद्यच.

जनावरांची भाषादेखील त्याला छान समजते हं. बैलाच्या पाठीवर नुसती एक थाप मारून काय झालं आहे त्याचं अचूक निदान करतो आणि औषधं देतो. ''

होडी किनाऱ्याला लागल्यावर देवाप्पाने खोड उचललं आणि तो झपझप पावलं टाकू लागला. यशवंत आणि पंढरी मुद्दाम वाट वाकडी करून जोशीबुवाकडे गेले आणि विचारलं, '' नवऱ्याकडची मंडळी प्रेत न्यायला तयार नाहीत तेव्हा काय करावं ? ''

जोशीबुवाने सांगितलं, '' बापाने आपल्या मालकीचा चार हात जमिनीचा तुकडा पाणी सोडून आंदण म्हणून मुलीला द्यायचा, तिथं तुम्ही प्रेताला जाळू शकता. पण अग्नी मात्र माहेरच्या कुणीही द्यायचा नाही. ''

'' पण तिच्या सासरचा एक ज्येष्ठ माणूस आला आहे, त्यालाच सांगतो. ''

'' छे, छे, मोठ्यांनी लहानांना अग्नी द्यायचा नसतो. ''

'' बघू, सगळीकडून अडथळेच दिसतात. ''

ते वस्तीवर पोचले तेव्हा चारी बाजूंनी लोक गप्प बसले होते. कुणीही कुणाच्या कानात मृत्यूचं तत्त्वज्ञान कुजबुजत नव्हता. वैराग्य आल्यासारखे उगीचच सगळे मुकाट्याने बसले होते. आत बायका मंजूळला ओटीत घेऊन बसल्यासारखं तिच्या सभोवताली बसल्या होत्या. आश्चर्य म्हणजे त्या उगाचच काहीबाही बोलून कुणाला रडवू पाहत नव्हत्या. रडवणार तरी कुणाला ? सुमन तर रडायच्या सीमेपलीकडे गेली होती. आणि बाप कांबळीचे धागे सोडवीत वेड पांघरून माजघरात बसला होता.

अंगणात पोचताक्षणीच पंढरी रागाने म्हणाला, '' ते येणार नाहीत बायला न्यायला. ती दळभद्री माणसं काय नेणार तिला ? ती आमची मुलगी, बहीण. आपणच तिला अग्नीच्या स्वाधीन करू या. ''

चारी बाजूंनी दुःखाची एक ओलीचिंब शिरशिरी पसरली होती. वडीलधारी मंडळी कसं काय करायचं या विषयी चर्चा करीत होती. मुका देवाप्पा खोड झाडाला टेकवून गणाच्या कडेला मुकाट्याने बसला होता.

गणपतआजोबा म्हणाला, '' हा गणेश वेड घेऊन बसला आहे. त्याच्याकडून ही चार हात जमीन आंदण म्हणून कशी काय घ्यायची ? ''

त्यावर रामदादा म्हणाला, '' गणपतदादा, तू तर सगळ्यात वडील. ही सगळी जमीन वाटली गेली आहे हे खरं, पण आधी ती एकाच घराण्याची होती ना ? तू पाणी सोडून दे चार हात जमीन मुलीला ! चिंचेजवळच्या शेताच्या कडेला देऊ आपण अग्नी. ''

सगळ्यांनी ' खरं आहे ' म्हटलं आणि तिरडी बांधायचं काम सुरू झालं.

भिंतीकडे ठेवलेले वासे आणून केशवने कोयतीने कटकट करून तोडले आणि त्याच्या कामट्या केल्या. सोयरू, खुशाली दोर घेऊन त्या बांधू लागले. बाकीच्यांनीही लाकडाची खोडं डोक्यावर घेतली आणि ते चिंचेजवळच्या शेताच्या दिशेने जाऊ लागले. गणपतआजोबाने हातात पाण्याचा तांब्या, पाणी सोडण्याकरता तुळशीपत्र आणि आंब्याच्या पानांचा द्रोण करून घेतला. मग तिरडी बांधणाऱ्यांना उद्देशून तो म्हणाला, "सगळं खरं, पण चितेला अग्नी कोण देणार? माहेरच तर कुणी अग्नी देऊ शकत नाही?"

वडीलमाणसं पुन्हा एकदा घोर चिंतेत पडली, "अग्नी देणारा माणूस सग्या-सोयऱ्यांपैकी असायला हवा, पण तो माहेरचा असता कामा नये."

मंजुळा आजारी असल्यापासून गोविंद नेहमी यायचा आणि मुकाट्याने तिच्या शेजारी बसायचा. मंजुळा कधी कधी त्याचा हात हातात घेऊन काहीतरी सांगायला बघत होती. तिची बोटं थरथरायची पण शेवटपर्यंत ती काहीच बोलू शकली नाही. मंजूळचं आजारपण, मरण यात तो याच घरचा होऊन गेला होता. पोरक्या मुलासारखं एवढंसं तोंड करून बसायचा. मंजुळा माहेरी आली तेव्हाच तो मॅट्रिकची परीक्षा द्यायला कारवारला जायला निघाला होता, तेव्हा ती फाटकाजवळ येऊन उभी राहिली होती आणि तो दृष्टीआड होईपर्यंत त्याला बघत होती. तो मॅट्रिक पास झाल्याचं कळलं तेव्हा आपलं दुखणं विसरून ती आनंदाने हसली होती, त्याचं कौतुक करीत होती. या खेपेला माहेरी आल्यापासून ती फक्त तेव्हाच एकदा हसली असेल.

अग्नी कुणी द्यावा म्हणून वडील मंडळी डोक्यावर हात घेऊन चिंतेत बसली होती. अचानक गोविंद त्यांच्यासमोर येऊन उभा राहिला. त्याने गणपतआजोबाला म्हटलं,

"आजोबा, मी देतो अग्नी, मंजूळताईला."

तिथंच त्याचा सख्खा मामा भास्कर बसला होता. गणपतआजोबाने भास्करकडे पाहिलं. तो गप्पच बसला होता. मग गणपतआजोबाने म्हटलं, "भाचा आहेस तू, अग्नी द्यायला हरकत नाही, पण नंतर क्रियाकर्म, श्राद्ध वगैरे अनेक राटावळी आहेत."

"मी सगळं करीन, आजोबा."

"तुझं काय म्हणणं भास्कर?"

"तो आता करतो म्हणतो आहे तर करू दे." पण भास्करचे शब्द जड वाटले, जणू त्याला हे तितकंसं आवडलं नव्हतं.

सोयरूने गोविंदच्या हातात गाडगं दिलं, दुसऱ्या हातात गोवरी पेटवून

दिली. मंजूळला बाहेर आणून तिची सवाष्णपूजा करण्यात आली. डोकं फुलांनी भरलं. तिला तिरडीवर ठेवून तिरडी उचलली आणि वस्तीवरच्या लोकांचा, आक्रोश सुरू झाला.

अंगात आल्यासारखे लोक रडत होते. वेडा विठोबा तर छाती बडवीत रडत होता. सुमनला समजवायला कुणी नव्हतं. ती दारात सपशेल आडवी पडून हातपाय आपटून घेत होती. मधेच तिची दातखीळ बसली आणि शुद्ध हरपली. मग कुणीतरी पुढं येऊन तिला सावध केलं.

देऊळवाड्यावरचा शांबा अंगणात बाजूला उभा होता, तो मनात म्हणत होता, ''वाड्यावरची लेक सासरी जाताना आसवं गाळणारे हे लोक तिचं प्रेत बाहेर काढताना रडल्याशिवाय कसे राहतील ? ''

मयतीच्या दिवशी मंजुळाच्या मुलांना कुणी कुठं ठेवून घेतलं होतं, कुणी त्यांना वाढलं, भरवलं वगैरे सुमनला काहीच पत्ता नव्हता. जाणून घ्यायची उत्सुकताही नव्हती. दुसरे दिवशी कुणीतरी त्यांना आणून माजघरात झोपवलं तेव्हा त्यांच्याकडे पाहूनसुद्धा सुमनच्या मनात कोणत्याही भावना उमटल्या नाहीत; त्यांना भरवावं, जेवायला घालावं असंही तिला वाटलं नाही. त्यांना हात लावायचा सुद्धा तिला धीर होत नव्हता.

दुसरे दिवशी केरवाडीहून मामा आला होता, अचानक भान गेल्यासारखं ती त्याला म्हणाली, ''त्यांच्या बापाला बोलावून त्याची मुलं त्याच्या स्वाधीन करा रे ! ''

मामा काहीच बोलला नाही. त्या मुलांविषयी कुणीच काही बोलत नव्हतं. जणू बोलायचीच भीती वाटत होती. प्रत्येकाला वाटायचं, '' मुलांचा प्रश्न म्हणजे मोठा कठीणच प्रश्न ! बोलायचं काय ? फार तर त्यांचं नशीब त्यांच्याकडे म्हणायचं झालं ! ''

मोठा तीन वर्षांचा होता. इथं काहीतरी घडून गेलं आहे, इथं असलेली आपली आई नाहीशीच झाली आहे, लोक कशासाठी तरी रडताहेत हे त्याला कळत होतं. तो भांबावून गेला होता. तोंडात बोट घालून भिंतीला टेकून गप्प बसायचा. धाकटी मधेच अंथरुणात वळवळ करायची आणि मोठमोठ्याने रडायला लागायची. तिचं रडणं ऐकून सुमन वैतागायची. मग कुणीतरी येऊन तिला उचलून घेई, कुणाच्या तरी घरून थोडं दूध आणून तिला पाजवी. सुमनला माहीत होतं, हे सगळं फार तर तेराव्यापर्यंत चालू राहील. तेरावा झाला की सगळे इतस्ततः पसरतील.

तेरा दिवसपर्यंत घरात लोकांचा सतत राबता होता. मामा, मुकुंदमामा रोज सकाळी यायचे आणि दुपारी घरी परत जायचे. वस्तीवरचे लोकदेखील येऊन जाऊन असायचे.

गोविंदने सगळे विधी आणि क्रियाकर्म जरासुद्धा न कंटाळता, मन लावून केलं. नऊ दिवसपर्यंत तो रोज सकाळी उठून, ग्लासात दूध घेऊन मंजूळला जाळलेल्या ठिकाणी जायचा आणि ते दूध तिच्या अस्थींच्या राखेत घालून यायचा. रोज संध्याकाळी दिवस मावळायच्या आधी जेवायचं, मग गरुड-पुराण वाचून झोपायचं. त्या दिवसात सगळी क्रिया होईपर्यंत तळलेलं, भाजलेलं, गोड, आंबट काहीच खाता येत नव्हतं. डोक्याला तेलदेखील लावायचं नव्हतं. दुपारी पेज आणि सोलकढीने नुसता भात.

या दिवसात तो सुमनकडेच राहायचा, रात्री तिथेच झोपायचा. जीवनावरची आसक्तीच गेल्यासारखी सुमन कुठेतरी बघत गप्प बसून राहायची. घरात इतकी गडबड, धांदल चालायची. पण ती तिथे असून नसल्यासारखी. कुठं काय आहे म्हणून कुणी विचारलं तर बोटानेच निर्देश करून दाखवायची. गोविंद मात्र सारखा आत-बाहेर काम करीत राहायचा. कधी सुमनच्या तिथं बाजूला बसायचा पण बोलणं व्हायचंच नाही. उमेदच हरवली होती. कितीतरी बोलायचं होतं. मंजूळताईबद्दल, तुझ्या-माझ्याबद्दल. नाही म्हटलं तर तरी जेवत नसली की ताट वाढून आणून तो ते तिच्यासमोर ठेवायचा व शपथा वगैरे घालून तिथंच उभा राहायचा.

नवव्या दिवशी स्मशानशुद्धी झाली. मातीच्या कळशीतून गार पाण्याने आंघोळ करून न्हाव्यासमोर बसून गोविंदने मुंडन करून घेतलं. न्हाव्याने एवढीशी शेंडी ठेवून बाकी सगळं गुळगुळीत केलं. स्मशानशुद्धीचा विधी झाल्यावर मंजुळाच्या अस्थींची पाटी डोक्यावर नेऊन त्याने त्या अस्थी काळ्या नदीत विसर्जित केल्या.

अकराव्या दिवशी सपिंड विधी आणि श्राद्ध झालं. बाराव्या दिवशी गावजेवण. त्या दिवशी मामाने गोविंदच्या डोक्याला तेल लावून टॉवेल बांधला आणि मग गोड खायला घातलं.

कसले कसले विधी आणि क्रियाकर्म! गोविंद मुकाट्याने सगळं करीत होता. कितीदा तरी गार पाण्याने आंघोळ करावी लागली आणि कितीदा ओल्या अंगाने येऊन भटजीच्या पुढे बसावं लागलं.

तेरा दिवसपर्यंत मामा, मुकुंदमामा आणि शेजारचे इतर लोक सारखे घरात ये-जा करीत होते. मामाने केरवाडीहून बाराव्याकरता गूळ, तांदूळ, नारळ

वगैरे आणलं होतं. तो खरंच अतिशय प्रेमाने सारं करीत होता, वागत होता. रोज सकाळी घरून यायचा आणि संध्याकाळी परत जायचा. रात्रीचं कुणी राहायचं नसतं. मामा सुमनविषयी किंवा मंजुळाविषयी कुणाशीही बोलू लागल्यास त्याचा कंठ दाटून यायचा. मग तो रडत रडतच बोलायचा.

तेराव्या दिवशी खरंच सगळे विखुरले. गोविंदही त्या दिवशी तिथं राहिला नाही. माजघरात डोकं हलवीत बसलेला आपा आणि घरात सुमन. तिच्या सोबतीला दोन अजाण पोरं. रिक्त मन! रिक्त घर!

पूर्वी बायच्या रमेशवर किती जीव होता तिचा! पण आता काहीच नकोसं झालं होतं. आत्ता त्यांना कुणी उचलून नेलं असतं तर तिने टाळ्यादेखील वाजवल्या असत्या.

बरीच रात्र झाली होती. खिळा ठोकल्याप्रमाणे सुमन भिंतीला टेकून बसली होती. बाजूला रमेश बसला होता. चिमणीचा मंद प्रकाश त्याच्या चेहऱ्यावर पसरला होता. त्याचा तो निष्कलंक चेहरा पाहून सुमनचं काळीज तुटलं. अचानक साक्षात्कार घडावा तसं झालं! हा तर अगदी बायचाच चेहरा! याला सांभाळेन म्हणून बायने माझ्याकडून वचन घेतलं आहे!

जरा कुठे डोळा लागला तर स्वप्नात बाय यायची. काळोखसा, उजेडसा, मधे सावलीच्या अंगाने बाय उभी. नुकतीच रडून रडून थांबल्यासारखी दोन मुलं. अंगणात फोडून टाकलेल्या तिरडीच्या कापट्या. अर्धवट जळालेलं माडाचं चुडीत... बाय काहीतरी विचारते, ऐकूच येत नाही की मी कानावर हात ठेवला आहे कळत नाही!

रमेशचा चेहरा तिला आजारपणातल्या बायचा सानुला चेहराच वाटला. हळूहळू हात पुढे नेऊन तिने रमेशच्या चेहऱ्यावरून, डोक्यावरून फिरवला. केस किती खरखरीत झाले आहेत! पोराची दैनाच झाली आहे. मला मावशी म्हणत नाही, कितीही सांगितलं तरी बायूलमावशीच म्हणतो. आधी रडायचा, मस्ती करायचा. पण या दिवसांत "मला सगळं समजतं बायूलमावशी" म्हटल्यासारखं गप्प बसून राहतो. आईला बाहेर काढताना या लोकांनी त्याला जवळ आणलं नव्हतं.

अचानक सुमन त्याच्यावर ओणवी झाली. गाढ झोपलेल्या रमेशला तिने उचलून घट्ट छातीशी घेतलं. घुसमटून तो जागा झाला तरी त्याला सोडलं नाही.

गणेश मधेमधेच चक्रावल्यासारखा डोकं हलवीत काय काय बडबडत

राहायचा. नुसतेच शब्द-शब्दांचा अर्थ नसलेली साखळी. कुठेतरी दारात व्यालेल्या केळीपासून सुरुवात करायचा आणि कुठल्यातरी पडक्या घराच्या दारात बसलेल्या विधवा बाईवर जाऊन पोचायचा. मंजुळाला बाहेर काढताना तो कांबळीचे धागे सोडवीत होता आणि गुंडाळीत होता. रामदादाने जाऊन सांगितलं, ''गणेश, तुझ्या लेकीला बाहेर काढतात ना रे.'' तर तो खोल, भकास नजरेने असा काही त्याच्याकडे पाहू लागला की रामदादाला त्याच्या त्या भुतासारख्या नजरेची भयंकर भीती वाटली. तो मुकाट्याने बाहेर आला आणि तिरडीवर केळीची पानं अंथरायच्या कामाला लागला.

मंजूळ गेल्याच्या तिसरे दिवशी आवडूआजी अंगणात उभी राहून म्हणत होती, ''अंगातलं भूत काढून सीमेबाहेर टाकणारा तो मांत्रिक, पण या पोरीने अडथळे आणले. आता ही एकामागून एक संकटं.''

सुमनने ते ऐकलं आणि ती गप्पच राहिली. महिन्यानंतर कृष्णानंद भेटायला म्हणून आला होता. तो गोव्याला – पणजीला पोलिसखात्यात कामाला होता. सुमनने त्याला विचारलं, ''कृष्णानंदभाऊ, आपाला कुणालरी चांगल्या डॉक्टरला दाखवायचं आहे रे. गोव्याला आहेत का कुणी तुझ्या ओळखीचे डॉक्टर?''

''त्याला ना आपण काही दिवस हॉस्पिटलमधे ठेवू या. आल्तिनोला आहे हे हॉस्पिटल. मी त्याच्या जवळच राहतो. तू पुढच्या बुधवारी त्याला घेऊन पणजीला ये. मग मी बघतो सगळं.''

''पण भाऊ, मी कुठं पणजी पाहिली आहे?''

''येताना कुणाला तरी बरोबर घेऊन ये ना.''

''कोण आहे? वस्तीवर आहेत ते सगळे कधीच कुठं बाहेर न गेलेले. तुमच्यासारखे शिकलेले सगळे बाहेर असतात.''

पण कृष्णानंद पटकन म्हणाला, ''अग, गोविंद आहे ना भास्कर-अण्णाचा भाचा. त्याने पणजी पाहिली आहे.''

सुमन एकदम दचकल्यासारखी झाली. मग म्हणाली, ''बघते, विचारून.''

''या तुम्ही, मी पणजीला पोलिसस्टेशनवरच असेन. कुणालाही विचारलं तर सांगतील. पहाटे गडावर येऊन बस पकडली तर बारा वाजेपर्यंत पणजीला पोचाल, गोविंदला माहीत आहे.''

संध्याकाळी सुमनने गोविंदला विचारलं, ''गोविंद, तू पणजी पाहिली आहेस?''

“ का ग ? ”

“ उगीचच. ”

“ मागं असनोटीला गेलो होतो तेव्हा गावातली काही मुलं पोलिसात भरती व्हायला म्हणून गेली होती. त्यांच्याबरोबर मी पण गेलो होतो. आपलं उगाच, गोवा बघायला म्हणून. रात्रीचे आम्ही लक्ष्मीच्या देवळात जाऊन झोपलो होतो. ”

“ तू पणजीचं पोलिस स्टेशन पाहिलं आहेस ? ”

“ पोलिसखात्यात भरती करतात तिथंच तर ते पोलिस स्टेशन. तिथं नरहरीमामाचा मुलगा कृष्णानंद असतो. ”

सुमनला हायसं वाटलं. “ गोविंद, आपण आपाला घेऊन पणजीला जाऊ या. तिथं एक चांगलं हॉस्पिटल आहे म्हणे. ”

गोविंद गप्पच राहिला.

“ तू येणार नाहीस गोविंद ? ”

“ मामा-मामीला विचारायला हवं. ” त्याच्या उद्‌गारात सुमनला उगीचच त्याने भीती दर्शवल्यासारखं जाणवलं.

खरंच होतं ते. या दिवसात गोविंद सुमनकडे जातान. तिथून आला की, मामा-मामी उगीचच चिडचिडल्यासारखं करायची. “ कुठं गेला होतास रे तू ? ” म्हणून विचारताना दात फुटल्यासारखे वाटायचे.

“ सुमन, तू मामीला जाऊन सांग, आपाला पणजीला घेऊन जातो म्हणून. ”

दुसरे दिवशी सकाळीच सुमन भास्करअण्णाकडे गेली. घरात सरस्वतीमावशीच होती. बाय गेल्यापासून सुमन पहिल्यांदाच त्यांच्याकडे आली होती. ती आली आणि नुकतीच आई गेलेल्या अनाथ मुलासारखी बाहेरच्या बाकावर बसली. सरस्वतीमावशीने जवळ येऊन तिच्या खांद्यावर हात ठेवला. एकाएकी सुमनला रडू कोसळलं.

“ रडू नकोस. कशाला आली होतीस ? ”

सुमनने डोळे पुसले. मान वर करून एकवार मावशीकडे पाहिलं. सरस्वतीमावशी नेहमी आजाऱ्यासारखी बारीक, पांढरट दिसायची पण ती दिवसभर काम करायचं सोडत नव्हती. कधीही पाहिल्यास घरात, बागेत कामात गुंतलेली. त्यामुळं तिचं घर, अंगण, बाग सगळं इतकं नितळ, स्वच्छ असायचं की लोक तिच्या घराला कोकण्याच्या वस्तीतलं बामणाचं घर म्हणायचे. पण मधेच ती कुठल्यातरी आजाराने कण्हायला लागायची आणि आठ-पंधरा दिवस

अंथरुणातच पडून राहायची. लोक म्हणायचे, पोटचं मूल नसल्याने ती झुरते आहे.

त्यांच्या बागेत खाली कुणीतरी कुऱ्हाडीने हाणल्यासारखा मोठ- मोठ्याने आवाज येत होता. त्या आवाजात सुमनला काही बोलावंसंच वाटत नव्हतं.

"कोणी काहीतरी कापतो आहे का ग, मावशी?"

"आंब्याची फांदी बांडगुळाने भरली आहे. सोमाला कापायला सांगितलं आहे. माडांना सावट पडतं ना? कशाला आली होतीस तू?"

"मावशी, आपाला पणजीला न्यावं म्हणते. कृष्णानंदभाऊने घेऊन यायला सांगितलं आहे. मी आणि गोविंद घेऊन जातो आपाला."

सरस्वती जरा वेळ गप्पच राहिली. मग म्हणाली, "गोविंदला माहीत आहे?"

"तो ह्याच्या आधी गेला होता म्हणे पणजीला."

"मग जा घेऊन तुम्ही."

सुमनला हायसं वाटलं. तिने मावशीकडे पाहिलं, जणू नजरेने ती म्हणत होती, किती चांगली आहेस ग तू मावशी!

"उशीर झाला तर रात्री कुठं राहणार?"

"कृष्णानंदभाऊ आहे ना ग? अण्णा कुठं गेला आहे?"

"ते आणि गोविंद दोघे मिळून चावडीवर गेले आहेत, कसलेतरी कागदपत्र पाःहायला म्हणून"

सुमनला छातीत उगाचच कलकलल्यासारखं वाटलं. ती उठली, "येते मावशी." आता सरस्वती जरा जास्तच तिच्याजवळ आली. "बघ, मुलीची जात तुझी. लोक वाटेल तसं बोलतात. माझ्या कानावर पण येतं. पुढं तुमच्या नशिबात असेल तसं होईल. पण आता संभाळून राहा."

"गळ्याशप्पथ. तसं काहीच नाही ग मावशी."

थांबायला सांगून सरस्वती आत जाऊन चार भाजीची केळी घेऊन आली.

"ही घे आणि आपाला चांगली भाजी करून घाल."

सुमन केळी घेऊन बाहेर पडली. तिला ते घर जास्तच शांत, सुस्त वाटलं. ह्या घराच्या माडीवर चार वर्षं शाळा शिकली होती ती. धडाधडा जिना चढायची आणि उतरायची. इथं शाळा चालू असताना मुलं वाचायला, परवचा म्हणायला लागली की सारी वस्ती दुमदुमायची. आता वस्तीबाहेर सरकारी शाळा बांधली आहे. जयराममास्तरला कायम करून त्याची लांब

बदली केली आहे. सुमनला मनापासून वाटलं, याच घराच्या माडीवर अजूनही शाळा असायला हवी होती. हे घर जास्त आपलसं वाटलं असतं, असं एकदम परकी वाटलं नसतं.

सुमनला त्या केळ्यांची भाजी मात्र नीट जमली नाही. ती बुळबुळीत, चिकटशी झाली. आपाला थोडी वाढली. त्याने ती भाताबरोबर कशीतरी पोटात ढकलली. त्याचं असंच चाललं होतं. सुमन ताट वाढायची आणि जेव म्हणून त्याचा हात ताटाला लावायची. मग तो ताटातलं सगळं मुरडल्यासारखं करून जेवून उठायचा, न थांबता.

अगदी पहाटे ओहोटीच्या प्रवाहात उलट्या वाऱ्यात शीड सोडून बोटी जात होत्या. बुधवारी मध्यरात्रीच सुमन उठली आणि दिवा घेऊन जाऊन नरसिंहाला बोलावून आणलं. "अण्णा, आपाला जरा धोतर नेसवून शर्ट घाल. बोटी यायच्या आधी बंदरावर जायला हवं."

नरसिंहाने अंगणात उभं राहून आकाशाकडे पाहिलं. "अग, अजून नक्षत्रांचा पुंजका खाली उतरलाच नाही. इतक्या लवकर कुठं जाता?"

"असू दे, नेसव तू अण्णा."

"इतक्या लवकर कुठं नेसव म्हणतेस?" नरसिंहाने आवाज चढवला. मग पेंगत असल्यासारखा तो बराच वेळ बसून राहिला.

"अण्णा, उशीर होतोय."

नरसिंह उठला. त्याने गणेशला उठवलं. माडाच्या आळ्याजवळ नेऊन त्याच्या तोंडावर पाणी मारलं, त्याच्याच पंचाच्या टोकाने त्याचं तोंड पुसलं नि मग आत आणून त्याला धोतर नेसवलं.

आता "अण्णा, जरा गोविंदला बोलावून आणतोस" म्हणून विचारणार एवढ्यात तो अंगणात थडकलाच.

"अगदी वेळेवर आलास की रे, गोविंद."

"मामीने मघाशीच उठवलं होतं. बघ, तिने पोळ्यादेखील करून दिल्या आहेत दुपारी खायला."

सुमनने कालच रात्र पडल्यावर रमेशला आणि बायच्या मुलीला गोकुळमावशीच्या घरी नेऊन झोपवलं होतं. आणि सांगितलं होतं, "उद्याचा एक दिवस यांना जरा पेज, पाणी काहीतरी दे."

ती आपाला घेऊन निघाली आणि हातात दिवे घेऊन पाच-सहा जण तरी गोळा झाले. यशवंतने दिवा मालवून माजघरात ठेवला नि गणेशच्या दंडाला धरून म्हटलं, "बंदरापर्यंत पोचवून येतो."

दुसऱ्या दंडाला नरसिंहाने धरलं. पुढे गोविंद चालत होता. मागे सुमन होती. गणेश शांत होता. त्याला वेड लागलं आहे की योग्याची समाधी, सांगता येत नव्हतं.

ते नदीजवळ पोचले तेव्हा काळ्या नदीच्या पाण्यावर लेप लावल्या-सारखा काळोख पसरला होता. थोडं थोडं दंवही पडत होतं. कार्तिकातले वारे वाहत होते आणि बराच गारवा जाणवत होता.

ते बंदराजवळ येऊन हात अंगाभोवती पांघरून गप्प बसले. मधेच एखादी बोट घसघस आवाज करीत होती, तिचं पांढरं शीड दिसायचं, मग ते ''ओऽऽऽहुय्य'' करीत साद घालायचे मग ती बोट ''नाही रे, नाही रे'' करीत पुढं जायची.

प्रत्येक बोटीचं बंदर ठरलेलं असायचं. कुठलीही बोट कुठल्यातरी बंदराला लागत नव्हती. काही वेळाने खरंच यांची बोट आली. गुडघाभर पाण्यातून चालत जाऊन ती बोटीत बसली. यशवंत आणि नरसिंहाने मिळून गणेशला आणून बोटीत बसवलं.

ते गडावर पोचले तेव्हा सूर्य नुकताच उगवला होता. समोरची बेटं, सुरीचे वन, अथांग समुद्र डोळ्यांसमोर उघडा पडला होता. इवल्याशा पाखराने समुद्रावर उडून जावं तशी गोविंदची नजर समुद्राला पाहत होती. सुमन मात्र आपाला धरून काळजीने दडपून गेल्यासारखी बसली होती.

गडावर बस पकडून पणजीला पोचेपर्यंत साडेअकरा वाजले. गोविंदने आपाचा एक हात धरला आणि झपझप पावलं टाकीत ते पोलिस स्टेशनवर आले.

सुमन आपाचा हात धरून बाहेरच उभी राहिली. गोविंद एका मोठ्या दरवाज्यातून किल्ल्यात गेल्यासारखा आत गेला. तिथं कृष्णानंद गावकर कुठं आहे म्हणून चौकशी केली तर एक जण दुसऱ्याला, दुसरा तिसऱ्याला विचारू लागले. पण खुर्चीवर बसलेल्या एकाने रजिस्टर पाहिलं नि सांगितलं, ''दोना पावलाला एक बॉडी पडली आहे. तो साहेबाबरोबर तिथं गेला आहे.''

''कधी येणार?''

''सांगता येत नाही. बॉडीचा पंचनामा करावा लागेल, पोस्ट मॉर्टेम करायला न्यावं लागेल, प्रेत नातेवाईकांच्या ताब्यात द्यावं लागेल. विलंब लागेल.''

गोविंदला फारसं काही समजलं नाही पण एक कळलं, कृष्णानंद इथं नाही आणि तो लवकर पोचणार नाही. अतिशय काळजीनेच, निराश होऊन

त्याने बाहेर येऊन सांगितलं, “ कृष्णानंद नाही म्हणे. ”

“ कुठं गेला आहे ? ”

“ कोणीतरी मेला आहे, तिथं कशासाठी तरी गेला आहे म्हणे. ”

सुमनला धसकाच बसला. ओळखदेख नसलेल्या या शहरात आपण काय काय करणार आता ?

ती बराच वेळ तशीच उभी होती. उगाच वाटत होतं, कृष्णानंद नसला तरी कुणीतरी ओळखीचं भेटेल आणि आम्हाला सगळं नीट दाखवेल. एवढ्यात मघासचा पोलिस स्टेशनवरचा पोलिस बाहेर आला. गोविंदने लगबगीने त्याच्याजवळ जाऊन म्हटलं, “ कृष्णानंद गावकरने या म्हटलं होतं आम्हाला. ह्या मामाला बरं नाही. वेड्यांच्या हॉस्पिटलमधे त्याला घालावं म्हणत होता. ”

“ गावकर एवढ्या लवकर नाही पोचणार. तुम्ही रिक्षा करून चला हॉस्पिटलमधे घेतील ते. ”

“ कुठंसं आहे ते ? ”

त्या पोलिसाने टेकडीच्या दिशेने निर्देश केला. ती टेकडी जणू डोक्यालाच टेकते आहे असं वाटत होतं. तिच्यावर कितीतरी उंच इमारती होत्या. तिथं पोचणं भारी अवघडच वाटत होतं.

“ तिथं आल्तिनोवर आहे मेंटल हॉस्पिटल. रिक्षा करून चला तुम्ही. ”

एवढ्यात एक रिक्षा आली. त्या पोलिसानेच हात दाखवून ती थांबवली. “ यांना वर मेंटलमधे घेऊन जा. ”

ते तिघेही रिक्षात बसले. त्या पोलिसाने सांगितलं, “ दोन रुपये दिले तर पुरे. ”

आल्तिनोवर मेंटल हॉस्पिटलमधे ते उतरले आणि सुमन एकदम दचकलीच. आतून कुणीतरी किंकाळी मारल्याचा आवाज येत होता. तिला ते हॉस्पिटलसं वाटतच नव्हतं. तिने गोविंदच्या दंडाला घट्ट पकडून म्हटलं, “ हा तर तुरुंगच वाटतो की रे ! ”

“ अग वेडे, हॉस्पिटलच आहे ते. बघ, पाटी पण लावली आहे. ”

आत जायच्या दरवाज्यासमोर पेंट केलेला एक बाक होता. तिथं तिनं आपाला बसवलं. तिथं कुणीच नव्हतं. गोविंदने अंदाज घ्यायला म्हणून एका काचेच्या दारातून आत पाहिलं. तिथं टेबलावर एक नर्स बसली होती. ती खूप लठ्ठ होती ती ज्या खुर्चीत बसली होती तीत तिचं शरीर मावत नव्हतं असंच वाटत होतं. ती इतकी लाल गोरी होती की चेहऱ्यातून रक्त ओथंबतं असं वाटत होतं. त्यात ओठांवर पिंगट मिशा. क्षणभर ती बाई का पुरुष

हेच गोविंदला समजलं नाही. गोविंदची चाहूल लागल्यावर ती उठली नि झरझर बाहेर आली. आता मात्र गोविंदला खरंच आश्चर्य वाटलं. आपला एवढा मोठा देह, एका आगळ्याच उंच टाचांच्या चपलांवर तोलत ती तत्परतेने चालत होती. तशीच कडक बोलतही होती.

" कोण, कुठून आलात ? "

" हा माझा आपा, डोकं बरोबर नाही. "

" कारवारकर का ? "

" हो, सकाळी गडावर बस पकडून आलो आहोत आम्ही. "

" इथं गोव्याबाहेरच्या लोकांना आम्ही घेत नसतो. "

" उपकार कर बाई. लांबून आलो आहोत. मध्यरात्री बोटीत बसलो होतो. "

" काय म्हणालीस ? सांगितलं ना एकदा, घाटी लोकांना आम्ही घेत नाही म्हणून ? मामलेदाराचं सर्टिफिकेट असल्याशिवाय आम्हाला घेता येत नाही. "

इतक्यात एक वयस्कर माणूस बाहेर आला. " काय ग, काय आहे ? "

" डॉक्टर, हे कारवारकर, घाटी. त्या म्हाताऱ्याला मानीकोममधे घालायचं आहे म्हणतात. "

डॉक्टर बरेच वयस्कर होते, कमरेत वाकले होते. चालताना, बोलताना त्यांची मान डुगूडुगू हलत होती. त्यांच्या अंगावरची पँट आणि कोट इतके ढगळ होते की त्यांना कसंतरी त्या कपड्यांमध्ये भरून ठेवलं आहे असं वाटत होतं. त्यांचं बोलणं बोबडं होत होतं. पण त्यांनी गोविंदच्या खांद्यावर हात ठेवून समजावणीच्या स्वरात सांगितलं, " गोव्याबाहेरच्या लोकांना आत घ्यायला सर्टिफिकेट लागतं. मामलेदाराच्या ऑफिसमधे चला आणि तो म्हातारा गोव्यातच कुठंतरी राहतो म्हणून दाखला घेऊन या. "

" कुठं आहे मामलेदारांचं ऑफिस ? "

" खाली सिटीत. पोलिस हेड-क्वार्टर्सच्या बाजूला. "

" कुठं म्हणालास ? " बाजूलाच एक मुलगा उभा होता, काळसर कपडे घातलेला. तो म्हणाला, " आलेल्याच वाटेने खाली चला. महालक्ष्मीच्या देवळाकडून गेल्यास जवळ पडेल. खाली गेल्यावर कुणालाही विचारा, मामलेदार कचेरी कुठं म्हणून. "

सुमनला त्याची भाषा ओळखीची वाटली. तिने विचारलं, " कुठचा रे तू ? "

त्याने कुठचा ते सांगितलं नाही उलट, चला, चला म्हणून खालच्या वाटेकडे बोट दाखवलं.

ती मागे फिरली. वरून खाली पाहिलं तर सगळं पणजी शहर तबकडीत ठेवल्यासारखं पायाखालीच दिसू लागलं. पण चालायला लागल्यावर मात्र वाट संपता संपेना असंच वाटू लागलं. मघाशी त्याने लक्ष्मीच्या देवळाकडून खाली उतरा म्हटलं तेव्हा गोविंदला मूर्ती सापडल्यासारखी वाटून वेगळीच उमेद आल्यासारखं झालं. खरं म्हटलं तर मागच्या खेपेला पणजीला येऊन गेला तेव्हा लक्ष्मीचं देऊळ तेवढंच त्याच्या लक्षात राहिलं होतं. ती खरंच कुणाला तरी विचारून देवळाकडून खाली उतरली. आपा तर कसलीही आडकाठी न आणता दाव्याला बांधल्यासारखा त्यांच्याबरोबर फिरत होता.

गोविंदने म्हटलं, "मघाचा तो कारवारचा असावा असा वाटत होता, नाही ग ?"

"पण त्याने ओळख दाखवली नाही बघ. उगाच 'चला, चला' केलं. ती नर्स 'घाटी, घाटी' काय म्हणत होती रे ?"

"गरीब लोकांना घाटी म्हणतात वाटतं."

"आम्ही गरीब?"

"इकडच्या ह्या बिल्डिंग पाहिल्यास ? किती श्रीमंत लोक असतील हे ? आणि ह्या गाड्या बघ."

"इकडचे सगळे लोक कोकणीच बोलतात की रे. मला भीती वाटत होती, आपल्याला भाषा नाही कळली तर ?"

मधेच त्यांनी कुणाला तरी मामलेदारांचं ऑफिस कुठं आहे म्हणून विचारलं. तो म्हणाला, "या, माझ्याबरोबर या. मी दाखवतो."आणि खरंच तो माणूस त्यांना ऑफिसच्या दारापर्यंत सोडून गेला.

तिथल्या दरवाज्यावरचा तो शिपाई, रात्रभर नाटकाला जाऊन आल्यासारखा पेंगत उभा होता. इतक्या नीटनेटक्या ऑफिसच्या दारात हा कळकट शिपाई बघून त्यांना कसंसंच वाटलं.

पण तो बोलत होता मात्र अतिशय समजूतदारपणे, नम्रपणे. त्याचं बोलणं ऐकूनच त्यांना धीर आल्यासारखं वाटलं. तो म्हणाला, "साहेब तुमच्याच गावचा. त्याचेच पाय धरा." तो आत गेला आणि थोड्याच वेळात पुन्हा बाहेर येऊन त्यांना आत घेऊन गेला.

"साहेब, हा माझा मामा, हिचे वडील – डोकं बरोबर नाही. हॉस्पिटलमधे ठेवायचं आहे."

साहेब उंच, हडकुळा आणि काळासाच होता. त्याच्या चेहऱ्यावरची एक शीरदेखील हलत नव्हती. तो स्टेजवर असल्यासारखा एका उंच खुर्चीवर बसला होता. त्याच्या समोरच्या एका खुर्चीवर पांढरे स्वच्छ कपडे घातलेला एक गृहस्थ बसला होता. तो मात्र गोरा आणि रेखीव बांध्याचा होता. साहेबाने डोळे बंद केल्यासारखं गोविंदचं म्हणणं ऐकून घेतलं आणि म्हटलं, ''तुम्ही कारवारची, कारवारला राहता आणि कारवारहून आलात ?''

''होय, साहेब.''

''गोव्याबाहेरच्या लोकांना या मेंटल हॉस्पिटलमधे ठेवता येत नाही. तुम्ही धारवाडला चला. तुमच्याकरता तिथं हॉस्पिटल आहे.''

''पण साहेब...''

''शंभू, ह्यांना बाहेर ने रे.'' हाकलल्यासारखं त्याने सांगितलं.

तो पांढऱ्या कपड्यातला माणूस मधेच उठला आणि इंग्रजीत काहीतरी बोलू लागला. पण मामलेदाराने हातानेच खूण करून त्याला खाली बसवलं.

सुमन आणि गोविंद आपाला घेऊन ऑफिसच्या बाहेरच काही वेळ गप्प उभी राहिली. सुमनच्या डोळ्यांतून आसवं गळू लागली, ती पोलक्याच्या बाहीनेच तिने पुसली.

तसं पाहिल्यास ती तशीच बावळट दिसत होती. रानातून उठून आल्यासारखी. गोविंदने पांढरा शर्ट आणि खाकी हाफ पँट घातली होती. सुमनने लांब हातांचा पोलका आणि पावलांपर्यंत पोचणारा हिरवासा परकर. आपाला नेसवलेल्या धोतराची तर कमरेभोवती गुंडाळी झाली होती. जवळून एखादी गाडी गेली तरी ती दचकायची.

''गोविंद, आपण बस पकडून परत जाऊ या.''

''कृष्णानंद आला असेल तर जाऊन बघू.''

सुमनला सगळ्यांचाच राग आला होता. ती म्हणाली, ''आणखी कुणालाही भेटायचं वगैरे काही नको.''

तिने जायला पाऊल उचललं आणि मघासचा तो पांढऱ्या कपड्यांतला गोरा गृहस्थ समोर आला. ''या तुम्ही, माझ्याबरोबर चला. मी नेऊन घालतो त्यांना हॉस्पिटलमधे. तो मामलेदार कारवारचाच आहे. गोव्यात येऊन मामलेदार होऊन आपण मात्र खुर्चीत बसला आहे आणि तुम्हाला मेंटल हॉस्पिटलमधे जागा नाही म्हणे! मग ह्याने देखील नोकरी सोडून जायला हवं.''

जाताना दोघा-तिघांनी त्या गृहस्थाला डोक्याला हात लावून नमस्कार केला. त्यावरून हा चांगलाच मोठा माणूस असल्याचं त्यांना जाणवलं. त्यांना

घेऊन तो आधी पोलिसचौकीवर गेला. आत जाऊन फौजदाराला भेटून आला. मग तिथल्या हवालदाराला मोठ्याने म्हणाला, “ हा वेडा माणूस माझा शेजारी आहे. वेडाच्या भरात रात्रभर बोंबाबोंब करतो, आजूबाजूच्या माणसांना झोपायला देत नाही, मुलांना अभ्यास करू देत नाही. सगळ्यांची स्वस्थताच बिघडवून टाकली आहे याने. याला नेऊन मेंटल हॉस्पिटलमधे टाका. ”

गोविंद आणि सुमन ऐकतच राहिले. गोविंदने बाहेर उभ्या असलेल्या एका पोलिसाला हळूच विचारलं, “ कोण आहे हा ? ”

त्या पोलिसाने हात हलवल्यासारखं करून तू गप्प राहा म्हटलं. नंतर तो म्हणाला, “ वकील माशेलकर तो. थोर स्वातंत्र्यसैनिक. आता वकिली करतो. ”

पोलिस हवालदाराने लगबगीने काही कागदपत्र तयार केले. पाच मिनिटात एक जीप आली आणि त्यांना घेऊन आल्तिनोची चढण चढू लागली. तो थोर गृहस्थ हात हलवून त्यांना “ चला, चला ” म्हणून सांगत होता. त्याच्या सौजन्याने त्यांचा ऊर भरून आला. सुमन म्हणाली, “ कोण ओळखदेख देखील नसलेला माणूस, देवासारखा पावला. ”

जीपमधे एक पोलिस बरोबर होता. त्याने कागदपत्र दाखवल्यावर डॉक्टरने आपाला जरा तपासलं आणि तिथल्या नोकराला त्याला आत न्यायला सांगितलं. एक जण त्याला हाताला धरून आत न्यायला लागला तेव्हा आपाने विचित्र नजरेने एकवार सुमनला आरपार पाहिलं. त्या नजरेतला भाव सुमनला कळला आणि ती कळवळली.

तो नोकर आपाला घेऊन मानिकोमच्या बंद दरवाज्यापाशी आला आणि तो उघडू लागला. त्या बरोबर “ नको, नको ” म्हणत आपा धावत बाहेर आला. येता येता वाटेत डॉक्टरच्या तपासायच्या टेबलावर आपटला, आणखीन काहीतरी गडगडत खाली पडलं. पण त्या पोलिसाने पाठीमागून मिठी घालून त्याला पकडलं. मग तो पोलिस आणि हॉस्पिटलमधले दोघे-तिघे जण मिळून त्याला पकडून ओढीतच आत नेलं. तो “ नाही, नको, नाही नको, ” करीतच होता. मानिकोमच्या आत दूरवर पोचेपर्यंत त्याचा आवाज ऐकू येत होता.

ते बघून सुमन लहान मुलासारखी मोठमोठ्याने रडायला लागली. “ गोविंद, आपण आपाला घेऊन परत जाऊ या ! ”

बघितलं तर गोविंदच्या डोळ्यांतून देखील अश्रू सांडत होते. इतक्यात् जीपचा हॉर्न वाजू लागला. तो पोलिस “ या ” म्हणून बोलवीत होता. गोविंदने आपले अश्रू पुसले आणि सुमनच्या भोवती हात घालून तिला घेऊन तो जीपजवळ

गेला. खाली येईपर्यंत ती रडतच होती.

मामीने दिलेली पोळ्यांची पिशवी गोविंदच्या हातातच लोंबकळत होती. जीपने त्यांना खाली आणून सोडल्यावर सुमनने म्हटलं, "गोविंद, तू थोडी पोळी खा."

"तू नाही का खाणार?"

"नको रे, मला नको."

"मग असू दे. मलाही नको!"

"दोघं बसून खाऊ थोडी थोडी."

वाटेत बाजूला एका झाडाचं कोंडाळं सारखं होतं. जवळच नळ पण होता. मग तिथं बसून दोघांनी थोडी थोडी पोळी खाल्ली. सुमन एकच तुकडा हातात घेऊन बसली होती आणि तोंड हलवीत होती. गोविंदचं खाऊन होईपर्यंत ती थांबली. मग उरलेली पोळी त्यांनी तशीच झाडाच्या मुळाशी टाकली. नळावर जाऊन ती पाणी प्यायली आणि बसस्टँडवर आली.

इतकं होईपर्यंत दुपारचे साडेतीन वाजले. गडावर जायची बस सुटायची झाली होती. अगदी सुटता सुटता त्यांनी ती पकडली.

गोविंदने काळजीच्या स्वरात म्हटलं, "गडावर पोचेपर्यंत काळोख होईल. घरी जायला काही मिळालं नाही तर कुठे राहणार?"

"काय होईल ते होईल. आधी गडावर तर जाऊन पडू."

बसमधे ती दोघं चिकटूनच बसली होती. लग्न न झालेल्या मुला-मुलीने असं चिकटून बसणं विचित्र वाटत होतं. वाटेत ती काहीच बोलली नाहीत. सुमन आपाच्या आठवणीने व्याकुळ होऊन गप्पच होती. गोविंदला देखील तिच्याजवळ काही बोलावंसं वाटत नव्हतं.

बसमधून बोरीच्या पुलावरून जुवारी नदी पार करताना त्याने एवढंच म्हटलं, "हीसुद्धा काळ्या नदीसारखीच नदी, नाही?"

त्यावर सुमन म्हणाली, "पणजीला होती तीसुद्धा काळी नदीसारखीच. डोंगर आणि गावंदेखील कारवारसारखीच. लोकांचंबोलणं देखील कारवारसारखंच, कोकणी."

ती गडावर पोचली तेव्हा वरच्या गावाला जायला गाडी, बोट, होडी काहीच नव्हतं. काळोख पडत चालला होता, आता काय करावं सुचत नव्हतं. पैलतीरावर कोडीबागमधे नांगरून ठेवलेल्या दोन-तीन बोटी काळोखातून सुद्धा दिसत होत्या. त्यांची शिडं गुंडाळलेली होती आणि उघड्या दांड्या तेवढ्या आकाशात शिरल्यासारख्या दिसत होत्या. लगबगीनेच ती लाँचमधून

कोडीबागला गेली.

सगळ्या बोटी अगदी रिकाम्या होत्या. एकाच बोटीमधे फक्त एकच गृहस्थ बोटीच्या तळाशी बसून काहीतरी करीत होता. जवळच एक दिवा पेटत होता. आणि त्या माणसाचं डोकं तेवढं दिसत होतं.

गोविंदने बोटीच्या फळीवर पाय ठेवून विचारलं, ''बोट कधी जाणार आहे ? ''

त्याने तसंच पाठमोरं बसूनच सांगितलं, ''आता कुठली बोट ? उद्या पहाटे उजाडल्यावर जाईल. खारगेकरांचं भात आणलं होतं मिलवर द्यायला. आत्ता कांडायला लागलेत वाटतं. ''

''आम्ही गोव्याला गेलो होतो. उशीर झाला आहे, बोटीतच बसून राहतो. ''

त्याने मागे वळून पाहिलं. तो बराच वयस्कर होता, चेहऱ्यावर सुरकुत्यांचं जाळं पसरलं होतं पण अंगकाठी दणकट होती. केस झडले होते, उरलेले पिकले होते. सुरकुत्यांनी भरलेल्या चेहऱ्यामुळं वयस्कर माणसाचं डोकं एखाद्या तरूण शरीरावर ठेवल्यासारखं वाटत होतं. तो म्हणाला, ''नदीवर उघडी बोट, कार्तिकी वाऱ्याची थंडी आणि तुम्ही रात्रभर इथं बसणार ? कुठंतरी नातेवाईकांकडे वगैरे जाऊन राहा रात्रीपुरतं. ''

गोविंदने विचारलं, ''काय करावं, सुमन ? आहे कुणी ओळखीचं ? ''

''आहेत बरेच लोक ओळखीचे. पोलिस लाईनमधला रामदादाचा मुलगा नाही का ? पण आपण कुठंच जायचं नाही, इथंच बसून राहू या रात्रभर. ''

''तुला भीती नाही वाटणार ? ''

''तू पुरुष असताना मला कसली भीती ? ''

आता गोविंदलाही खरोखर तिथंच बसून रात्र घालवावी असं वाटलं.

''मामा, आम्ही इथंच बसतो. '' म्हणत ती दोघं झावळाच्या विंगमध्ये जाऊन बसली. डोक्यावर तेवढी झावळं आणि चारी बाजू उघड्या. वारा एकदम आतच शिरत होता.

सुमन खुरमांडी घालून परकर पायांपर्यंत ओढून घेऊन पायांना मिठी घालून बसली होती. गोविंद बराच वेळ तसाच उभा होता.

त्या बोटवाल्या माणसाने खाली चूल पेटवली. एकीकडे तो विस्तव सरकवत होता तर दुसरीकडे मडक्यामधे डाव घालून ढवळीत होता. त्या मडक्यातून सारखा आवाज येत होता. ती चूल, मडक्यातलं ते शिजणं, ते सगळं बघून सुमनला भुकेने पोटात भगभग पडल्यासारखं झालं. पण ती गप्पच

राहिली. खरं तर दोघांनाही भुकेबद्दल काहीतरी बोलावं असं वाटत होतं. पण दोघंही गप्पच!

त्या माणसाने मडकं खाली उतरवलं. मग तो देवाची नावं, काहीतरी गायल्यासारखा स्वतःशीच बोलत राहिला.

थोड्या वेळाने त्याचं ताट वाजलं. तो ताटात भसाभसा पेज वाढून घेत होता. त्याने विचारलं, ‘‘खालच्या वाड्यावरच्या गणेशची मुलगी ना ग तू? तुम्ही कोकणी आणि आम्ही भंडारी.’ आम्ही शिजवलेलं तुम्हाला चालणार नाही. नाहीतर ताटात घालून दिली असती ताटभर पेज.’’

सुमनला आधी त्याने आपल्याला ओळखलं कसं याचंच आश्चर्य वाटलं. मग ती म्हणाली, ‘‘नाही मामा, जास्त शिजवली असल्यास दे तू ताटलीभर पेज.’’

‘‘एक जण जेवणारा असला तरी दोघाचं शिजवण्याची रीत आहे आमची. कधी कुठला पाहुणा येऊन दारात थडकेल याचा नेम नसतो. पण तुझं खरंच आश्चर्य वाटतं मला.’’

त्याने दुसरं ताट काढलं. त्यात पाणी घालून फेकून दिलं आणि ताट भरून ते बोटीत आत सरकवलं. सुमनने त्वरेने ते उचललं आणि गोविंदला म्हटलं, ‘‘जेव.’’

गोविंद बावचळून उभा राहिला. सुमनने जरा दटावूनच म्हटलं, ‘‘जेव म्हणते ना? अन्नाला बाट नाही. ते नेहमीच पवित्र असतं.’’

‘‘त्याच्यासाठी नाही ग. तू नाही जेवणार?’’

सुमन हळूच कानात सांगितल्यासारखी म्हणाली, ‘‘तू जेव आधी. उरलं तर मी जेवीन.’’

आणि खरंच ती दोघं अर्धं अर्धं ताट पेज जेवली. आधी गोविंद अर्धी पेज जेवला मग उरलेली सुमन जेवली. आता त्यांची भूक मेल्यासारखी झाली.

आता हळूहळू सगळं शांत व्हायला लागलं. कोडीबागचे दिवेदेखील एक एक करून सगळे विझले. दूरवरच्या तांदळाच्या गिरणीचा तेवढा ‘कुक् कुक्’ आवाज येत होता. या वयस्कर माणसाने एक पांघरूण त्यांच्याजवळ फेकलं. ‘‘माझ्या अंगावरचं एक तुम्हाला देतो.’’

ती चादर का कांबळ, काळोखात सुमनला काही कळलं नाही. तिने ते जवळ ओढलं आणि अंगाभोवती लपेटून घेतलं, ‘‘गोविंद, मी थंडीने गारठते आहे रे!’’

गोविंद गप्पच राहिला. त्या बोटवाल्याने गोणपाटाचं एक पोतं पुढच्या

उघड्या बाजूवर टाकलं. " वारा नाही लागायचा फारसा. " मग तो तळघरात गेल्यासारखा बोटीच्या तळभागी गेला. जरा वेळ कण्हत होता. हळूहळू कण्हण्याचा आवाज बंद झाला.

सगळा परिसर शांत, स्तब्ध होता. मधेच बोटीच्या दांड्या वाऱ्याबरोबर हलायच्या आणि त्यांना बांधलेल्या दोरखंडाचा ' कर्र कर्र ' आवाज यायचा. एखादी छोटीशी लाट येऊन बोटीवर आपटायची आणि ती फुटल्याचा धस्स् आवाज यायचा. मधेच वाऱ्यासरशी खारटसा, कुबटसा वास वाहत यायचा आणि नाकात शिरायचा. वरती आकाशात चांदण्या एवढ्या संख्येने फुलल्या होत्या की डोळे लावून बसल्यास अंतपार लागत नव्हता. ह्या चांदण्यांचा थोडा थोडा एकत्रित उजेड काळोखावर पडायचा आणि त्यामुळं ओहोटीने उघडे पडलेले दोन्ही तीर जरा जरा दिसायचे.

बोटीच्या छप्पराचा मागचा भाग उघडाच होता. गोविंद तिथेच बाहेर नजर लावून बसला होता, निसर्गाच्या त्या गूढ चमत्काराला दृष्टी ताणून पाहत होता. सुमन जवळच चादर पांघरून झोपली होती. गोविंदला उगाच वाटत होतं, कदाचित ती रडत असेल, तिच्या डोळ्यांना हात लावून पाहिल्यास ते नक्कीच ओले लागतील.

" सुमन, तू झोप हं. "

" इतक्या दूरच्या गावात, ओळख-पाळख नसलेल्या माणसांमधे आपाला सोडून आलो आम्ही. ते हॉस्पिटल का तुरुंग ! "

" बरा होऊन येईल तो. मग पूर्वीसारखाच नीट बोलेल, जमीन कसेल, विहिरीवर रहाट धरेल. "

" तुला थंडी नाही वाजत, गोविंद ? "

" असू दे. झोप तू आता. "

सुमनला त्याला काय सांगावं तेच कळत नव्हतं. दिवसभर ती पाय मोडेपर्यंत एकत्र हिंडली, आता रात्र झाल्यावर मात्र संबंध तुटल्यासारखं वाटत होतं. ती सगळी चादर गोविंदाला द्यावीशी पण वाटत नव्हतं. तो बोटवाला पण बरा, दोघांनाही एकाच ताटात पेज देतो आणि आता चादरही दोघांना मिळून एकच !

सुमनला खरंच खूप थंडी वाजत होती आणि पांघरुणात शिरून पडावं असं वाटत होतं.

बसल्या ठिकाणीच गोविंद आता पेंगू लागला. सुमन त्यालाच बघत होती. दिवसभर इतका हिंडल्यावर झोप येणारच. पण या थंडीत कसा झोपू

शकेल तो? सुमनचा जीव तळमळू लागला.

"गोविंद, झोप रे!" त्याला जागा करून दिल्यासारखी सुमन बाजूला सरकली. एवढीशीच तर जागा होती ती!

तो जरा पलीकडे येऊन आडवा झाला. गुडघे पोटाशी घेऊन, दोन्ही हात पांघरून तो झोपला. सुमन टक लावून त्याला बघत होती काही वेळ. त्याच्याविषयी लहानपणापासून असलेल्या सगळ्या भावना एकदम उचंबळून वर आल्या. हा माझा जिवाभावाचा सखा, थंडीत असा उघडाच झोपला आहे... ती एकदम त्याच्याजवळ गेली. अंगावरची अर्धी चादर तिने त्याच्यावर पसरली. मग त्याच्या उबेला गेल्यासारखी त्याला बिलगली.

"मला थंडी वाजते रे, गोविंद!"

सुमन त्याला खेटून त्याच्या उबेला गेली आणि काळजी मिटल्यासारखी शांत झाली. क्षणार्धात तिला झोप लागली. त्या थंडीत ऊब देणारा सुमनच्या कुशीत असलेला गोविंद पूर्ण समाधानात काही वेळ हवेतच तरंगत होता. आपण सुमनच्या कुशीत शिरलो आहे की आईच्या, ते थोडा वेळ त्याला कळलंच नाही... किती चांगली आहेस ग तू, सुमन! तुझ्या उबेत केवढी गोडी! तो जास्तच तिला बिलगला. त्या उबेचं समाधान घेता घेता त्याला झोप लागली.

सकाळी 'धप्प, धप्प' कुणीतरी बोचकी आणून बोटीत टाकत होता. त्या आवाजाने सुमनला जाग आली. ती लगबगीने उठून बसली. तिने सगळी चादर नीट गोविंदच्या अंगावर घातली. अजून काळोखच होता पण बंदराला जाग आली होती. गिरणीत कांडून आणलेले तांदूळ बोटीत टाकत होते. वरच्या गावाहून सामान न्यायला आलेले दुकानदार आपला माल बोटीत भरत होते. वरच्या गावाला जाणारे लोकही बोटीत येऊन बसले होते. इतकं होईपर्यंत चांगलंच उजाडलं होतं. उभा राहून कुणीतरी सांगत होता, "वारा फिरला आहे. आता शीड सोडून बोट सोडा."

सुमनने लगबगीने गोविंदला उठवलं, त्याचा चुरगळलेला शर्ट ओढून नीट केला.

शीड सोडल्यावर त्यात वारा भरला, ते फुगलं आणि बोट जाऊ लागली.

ती घरी पोचली तेव्हा गोकुळमावशी सांगत होती, "हा रमेश रात्रभर रडत होता बायूलमावशीच्या आठवणीने, सारखा बायूलमावशी, बायूलमावशी करत होता. त्याला समजवता, समजवता नाकी नऊ आले."

सुमनने दोघांनाही दोन्ही कडेवर घेतलं आणि ती घरी आली. दार उघडून

त्यांना घेऊन ती घरात गेली आणि मागच्या पुढच्या आठवणींनी गलितगात्र झाली. काहीही न करता नुसतं रडून घ्यावंसं वाटलं तिला. पण पोरं भुकेलेली असणार, चुलीत विस्तव घालायचा होता. घरात थेंबभर पाणी पण नसणार. तिने घागर कळशी कडेवर घेतली आणि ती विहिरीवर गेली. माझघरात ठेवलेली बायची मुलगी जोरजोरात रडू लागली. तिला वाटलं, नाही जमणार माझ्याच्याने ह्यांचं करायला. ह्यांना कुठंतरी पोचवायला पाहिजे. कुठं गेला ह्यांचा बाप, कुठल्या मसणात ?

गेल्या वर्षी शेत नांगरायच्या आधीच आपा माणसातून उठला होता. बैलांची जोडी, औत सगळं होतं. सुमनने विठोबाच्या पाया पडून जोत बांधून घेतलं, बरोबर त्याचंही शेत कसून घे म्हटलं. विठोबाकडे बैल नव्हतेच. तो दरवर्षी खंड देऊन शेत लावायचा. त्याने दोघांचीही शेतं कसून घेतली, बरोबरच पेरणीही केली. नंतर वेणणी, खुरपणी वगैरे करायला कामवाल्या लावाव्या लागल्या. सुमनपण त्यांच्या बरोबरीने काम करीत होती. एका बाजूने बायचं, आपाचं आजारपण, बायचा मुलगा, दुसरीकडे शेताचं काम. जीव नकोसा व्हायचा. तरीपण एका आगळ्याच उमेदीने ती वावरायची, मी हे बायकरता करते ही ती उमेद !

ह्या वर्षी शेतात अजून नांगर लावला नव्हता. सुमनला कसलाही उत्साह नव्हता. बैलांना खायला प्यायला द्यायची. शेतांच्या मेरा-धारा करून घ्यायची. पण पुढे एकटीने काय करायचं कळत नव्हतं. बायच्या मुलांकरता धडपड करायलाच हवी ! उद्या आपा बरा होऊन आल्यावर म्हणेल, “सुमन, शेत ओसाड पाडायचं ठरवलं होतंस का ग ?”

ती पुन्हा कामाला लागली. विठोबाच्या पाया पडून बैल बांधायला लावले. कामवाल्या लावल्यास अर्धं पीक त्यांच्याच उरावर घालावं लागतं. आता सगळं काम मी एकटीच करणार. फक्त मळणीच्या वेळी चार लोकांना घ्यावं ! कोडीबागहून एक भंडारी बाई यायची. ती नारळ, तांदूळ, भात, पातळ गूळ काहीपण विकत घ्यायची. सुमन मधे मधे तिला उरलेले नारळ, भात वगैरे विकायची. ते पैसे वरच्या खर्चाला उपयोगी पडायचे -- बायच्या मुलीचं दूध वगैरे आणायला.

मुलगी तीन महिन्यांची होईपर्यंत पुष्कळ रडायची, रडून रडून हैराण व्हायची. पोटाला दिलं, कुशीत उबेला घेतलं तरी गप्प राहायची नाही. मग तिच्याबरोबर सुमनही रडायची. तसं फारसं कुणी तिला उचलत नसे, फार

लाड होत नव्हते. आता आता तिला जमिनीची सवय झाली होती. तरीपण मधेच, एखाद्या संध्याकाळी वगैरे ती अचानक किंचाळून रडायची. मग सुमनला बायची इतकी आठवण यायची! रडत रडत ती बायकडे बोलायला लागायची, "माझ्याच्याने होत नाही ग, बाय! काय करू मी? का म्हणून तू माझ्याकडून वचन घेऊन एवढं मोठं संकट माझ्यावर घातलंस?"

वाड्यावरचं कुणीतरी मधेच तिच्या परोक्ष अपरोक्ष म्हणायचा, "सुमनने कशासाठी हे अंगावर घेतलं आहे? त्यांची मुलं त्यांच्या घरी नेऊन पोचवावी हिने. दारात ठेवायची आणि गप्प यायचं."

सुमनला कळत होतं, या पोरांबद्दल कुणाला फारशी माया नाही आणि त्यांना कुणाचाही आधार नाही. आता तर त्यांना दूर लोटणं मला शक्यच नाही!

एक दिवस मुलगी न थांबता रडत होती. दिवेलागणीच्या सुमारास तिने रडायला सुरुवात केली ती रात्री दहा वाजेपर्यंत रडत होती. जो तो दारात, खिडकीत उभा राहून ऐकत होता पण कुणीही पुढं येऊन उपाय सांगत नव्हता, थांबवायचा प्रयत्न करीत नव्हता. सुमनला वाटलं रडण्याने हे लोक कंटाळले असावेत.

पलीकडच्या घरातील दसमती दारात येऊन उभी राहिली. तिने म्हटलं, "आईचा स्तन हा देवाने दिलेला घास. पोर आईच्या स्तनाला आसुसली आहे, तोंडात स्तन द्यायला हवा!"

बारीक किडकिडीत दसमती, सुकलेल्या सुरूच्या फांदीसारखी उभी होती. सुमनने नीट निरखून पाहिलं तर नीटशी छातीच नव्हती. सुमनच्या लक्षात आलं, ही मुलं नसलेली वांझ बाई! पण तिचे शब्द 'पोर आईच्या स्तनाला आसुसली आहे' दाही दिशांतून फिरत तिच्या काळजाला भिडले. "होय, मी पण हे शब्द कधीतरी ऐकले असतील! मी पण आसुसलेली असेन! ह्या शब्दांचा अर्थ तुझ्या-माझ्याइतका आणखी कुणालाच कळणार नाही ग, दसमती वैनी!"

मूल न थांबता रडत होतं. सुमनला कळत होतं, शेजारचे कंटाळलेले कान खिडकीला लागले आहेत. ती रडायची थांबावी म्हणून ती सारखी तिला आपल्या छातीशी धरायची. आईसारखीच मी तिची मावशी, आणि ती माझ्या कुशीत अशी रडते आहे! तिचं अंग थरथरलं.

ती आत गेली. एक एक करून तिने पोलक्याची बटणं काढली. मुलीला छातीशी धरून स्तन तोंडात दिला. सुमनला मरणाच्या गुदगुल्या होत होत्या.

पण ते मूल खरंच तो कोरडा स्तन– कुमारीचा स्तन चुरूचुरू ओढत होतं. हळूहळू ती पेंगू लागली आणि सुमनच्या कुशीत झोपून गेली.

त्यानंतर ती कधीही अशी रडायला लागली की सहन न होऊन सुमनलाही रडू यायचं तेव्हा ती तिला घेऊन स्वयंपाकखोलीत जायची, एकेक बटण काढून तिला छातीशी धरायची. कधी कधी तिला राग यायचा. ढकलून दिल्यासारखी तिला बाजूला काढून कुठेही गोणपाटावर घालून म्हणायची, 'मर, रड!'

बायच्या नवऱ्याचा पत्ता काढायचा तिने खूप प्रयत्न केला. कुणीही बाहेरगावाहून आला की जाऊन ती विचारायची, "हुळगेचा तो श्रीधर, कुठं आहे, माहिती आहे का हो तुम्हाला?" तिला वाटायचं, एकदा तो भेटला की त्याच्या स्वाधीन करीन ही मुलं!

आपाला पणजीला हॉस्पिटलमधे ठेवल्यास आज महिना झाला. ठेवल्याच्या तिसऱ्या दिवशी कृष्णानंद धावत आल्यासारखा पणजीहून आला. आल्या आल्याच त्याने सुमनला येऊन सांगितलं, "थोडी चुकामूक झाली. लवकर येईन म्हणून साहेबांबरोबर गेलो होतो तो तिथंच अडकलो. समुद्राच्या किनाऱ्यावर एक प्रेत येऊन पडलं होतं. एकदा ताब्यात घेतलं की मग कसली होते सुटका? संध्याकाळी तुम्ही आपाला जीपमधे घेऊन गेलात आणि मी पोचलो."

"आपाला बघायला गेला होतास तू?"

"सकाळीच त्याला बघून आलो ना."

"कसा आहे?"

"औषधोपचार चालू आहेत. सकाळी गुंगीत असल्यासारखाच होता. बरा होईल तो. एक नर्स आहे तिथं ओळखीची, तिला मी सगळं सांगितलं आहे. महिना दीड महिना तरी राहावं लागेल म्हणत होती."

"तुझ्यावरच विश्वासून नेऊन घातला आहे, भाऊ. तुलाच पाहावं लागेल सगळं."

"तू मुळीच घाबरू नकोस, सुमन."

"मधून मधून जाऊन चौकशी कराशील ना रे?"

"हो ग, सगळं बघतो आणि बरा झाला की सरळ घरीच घेऊन येतो. एकदा वर्दी घालूनच जातो आणि डॉक्टरला सॅल्यूट वगैरे मारून सगळं सांगेन म्हणतो."

सुमनला वेगळाच धीर आणि उत्साह आल्यासारखं वाटलं. ती कामाला

लागली. काळजावर दगड ठेवून तिने ते दोन महिने सारं सहन केलं, आपा बरा होऊन येणार या आशेने. आपा आला की मी विचारणार, "आपा, या मुलांचं काय करायचं?"

पण तिला एका नव्या चिंतेने ग्रासलं होतं. आपाला बायबद्दल माहिती असेल? बायला नेली तेव्हा तो माणसांतून उठलेलाच होता. बरा होऊन आल्यावर बायबद्दल कळल्यानंतर काय करील?

वस्तीतल्या बायका तिला सांगायच्या, आपा बरा होऊन आल्यावर तू बायच्या आठवणीने रडा-बिडायचं नाही हं. त्यालाही रडू द्यायचं नाही. परत डोकं फिरेल त्याचं!

एके दिवशी तिन्हीसांजेला कृष्णानंद आपाला घेऊन घरी आला. आपा गेटमधे दिसल्याबरोबर सुमन धावतच त्याच्याजवळ गेली. आता तिला, "आमची बाय गेली रे आपा" म्हणून आपाला मिठी मारून हंबरडा फोडावंसं वाटलं होतं पण तिने तसं काहीच केलं नाही. "आपा आला" म्हणत ती तोंडभरून हसली आणि त्याचा हात धरून त्याला घरात घेऊन आली. तिने त्याला तांब्या भरून दिला. माडाच्या आळ्यापाशी हातपाय धुऊन तो माजघरात येऊन बसला.

रमेश तिथं खेळत होता तो अचानक थांबला आणि पायरीपाशी गप्प बसला. आत झोपलेली गीतू झोपेतून उठत, चुळबुळत होती. सुमन लगबगीने आत जाऊन तिला 'उगी उगी' करू पाहात होती.

गणेश आल्याचं कळल्यावर वस्तीतले कोण कोण माजघरात येऊन बसले होते, मुकाटच. कुणालाही एखादा शब्द बोलायचा धीर होत नव्हता, ह्याला कितपत कळलं असेल?

कृष्णानंदला बाहेर नेऊन सुमित्रा, यशवंत वगैरे विचारीत होते, "त्याला कितपत माहीत आहे रे?"

"कळलं असावंसं वाटतं. हॉस्पिटलमधली नर्स सांगत होती. एक दिवस म्हणे दिवसभर "माझ्या लेकी, माझ्या बाळी ग" करीत पुष्कळ रडला. दोन-तीन दिवस नीट जेवलासुद्धा नाही म्हणे."

"तुला काही विचारीत होता का?"

"बसमध्ये विचारीत होता, मुलं कुठं आहेत म्हणून. मंजूळचा नवरा आला होता का म्हणूनही विचारीत होता."

"त्याला कसं कळलं?"

“ माहीत नाही. ”

“ वेड लागलं म्हणून काय झालं? डोळ्यांसमोर घडलेलं कळलं नाही असं होईल? ”

“ पूर्ण बरा झाला ना रे तो आता? ”

“ डॉक्टरने सांगितलं आहे ना. पूर्ण बरा झाल्याशिवाय ते सोडीत नसतात. शिवाय गोळ्याही दिल्या आहेत. त्या महिनाभर तरी घे म्हणून सांगितलं आहे. ”

“ सुमनला सांगायला हवं. ”

मग सगळे माजघरात येऊन बसले. सुमित्राने धीर करून म्हटलं, “ गणेशबाब, गप्पच बसला आहेस. बोल ना काहीतरी. ”

“ काय बोलू कर्माच्या कथा? बाय गेली ना ग? आता मी पण मरायचंच. ”

“ मुलं आहेत ना, गणेशबाब? ”

“ कोण पोसणार आहे त्यांना? त्या पोरीच्याच उरावर घालायची ना ही मुलं? काही खरं नाही, सुमित्रा. आम्ही सगळ्यांनीच बरोबर जाऊन नदी जवळ करावी आता. ”

“ जास्त मनाला लावून घेऊ नकोस. आताच बरा होऊन आला आहेस. नाहीतर... ”

“ नाहीतर परत वेडा होईन ना? झालेलाच बरा होतो. आता कोण भोगणार हे? ”

सगळेजण गेल्यावर सुमनने विचारलं, “ आपा, जेवतोस ना? ”

“ मुलांच्या पोटात घातलंस ना ग? ”

“ हो, रमेश थोडा भात जेवला होता. गीतूकरता दुधाचा एक डबा आणून घेतला आहे मी, कारवारहून रत्नाकरकडून. ”

“ बायूल, इथं बैस ना ग जरा. ”

सुमन मधल्या दारात बाहेरच्या बाजूने बसली. काही वेळ दोघंही गप्पच.

“ बायूल बायला खूप त्रास झाला होता का ग? ”

“ खूप रोडावली होती ती. तापही यायचा. पण शेवटपर्यंत शुद्धीवर होती. ”

“ डॉक्टरकडे नेली नाही का? ”

“ डॉक्टर नकोच म्हणत होती. शेवटी न्यायची तयारी केली होती पण... ”

“ नवऱ्याकडचं कुणी आलंच नाही ना न्यायला? ”

“ नाही? ”

“ बायूल, मला ना डोळ्यांसमोर काहीतरी दिसल्यासारखं वाटायचं ग. लाल जास्वंदीची फुलं, तिरडीच्या काठ्या, पांढरं वस्त्र! उन्हाच्या लाटेवर बसून पुष्कळ माणसं आल्यासारखी... पण कसलाच अर्थ लागत नव्हता. बरा झाल्यावर सगळं लक्षात आलं, आता बाय राहिली नाही. हरदयाच्या आतून कुणीतरी मला सांगत होतं, बाय गेली म्हणून! ”

सुमनला काळीज फुटून रडू येत होतं. पण तिने ते दाबून ठेवलं. बोलता बोलता आपा रडायला लागला. सुमनने मोठ्या निर्धाराने स्वतःला थोपवून धरलं.

इतक्यात गोविंद आला. “ मामा, बरा आहेस ना ? ” म्हणत तो जवळ बसला.

“ आता एवढ्या वेळाने मामाची आठवण झाली का रे ? ”

“ मी सायकल घेऊन किन्नरला गेलो होतो. तिथल्या निरंकाराच्या देवळासाठी मामानं एक घंटा देण्याचा नवस बोलून गेले होते. ती कधी घेऊन येऊ म्हणून मिरशाला विचारायला गेलो होतो. ”

“ कधी घेऊन ये म्हणाला तो ? ”

“ मिराशाला विचारलं तर तो मक्तेसुराला विचार म्हणाला. मक्तेसुराला विचारलं तर तो भटाला विचार म्हणाला. पण भट घरी नव्हता. ”

“ मग मामाला सांगितलंस तू ? ”

“ मामा म्हणतो, एक दिवस जातो आणि घंटा लोंबकळवून येतो देवासमोर. त्यांचं त्यांच्याकडे. घंटा आणून ठेवली त्याला वर्ष झालं. ”

“ कशाकरता सांगून घेतली होती घंटा ? ”

गोविंद लाजला, “ मी मॅट्रिकची परीक्षा पास झालो तर देवाला घंटा देईन म्हटलं होतं मामाने... ”

“ गोविंद, तुझं वय काय रे ? ”

“ अठरा संपून एकोणिसावं लागलं, मामा. ”

“ हो तेवढंच असेल. बायूलपेक्षा तीनच महिन्यांनी मोठा तू. ”

“ पण मामा, ती माझ्यापेक्षा हुशार आहे. ”

“ कितीही झालं तरी बायकांची हुशारी तेवढीच. पुरुष म्हणजे खांब! बाई म्हणजे आडा. सगळा भार आड्याच्या अंगावर पण नाव खांबाचं. ”

“ बायूल, जरा खोबरेल तेलाची बाटली आण, पाय चुरचुरू लागले आहेत. ”

सुमनने बाटली आणली. “ घे रे गोविंद, थोडं खोबरेल घे तळहातावर

आणि लाव जरा पायांना.''

"मी लावते" म्हणत सुमन पुढे झाली पण गणेशने तिला नको म्हटलं. गोविंदने एका तळहातावर आधी तेल घेतलं मग ते दोन्ही तळहातांवर घेऊन दोन्ही पायांना बरोबरच लावू लागला.

"गोविंद, तू मला घेऊन गेला होतास ना रे? मघाशी कृष्णानंद सांगत होता. मला आठवत नाही. खालून वर आकाशात पाहिल्यासारख्या काही पांढऱ्याशा इमारती डोळ्यांसमोर झळकतात.''

"ते आल्तिनो, मामा. पणजीहून आल्तिनो तसंच दिसतं.''

गोविंद तेल चोळीत होता. गणेशचं काळीज दाटून आलं. त्याचे तेलाचे ते दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन गणेश रडू लागला. काही क्षण मौनावस्थेतच गेले. सुमनला सहन होईना. तिने म्हटलं, "आपा, तू जेवून घे. मग औषधं घ्यायची आहेत.''

"मला नको ग बाळ, आणखी औषध. माझा हा आजार बरा होणारा नव्हे''

आत बायची मुलगी उठून मोठमोठ्याने रडत होती. गणेशने एकवार आतल्या बाजूकडे पाहिलं नि मग वैराग्य आल्यासारखा तो निमूटपणे बसून राहिला.

सकाळी उठल्यावर गणेश टेकडीच्या पायथ्याजवळून शेतांच्या कडांवरून उगाच फिरून यायचा. आणि गव्हाणीत गप्प बसून राहायचा. पण शेताबद्दल काहीच बोलत नव्हता. कुठे उन्हातान्हात वगैरे भटकून आला की तो कासावीस झाल्यासारखा वाटायचा आणि 'हुश्श' करून माजघरात येऊन बसायचा.

"आपा, शेताचं काय करावं म्हणतोस? मी विठोबाभाऊला कसून टाक म्हटलं होतं.''

"आता माघ येईल. शेत सुकून गेलं आहे. आता तो कसा कसणार आणि पेरणी करणार?''

"जोंधळे लावायचे म्हणत होता.''

"मला काहीच समजेनासं झालं आहे ग. अंगात ताकदही नाही आणि काहीही करायचा उत्साह पण नाही. शेत कसून टाकलं म्हणजे संपलं का? पुढची कामं नाहीत का?''

"गेल्या वर्षी मीच सगळं निपटलं होतं.''

"दोन मुलं, शेताचं काम, कसं होईल ग बाळ तुझ्याच्याने? मला

तर पाऊल टाकतानासुद्धा दम लागतो."

"कुणाला तरी खंडाने देऊ या."

"कोण लावणार? सगळेच खोटारडे. खंड खायचा खातील आणि शेतही हडप करतील."

"आपल्याच वस्तीतल्या कुणाला तरी खंडाने देऊ. पंढरीदादा करेल असं वाटतं."

गणेश काही बोलला नाही. दुसरे दिवशी सुमन घराबाहेर पडली आणि थेट पंढरीच्या घरी गेली.

तिथे गेल्यावर पाहिलं तर पंढरी पानं कापून विड्या वळत होता. बायको त्याच्यावर ओरडत होती, "केवढ्या मोठ्या विड्या बांधतो आहेस तू? तो तंबाखू कडक आहे. ओढतोस आणि खोकत राहतो."

सुमन गेली आणि माजघरात खांब्याला टेकून त्याच्यासमोर बसली. पंढरीची बायको पुढं आली, "काय ग सुमन?"

"काम होतं ग जरासं."

"काय झालं?"

"आपाच्याने आता शेतातलं काम होईलसं वाटत नाही. मी तरी काय काय म्हणून करणार? बायची पोरं आहेत ना ग? शेत खंडाने द्यावं म्हणते."

पंढरीची बायको सुमनच्या जवळ येऊन बसली. पंढरी जवळ सरकला. पण कुणी काही बोलेना. सुमन म्हणाली, "इतर कुणालाही दिलं तर विश्वास कसा ठेवायचा? उगाचं काळजी. वडील-चुलत्याकडे असल्यास भीती नाही. दादा, तुम्ही खंडाने करून घ्याल का?"

"कुणाला शक्ती आहे ग? आहे तेच आटपत नाही. शिकलेले लोक नोकरीला जातात. शेतं करायची ती आमच्यासारख्या न शिकलेल्यांनी नाहीतर पेन्शनर म्हाताऱ्यांनी. मी सांगतो बघ तुला, सुमन, आणखी चारच वर्षांनी गावातली शेती ओसाड नाही पडली तर बघ."

"ते असू दे, दादा. आमच्या शेताचं अंगावर घेतोस का बघ. कारण आपल्या चुलत्याकडे असल्यास शेत नीट तरी राहील."

"हो, आमच्याच घराण्याची पूर्वाचाराची जमीन ती. ओसाड पडू देणं योग्य नव्हे पण खंड काय घेणार तुम्ही?"

"खंडीच्या शेताला चार खंडी भात देतात ना गावातले लोक?"

"ते आधीचं सोडून दे. आता शेतात राबायला कुणाला हवंय? आणि पूर्वीसारखी शेतं पण पिकत नाहीत आता. खंडीला तीन खंडी देईन."

" तूच बघून न्यायाने दे, दादा."

" किती असेल शेत ?"

" चिंचेजवळचं दोन खंडी, पायथ्याकडचं दहा कुडव आणि म्हातारआंब्याकडचं दीड खंडी. सगळं चार खंडी."

" आणि हडगरातलं ?"

" ते खंडीचं शेत मीच करून टाकीन कसंही करून. खंडून नाहीतर कुणाकडून तरी कसून घेऊन."

पंढरीने हसून म्हटलं, " बरीच हुशार आहेस हं तू सुमन! जवळचं आणि चांगलं पिकणारं शेत आपण ठेवून घेतेस ?"

" चिंचेजवळचं शेतदेखील चांगलंच आहे. तुला माहीतच आहे, दादा."

" पण बरंच लांब आहे ग."

" असू दे दादा, म्हणूनच तर खंडाने देते ना ? शेत मात्र स्वच्छ ठेवलं तर पुरे."

त्यावर पंढरीची बायको तडकन म्हणाली, " आमचं शेत पाहिलं आहेस ना तू ?"

ती जवळच बसली होती. महिनाभर तेलाचा वास नसल्यासारख्या तिच्या केसांच्या झिंज्या विस्फारल्या होत्या. नेसलेल्या लुगड्याला देखील एक प्रकारचा वास येत होता. ती राबायची खूप पण कुठंच नेटकेपणा नव्हता. पंढरी मात्र कडक स्वभावाचा होता. वस्तीत कुणीही एवढ्या मोठ्या मिशा ठेवल्या नव्हत्या. त्याने मोठ्या पिळदार मिंशा ठेवल्या होत्या. त्याच्या त्या मिशा नि लुकलुकणारे प्रखर डोळे. त्यामुळे त्याच्याकडे पाहायचा धीर होत नव्हता.

सुमन उठून निघाली. त्याच्या अंगणाच्या कडेपर्यंत पोचलीच नसेल तेवढ्यात माडाचं एक सुकलेलं (चुडीत) झावळ सर्रकन येऊन तिच्याजवळ पडलं. पिडारा चुकला पण झावळाचा स्पर्श तिच्या अंगाला लागला. पंढरीच्या बायकोने विचारलं, " अग, अंगाला लागलं का ते ?"

" होय मावशी, अंगावरून पडलं."

" मग ते शेतात नेऊन जाळायला हवं. त्याची तीन पानं चिमटीत पकड आणि ओढत नेऊन शेतात जाळून टाक."

" विस्तव ?"

पंढरीची बायको आत गेली आणि कौलावर निखारे घालून ती बाहेर आली. कौल तिने सुमनच्या हातात दिलं. चिमटीने चुडीत ओढीत, हातात विस्तव घेऊन सुमन शेतात गेली आणि तिने ते जाळून टाकलं.

मागून पंढरी म्हणत होता, “ चांगलं चुडीत उगाचच जाळून टाकावं लागलं. ”

औषध घे म्हटलं तर गणेश कसाच ऐकत नव्हता. वैराग्य आल्यासारखा नुसताच फिरायचा किंवा माजघरात गप्प बसून राहायचा. कधीतरी मुलांना उचलून खेळवायचा. खेळवता खेळवता मनाने इतका हळवा व्हायचा की वाटायचं आता हा रडायलाच लागेल.

कधीतरी थंडीने कुडकुडल्यासारखं करीत विचारायचा, “ बायूल, बायचा नवरा येणारच नाही का ग ? ”

“ मी काय सांगू आपा ? ”

“ अग, या मुलांचं काय करायचं ? ”

“ आता आहेतच ना इथं ? ”

“ अग, पण तुला तुझा भविष्यकाळ नाही का ? लग्न व्हायच्या आधीच दोन मुलांची आई. उद्या यांना कुठं टाकशील आणि लग्न करून जाशील ? ”

सुमन गप्पच राहायची. आपाही मुकाट्याने घुम्म होऊन बसायचा. तो तसा बसला की सुमन सैरभैर व्हायची. “ आपा, औषधं तरी घे ना. ”

“ माझ्या जिवात कसलंच त्राण उरलं नाही ग, बायूल आता ! औषधं घेतल्याने काय होणार ? मी परत वेडा होईन, म्हणून घाबरतेस ना तू ? पण आता तरी कुठं बरा आहे मी ? माझं हे कायमचंच आता. ”

माघ पौर्णिमिच्या आठ दिवस आधी आपाला पणजीहून आणलं होतं. आता चैत्र संपून वैशाख लागला होता. या तीन महिन्यात तो खरंच सुधारला होता की वेड पांघरूनच होता काहीच कळत नव्हतं. फक्त नीटपणे बोलायचा म्हणून तो सुधारला म्हणायचं. नाहीतर त्याने संसारातून पूर्ण अंग काढून घेतलं होतं.

वैशाखाचा रखरख सुरू झाला आणि तो बावचळल्यासारखं करायला लागला. फिरायला म्हणून जायचा आणि दुपारच्या प्रखर उन्हात कुठल्या तरी झाडाखाली बसून राहायचा. मग सुमन जाऊन घेऊन यायची. या वर्षी पाऊस लांबला आणि झाडां-झुडपांबरोबर गणेशही चक्रावू लागला.

एक दिवस रामदादाला बोलावून आणून सांगत होता, “ रामबाब, या वर्षी धाकटीचं लग्न करून टाकतो. कुणीही अमावास्या-पौर्णिमेला जन्मलेला फाटक्या लंगोटीवाला, फाटक्या लंगोटीवाला कुणीही चालेल. ”

रामबाब जरा वेळ गोंधळून त्याच्याकडे पाहत राहिला. मग त्याने

समजावल्यासारखं म्हटलं, " आता मृगाच्या पावसाचे दिवस आलेच. पाऊस लांबला म्हणून, नाहीतर आतापर्यंत शेतात राडा झाला असता. तिच्याजवळ ती दोन पोरं आहेत. त्यांना कुठं टाकणार आहेस ? त्यांना आधी एखादं ठिकाण बघ. "

रामबाब थांबत नसता निघून गेला. गणेश आत येऊन बडबडू लागला, " बायूल. बायला पोचवताना वाजंत्री वाजली नाही की ग ! आता मात्र वाजतील. "

सुमन चकित होऊन ऐकतच राहिली.

" गोविंदने बायचं क्रियाकर्म केलं ना ? आता तुझंही केल्याशिवाय त्याला मुक्ती नाही. माझं करायला वस्तीतले लोक आहेत, हातांत चूड घेऊन थांबले आहेत. तुम्हाला मात्र गोविंदने अग्नी द्यायला हवा. "

सुमनच्या डोळ्यांतून घळघळा आसवे गळू लागली.

आवडूआजी पिच्छा पुरवल्यासारखी पुनःपुन्हा म्हणत होती, " या नष्ट काटींनि चांगलं देवपण करणाऱ्या त्या घाड्याला अडथळा आणला आणि सगळाच विस्फोट झा़ला. कुणीतरी पाया पडून त्याला परत आणा. "

दुसरे दिवशी दुपारी सुमन बैलांना पेजेचं पाणी द्यायला गोठ्यात गेली तर दोन्ही बैल मोकळेच. तिला आश्चर्य वाटलं. त्यांची दावी खुंट्याला नव्हती. कुणी नेली असतील ? आपा कधीतरी इथं येऊन बसतो... तो पण कुठं गेला असेल ? चांदू, तू पाहिलं आहेस का रे आपाला ? शेत आता मी खंडाने दिलं आहे. तुम्ही आयतंच खायचं. "

ती गेली आणि अंगणात येऊन आपाची वाट बघत उभी राहिली. बाहेर उन्हाची रखरख इतकी जाणवत होती की शेतांकडे सुद्धा बघवत नव्हतं. तिला वाटलं हे रणरणतं उन्ह तुडवीत आपा आत्ताच कुठूनतरी येईल.

इतक्यात नदीच्या दिशेने उघडे बोडकेच दोघेजण धावत येताना दिसले. उन्हाच्या लाटेवर बसून ते पळताहेत असं वाटत होतं. कशासाठी, कुणाला एवढी घाई लागली असेल बरं ? "

ते वस्तीवर आले आणि फाटकापाशीच त्यांनी कुणाला तरी काहीसं सांगितलं. मग ते आणखीन कुठं गेले. सुमनला काय झालं आहे ते कळायच्या आधीच आणखीन चार-पाच जण आणि मघाशीचे ते दोघे, पुन्हा सगळे जण नदीच्या दिशेने धावू लागले. सुमनच्या छातीत धस्स झालं. " काय झालं असेल ? कुठं आग लागली का कुणाचं तारू बुडालं ? गोविंद, तू तरी जाऊन बघ ना रे जरा. "

काळोख पार करून, स्वप्नातून उठून आल्यासारख्या, चार-पाच जणी

सुमनला समजावीत होत्या. पण माझ्या मावश्या इतक्या लांब कशा? इतक्या परकी कशा? माझी आई ह्यांच्यात कशी नाही? ह्यांच्या कपाळीचं कुंकू कुणी नेलं? ह्यांच्या डोक्यातली फुलं कोमेजून कुठं पडली? माझी आई, माझी बाय, सवाष्णीचं मरण आलं ना त्यांना? मग तुम्हीच अशा बोडक्या का?''

"बाळ सुमन, मनाला लावून घेऊ नकोस. मन घट्ट करून ऐक! तुझ्या आपाने नदीकाठच्या काप्याच्या झाडाला टांगून घेऊन आत्महत्या केली!''

"मग मावशी, या सोहळ्याला माझी आई नको का ग? कुणीतरी माझ्या आईला आणा आणि आपाजवळ पाटावर बसवा ना रे! आपा गेला, आता तिची सगळी सौभाग्यलेणी उतरायला हवी! एकदाच मला आई-आपाला बरोबर बघू द्या! बाय आईच्या कितीतरी गोष्टी सांगायची मला. तिची ती परडीभर फुलं, एवढं मोठं कुंकू मी ठेवून घेणार आहे. मग सवाष्णीची मरणं येत राहतील! गोविंद, तुझ्यासाठी मीसुद्धा सवाष्णीचंच मरण मरेन! गोविंद, बघ ना रे जरा, आपाला थोडीतरी धुगधुगी आहे का?''

गणेश गळफास लावून गेला. कायद्याप्रमाणे पोलिसात कळवायला हवं होतं. परंतु वस्तीतल्या लोकांनी घाई केली. प्रेत झाडावरून उतरवलं आणि अग्नी द्यायची तयारी केली. सदाशिवने म्हटलं, "वस्तीतले सगळे जण उद्या फासावर गेले तरी चालेल पण गणेशबाबच्या शरीराला हात लागता कामा नये. प्रेत बांधून नेतात आणि त्याचे हाल करतात. वरून गावाची बेअब्रू.''

"हो तर, मागे शोभाच्या-सोयरूच्या सुनेच्या वेळी तीन दिवस दगदग झाली. पोलिसांनी प्रेत नेलं आणि तिसरे दिवशी परत आणलं. तीन दिवस वस्तीवर कुणी चूल पेटवली नाही. घराबाहेर पेज शिजवायचे आणि मुलांना द्यायचे.''

"मरण करायचं असताना तोंडात पाणीदेखील घेता येत नाही ना रे?''

"पोलिसांनी प्रेत आणून पोचवलं पण ते पोट फाडून! उचलून चितेवर ठेवू गेल्यास पोटावर हातभर कापलेला खळगा.''

नरसिंहने गणेशचं क्रियाकर्म केलं. सगळे विधी वाड्यावरचे पुरुष बाहेरच्या बाहेरच करीत होते. सुमनला हा घरातला मृत्यू असं वाटलंच नाही. ह्या विधींमध्ये तिला जरासुद्धा रस नव्हता. फक्त आपासाठी शोक करीत राहावसं वाटत होतं. तिने या दुःखाचा अगदी खोल तळ गाठला होता. तिला वाटत होतं, या धक्क्यातून मी पुन्हा डोकं वर काढू शकणार नाही.

पोराने, "बायूलमावशी, भूक लागली आहे ग'' म्हटलं तर मेलेल्या

नजरेने त्याला बघायची. त्याने रडून रडून आकांत केला की शेजारून कुणीतरी येऊन त्याला उचलून घेऊन जायचा पण सुमन बसल्या ठिकाणाहून उठायची नाही.

ती विचार करीत राहायची, बायच्या जिवावर मी बाळपण पुष्कळ भोगलं पण ती लग्न करून गेली आणि मी बाल्यावस्थेतून उडी मारली ती थेट प्रौढावस्थेत. माझं तारुण्य वाटेतच कुठं हरवलं ? अचानक तिला वाटलं, आपले केससुद्धा पांढरे झालेत की काय ? चेहऱ्यावर, अंगावर सुरकुत्या पडल्या असतील काय ? तिला केसांवरून हात फिरवायची देखील भीती वाटली. मी कधी तरुण झाले, कधी मला न्हाण आलं ? पहिल्या न्हाणाच्या वेळी कौतुकाने मी रडलेसुद्धा नाही, कुठल्याही मावशीने न्हाणीघरात नेऊन मला आंघोळही घातली नाही. थोडंसं हळदीचं पाणी, थोडंसं शेणाचं पाणी कुणी कधी माझ्यावर शिंपडलंच नाही. तारुण्य किती लपून लपून आलं आणि लगेच पळूनही गेलं. नाही म्हणायला या बायका मात्र गोविंदला कधी समोर बसवल्यास म्हणायच्या, "बाई ग, तरुण मुलीने पुरुषाला जास्त जवळ घेऊ नये ?" बस्स, एवढाच माझ्या तारुण्याचा अर्थ ! पण त्यांना काय ठाऊक, गोविंद नसता तर मी कधीच आवडूमावशीसारखी म्हातारी होऊन गेले असते.

तेराव्या दिवशी भाचीने मामाच्या घरी रात्री राहायला हवं असं शास्त्र होतं. मामा तिला न्यायला आला. "मामा, मुलांना पण बरोबर न्यायचं ना रे ?" मामा म्हणाला, "बापाच्या मृत्यूनंतर, तुझ्या आईच्या माहेरचं शास्त्र ते. त्या इवल्याशा मुलांना बरोबर घेतलं तर बरं नाही दिसणार."

"मग मुलांना कुठं ठेवायचं ?"

"शेजारी ठेवू."

"नाही मामा, मी नाही येणार मुलांना सोडून."

"अग शास्त्र ते. तू आज नाही आलीस तर मामाच्या घराची वाट तुटल्यासारखी होईल. आजची रात्र तू इथं राहायचं नसतं."

पण मुलांना सोडून जायला ती कशीच तयार होईना. शेजारच्या लोकांनी पुष्कळ समजावलं पण तिने ऐकलं नाही. शेवटी मामाने मुलांची तोंडं वगैरे धुऊन त्यांना कपडे घातले. एकाला कडेवर तर दुसऱ्याला खांद्यावर घेऊन मामा म्हणाला, "चल जाऊ या."

मामाने त्यांना खूप चांगलं वागवलं. दोन दिवस राहून ती परत आली. येताना मामाने पाच पायल्या तांदूळ बांधून दिले. मामाची परिस्थिती पण यथातथाच होती. एका पाठोपाठ एक अशा पाच मुली. मामी नेहमीच आजारी.

मामाला भाचीचं करायची पुष्कळ उमेद होती पण हात तोकडे पडत होते.

सुमन मामाकडे जाऊन आल्यापासून जरा सावरली. तिला वाटलं, आता हा भार मला एकटीलाच घ्यायला हवा!

गणेश गेल्याचा पंधरा दिवसांनी पाऊस सुरू झाला आणि लोक नांगर घेऊन शेतात उतरले. शेतात सगळीकडे नांगर आणि बैलांना हाकारल्याचे "आ रा रा पा पा रा हम्म हऽऽय" असा आवाज.

एका खंडीचं शेत सुमनने स्वतःकडेच ठेवलं होतं, स्वतः कसणार म्हणून. बैल होते. चांदू आता म्हातारा झाला होता पण बुधा तरुण होता. त्याचा तांबडा रंग, उभी शिंगं पाहिली की सुमन खूष व्हायची. लोक सांगायचे, "शेत खंडाने दिलंस ना, आता बैल विकून टाक. कशाला घेऊन बसतेस! त्यांना चारा-पाणी हवं, उद्या पावसाळ्यात त्यांची राखण ही करायला हवी."

पण काय करावं ते सुमनला सुचत नव्हतं. बुध्याला कुणीही सांगेल त्या किंमतीला डोळे मिटून नेतील, पण या चांदूचं काय करणार? दहा वर्षं तो आमच्या घरी राबतोय, अंगाने पोखरला आहे.

एक दिवस विठोबा आला. सुमन त्याला बघून उगाच उभी राहिली. सुमनला आधी वाटत हातं की तो एक साधासुधा, अर्धवट, भोळसर माणूस आहे म्हणून. पण नंतर तिला कळलं की हा वेड पांघरलेला, पक्का बिलंदर माणूस आहे. दोन वर्षं त्याने सुमनचं शेत कसून दिलं त्या बदली तिने त्याला आपलंही शेत कसून घे म्हटलं. पण त्याने पैसे घेऊन इतर लोकांचंही शेत कसून दिलं. बैलांना त्याने कधी घासभर गवत नाही दिलं, गावभरच्या लोकांचं शेत मात्र कसून दिलं. ताळतंत्र नसलेलं काहीपण बोलायचा, वाटेल त्याला "बाप्पा, आपा" करीत मोठमोठ्याने हाक मारीतच जायचा. बघणाऱ्याला वाटावं हा अर्धवट पण आतून पक्का मतलबी होता.

"बाळ सुमन, मी जोत नेतो. पाऊस आलाच ना! आडवं तिडवं कसून घेऊ, रोप, बियाणं हाताला मिळेल ते पेरून टाकू. गणेशबाब गेल्यापासून माझं मन थाऱ्यावर नाही ग बाळ. बराच उशीर झाला."

"विठोबाभाऊ, मी शेत खंडाने दिलं आहे."

"पण हडगरातलं एक खंडीचं आहे ना ग? ते आधी कसून टाकतो."

सुमन मनात म्हणाली, हा माझं एक खंडीचं कसणार आणि आपलं आणि बाकीच्यांचं मिळून दहा खंडीचं कसून घेणार.

"चांदू आता म्हातारा झाला आहे, विठोबाभाऊ. त्याला आता चिखलातून

पाऊल टाकणं जमेलसं वाटत नाही.''

"वेडीच आहेस तू. घट्ट हाडाचा बैल आहे तो, एक वर्ष सहज नांगर ओढेल.''

"नाही, आता आणखीन जोत देणार नाही मी.''

"मग तुझंही शेत तसंच पडीक होऊ देणार?''

"बघते, काय होतं ते. पण यंदा कुणाला जोत नाही देणार मी.''

"बैल ते बैल. तांदळाच्या गोणी नाहीत त्या घरात ठेवून घ्यायला. शेत पडीक करून टाक तसंच आणि बैलांनाही मोकळं सोड. उद्या लग्नकारण व्हायचं आहे तुझं. नवरा चांगला मिळाला तर ठीक.''

विठोबा बडबडत गेला. सुमन आपलं खंडीभराचं शेत कसं काय करावं म्हणून विचार करीत होती. तसंच टाकलं तर, लोक हसतील. म्हणतील गणेश गेला नि त्याचं घाम गाळलेलं शेत ओसाड पडलं. नाही, मी तसं होऊ देणार नाही, कधीच!

आपाची शेतीची आयुधं-औजारं होतीच. तिने ठरवलं आता आपणच सगळं हातात घ्यावं. साळूआजी कधीतरी म्हणायची, ह्या गावात नांगर हातात धरणारी आपण पहिली बाई म्हणून!

सकाळी उठून तिने रमेशला म्हटलं, "बाळ, तू गीतूजवळ बसून राहा. मी शेतावर जाते.''

"बायूलमावशी, लवकल ये हं.''

"येते रे बाळा, लवकर येते.''

"दूध थेवून जा, मी घालतो.''

"तुला नाही रे कळणार. मी येते लगेच.'' सुमन मनात म्हणाली, चार वर्षांचं हे पोरगं, पण किती समजूतदार. बहीण रडायला लागली की हा धावत धावत माझ्याजवळ येतो आणि माझ्या परकराचं टोक धरून ओढीत मुकाट्याने उभा राहतो. कधी काही मागत नाही, रडत नाही. शेजारच्या मुलांबरोबर खेळायला जा म्हटलं तरी जात नाही. बहिणीच्या शेजारी गुणगुणत राहतो.

सुमन गेली आणि तिने नांगर, जू खांद्यावर घेतलं. ते नेऊन तिने शेतात ठेवलं मग गोठ्यात जाऊन बैलांना घेऊन आली. पाऊस सुरू झाल्यापासून बैलांना ती गोठ्यातच बांधायची.

बैलांना घेऊन ती शेतावर आली. त्यांच्या खांद्यावर जू ठेवलं पण दोरी कुठं, कशी बांधावी ते तिला कळेना. तिने कशीतरी गुंडाळून बांधली, नांगर

उभा केला आणि बैलांना हाकू लागली. “ आ रा रा हऽऽय. ”

बैल जात होते पण नांगर जमिनीत उभा खोचत होता. बैलांना खांद्यावरचं जू त्याला झटके बसत होते आणि खांदे दुखावले जात होते. थोड्या वेळाने बैल कसेतरी वाकडे तिकडे जाऊ लागले. नांगर तिच्या पायात अडकू लागला. सुमनने सगळं सोडून दिलं आणि ती तशीच गप्प उभी राहिली.

गोविंद कुठंतरी जात होता का हिलाच बघून आला होता. सुमनला काही कळलं नाही. शेत तसं वस्तीच्या जवळच होतं.

“ सुमन, तू जोत बांधलंस ? ” त्याने आश्चर्याने विचारलं.

सुमनने रडवेल्या चेहऱ्याने म्हटलं, “ हो रे, पण नांगर नीट झाला नाहीसं वाटतं. ”

गोविंदने नांगर घेऊन एक फेरी मारली. “ अग, किती उभा घातला आहेस तू नांगर ? असं कसशील तर उद्या बैल मान सुजून पडतील. ”

गोविंदने दोरी सोडली आणि नांगर नीट बांधला. कुठे, कशी दोरी बांधायची ते त्याने सुमनला नीट दाखवलं. जाताना त्याने पुन्हा आश्चर्याने विचारलं, “ तू कसणार आहेस ? ”

“ थांब ना रे जरा. एक फेरी मारून दाखव आणि जा. ”

गोविंदने नांगर धरला आणि “ हऽऽय ” करीत बैल हाकले.

सुमनने त्वरेने जाऊन त्याच्या हातावर हात ठेवला, दोघांनी मिळून एक फेरी मारली. मग गोविंदने आपला हात सोडून म्हटलं, “ आता बघ, तूच फेरी मारून ये. ”

“ आणखी एक फेरी मारू या ना रे ! ”

“ नको, मामाच्या शेतात दोन नांगर आहेत. मी बी न्यायला म्हणून आलो होतो, तुझ्या हातात नांगर बघून आलो. अग, बायका कधी जोत बांधतात का ग ? ”

सुमन उगाच हसली. वाकडा तिकडा नांगर फिरवीत कसू लागली. गोविंदने म्हटलं, “ ते बघ, नांगर थांबवून सगळे पुरुष तुला बघताहेत. ”

थोड्या वेळाने खरंच, पलीकडून विष्णू, खुशाली, केशव येऊन शेताच्या बांधावर उभे राहिले. सुमन त्यांना बघितलंच नाहीसं करून कसत राहिली.

“ थांबव, सुमन. सांगतो ऐक. ” कोणीतरी म्हणालं. जोत थांबवताना बैल कुठंतरी वाकडे गेले आणि कोपऱ्यात जाऊन थांबले.

केशवने म्हटलं, “ कुमारी मुलगी तू, कोण अंगात संचारलं आहे तुझ्या ? धरतीची छाती फोडते आहेस तू ! ”

विष्णू म्हणाला, "आम्ही एवढे पुरुष वस्तीवर असताना तू जोत बांधतेस? या घराण्यात असं कधीच घडलं नाही."

"साळूआजी जोत धरायची म्हणे ना, अण्णा?"

"ती नवरा गेलेली बोडकी. तुझं अजून सगळं व्हायचं आहे. तुला माहीत आहे का, सवाष्णीने धरतीची छाती फोडली तर तिची कूस फळत नाही म्हणे! धरतीचा शाप बाधतो तिला."

सुमन रडवेली होऊन मेरेवर बसली. "मग मी काय करावं? पेरणी कशी व्हायची? बायची दोन मुलं आहेत, उद्या त्यांना खायला काय घालू?"

"कुणाला तरी सांगून काम करून घ्यावं."

"कोण करतात? अर्धा दिवस काम केलं तर पाच रुपये मागतात. नांगर धरायला बोलावलं तर दहा रुपये दे म्हणतात. वस्तीवरचे लोक 'सुमन पोरी, त्रासात पडलीस ग तू' म्हणून अश्रू गाळतात पण पाच पैशाकरता कुणी विश्वास ठेवत नाही. सदाशिवअण्णा, तू आपाकरता चार भारे लाकडं आणून दिली होतीस ना? परवा मावशी पैसे मागत होती."

अडखळल्यासारखं करीत सदाशिव म्हणाला, "ते जाऊ दे, तिला वेड लागलं आहे. मी बघतो ते."

केशव म्हणाला, "तुझ्याच भल्यासाठी सांगतो आहोत आम्ही. बायकांनी नांगर धरतीला टोचू नये. राक्षसाचं शस्त्र आहे ते!"

तिघेही मग, "तुझी कर्मं तुझ्याकडे" म्हटल्यासारखं मुकाट्याने निघून गेले.

समजायची अक्कल आल्यापासन सुमन बघत होती. वस्तीवरची ही माणसं मनाने चांगली, संकटकाळी धावून येतील, कुणीही आजारी पडल्यास रात्र रात्र उशीजवळ बसून जागतील, लग्न, मरण असल्यास स्वतःचंच घर समजून सारं करतील.

पण हेच लोक शेताची मेर, सीमेचा दगड किंवा टीचभर शेतीसाठी हाणामारीची भांडणं करतील; अधपाव तांदूळ उसने घेतल्यास दे म्हणून उद्या दारात धरणे धरतील; निखारा मागायला गेल्यास हातात ने म्हणतील पण एवढासा कौलाचा तुकडा देणार नाहीत.

सुमन जरा वेळ तशीच मेरेवर बसली. बैलांच्या शिंगांचा नुसताच खडखड आवाज येत होता, जणू ते सांगत होते, एकतर कसायला लाग नाहीतर आम्हाला सोडून तरी दे. ती तिरीमिरीसरशी उठली नांगर हातात धरून फाळ जमिनीत खुपसला, बैलांच्या पाठीवर काठी मारली. बैल चालू लागले, वाकड्या तिकड्या

रेघा जमिनीवर पडू लागल्या.

दोन कुणगे कसल्यावर तिच्या लक्षात आलं, दिवस माथ्यावर आला आहे आणि मुलं घरी एकटीच आहेत. घाईघाईने तिने बैलांना सोडलं; नांगर, जू तसंच डोक्यावर घेऊन ती घरी आली.

दिवसभर वस्तीवरच्या बायका अंगणातून वगैरे फेऱ्या मारीत होत्या. ‘‘अग सुमन, तू जोत बांधलंस ? ’’ म्हणून विचारायचं धैर्य कुणाला नव्हतं. गोकुळमावशी मात्र सगळ्यांना ऐकू जाईल अशा तऱ्हेने आपल्या खिडकीत उभी राहून मोठ्याने म्हणत होती, ‘‘घाटावर भाव मिळतो म्हणून मांजरावर पोती टाकली होती म्हणे ! ’’

एका खंडीचं ते शेत, आठच दिवसात तिने दोनदा उभं-आडवं कसलं आणि बी पेरलं. बी मात्र रामदादाने शिंपडून दिलं.

एकच वर्ष– त्याच पावसात चांदू पडला आणि त्याचा पाय मोडला. गुराख्याने येऊन सांगितल्यावर सुमन धावत गेली. बैल कसाच उठत नव्हता. तिने चुलत्यांना विनवलं, त्याला उचलून गोठ्यात तरी आणून ठेवू या म्हणून. पण ते म्हणाले, ‘‘पाय मोडला आहे, उचलून आणावं म्हटल्यास पायाला दोर बांधून त्याला डोक्यावर घ्यावं लागेल. जमणार नाही ते. पडल्या ठिकाणीच त्याला तू गवत, पाणी नेऊन दे. जास्त दिवस नाही जगणार तो, आशा धरू नकोस. ’’

सुमन रोज कडेवर पाण्याची कळशी आणि हातात गवताची पेंढी घेऊन डोंगरावर जायची आणि त्याला खायला घालून यायची. तो थोडं पाणी प्यायचा पण गवत चावलंसं करून तसंच टाकायचा.

एक दिवस ती अशीच डोंगरावर जात होती तर वरती तिला गिधाडं फिरताना दिसली. तिला धडकीच भरली. पुढे जाऊन बघते तर गिधाडांची झुंड बैलावर पडली आहे आणि त्याचे लचके तोडताहेत. सुमन तशीच मागे फिरली.

चांदूला साधू बैल म्हणायचे. आता दहा-बारा वर्षं तो गव्हाणीत होता. पण कानी काढताना, घालताना कधी शिंग हलवलं नाही. लहानपणी सुमन त्याच्या मऊ मऊ मानेवर पडून राहायची. खालून, पायांमधून पसार व्हायची.

कार्तिक महिन्यात तिने बुधा बैलपण विकून टाकला. मामाने केरवडीहून एक गिऱ्हाईक आणलं आणि चारशे रुपयांना तो विकून टाकला. चांदू मेल्यापासून तो एकटाच पडला होता, सारखा हिंडत असायचा. गोठ्यात नीट येतही नसे.

आणि गोठा तरी कुठे धड होता ? गेल्या वर्षी शाकारलंच नव्हतं त्यामुळं गळत होतं. बुध्याला सोडून देताना तिला काहीच वाटल नाही. विकत घेणारा तो दावं धरून पुढे चालत होता, मामा मागून हाकत होता. तो शोभिवंत, दांडगा बैल, रथाला बांधल्यासारखा शिंगं हलवीत चालला होता. सुमनला वाटलं, इथं नाहीतरी एकटाच, वाह्यात पडला होता, आता निदान कुणाच्या तरी नांगराला खांदा देईल.

पीक आल्यावर शब्द दिल्याप्रमाणे पंढरीने बारा खंडी भात घरी आणून पोचवलं. बारा पोती आणली आणि घरातल्या एका कोपऱ्यात ओतून गेला. सुमनने लावलेल्या एक खंडी शेतातूनही दहा-बारा खंडी भात आलं. त्यातलं दोन खंडी मळणाऱ्या वगैरे कामवाल्यांना दिलं गेलं तरी सगळं मिळून कुंभभर भात तिने आत ठेवलं.

ह्या वर्षी नांगर नव्हता. ती सगळी औजारं तिने वरती माळ्यावर टाकली. आता ती रोज सकाळ-संध्याकाळ खोरं, कुदळ घेऊन शेतावर जायची आणि शेत खणून टाकायची. मधेच सगळं तसंच टाकून मुलांना बघायला घरी यायची. तिने ठरवलं, यापुढे खणूनच शेत लावायचं. शेवटी दोन दिवस कुणाचा तरी नांगर मिळाला तरी पुरे. कसंही करून हे शेत मी पडीक होऊ देणार नाही.

गोरीगोमटी, धडधाकट बांध्याची सुमन तारुण्याचा भार अंगावर घेऊन जास्तच भरल्यासारखी वाटायची. पण आता तिने स्वतःला जणू घाण्याला बांधून घेतलं होतं. हळूहळू अंगावरचं वजन उतरत चाललं होतं. मूळचं सौंदर्य तसंच होतं पण अंगाने रोडावली हाती. त्यात एक पूर्ण आई तिच्यात वास्तव्य करून राहिली होती. त्यामुळे ती उगाचच खोल पाण्यात असल्यासारखी, दूरदूरशी, प्रौढशी वाटत होती. बोलायची पण तशीच प्रौढ बाईसारखी. ते बोलणं वीस वर्षांच्या पोरीचंसं वाटत नव्हतं. आता बायची मुलगी दीड वर्षाची आणि मुलगा पाच वर्षांचा झाला होता.

गोविंदच्या बाबतीत मात्र एक बरं झालं होतं. तो आता पुन्हा बाळपणीचा, जिवाभावाचा सखा झाला होता. आता भीती, दचकणं, घुटमळणं वगैरे दूर गेलं होतं. गेल्या दोन वर्षांत सुमनच्या जीवनात इतकी वळणं येऊन गेली, पण प्रत्येक वेळी गोविंद यायचा, बसायचा आणि प्रत्येक प्रसंगाला उपयोगी पडायचा. त्याच्या मैत्रीत आता इतकी सहजता आली होती की लोकांनाही

त्यात काही वाटेनासं झालं होतं. सुमन आता स्वतःची स्वतःच मुखत्यार, स्वतःची काळजी स्वतःच घेत होती. दोन मुलांना काहीच नव्हेसं करून सहज संभाळणारी ही मुलगी – हिला आणि कोण काय सांगणार होय?

गोविंद माजघरात येऊन बसायचा. आपल्या गोड बोलण्याने छान गोष्टी सांगायचा. सुमन घरातलं काम करता करता त्याच्याशी बोलायची. कधी कधी त्याचा वास घ्यायला बसल्यासारखी त्याच्या समोरच बसायची. पण प्रेमाच्या, लग्नाच्या गोष्टी बोलायला त्यांना एकदम भीती वाटायची. बिचारा मोकळ्या मनाचा गोविंद, मधेच कधीतरी म्हणायचा, "आपण लग्न करतो म्हटलं तर मामा-मामी तयार होणार नाहीत का ग?"

"मलाही माहीत नाही रे" म्हणत ती कधी हळूच पुढे यायची आणि आपला हात त्याच्या हातावर ठेवायची. आपला हात आपण आपल्या प्रियकराच्या हातावर ठेवला आहे की एका अजाण मुलाच्या हातावर ठेवला आहे, तिला काहीच कळत नव्हतं. पण तिला अतीव सुख मिळायचं.

गोविंदची मामी मात्र अतिशय सावध असायची. त्याला यायला उशीर झाला, काळोख व्हायला आला की ती हाका मारायची. मग गोविंद "आलो मामी" म्हणत पळायचा.

दुसऱ्या वर्षी पंढरीने दोन खंडी भात कमीच दिलं. विचारलं तर म्हणाला, "धान्य चांगलं झालं होतं, कणीसही चांगलं आलं होतं पण सगळं उडून पोलकट होऊन गेलं. या वर्षी वाराच चांगला गेला नाही. भरलेल्या कणसाला वाईट वारा बाधला."

पण लोक सांगत होते, "पंढरीला पीक भरपूर मिळालं आहे" सुमन मनात म्हणायची, आता नको करूस म्हणून त्याच्याकडून शेत काढून घेतलं तर उद्या दुसरा कुणी करेल याची काय शाश्वती? कुणीच तयार झाला नाही तर ओसाड पडण्यापेक्षा तो देईल ते खरं म्हणायचं. काही बोलू गेल्यास भांडायला यायचा. जरा तिसरटच माणूस तो.

एक दिवस मुलं अंगणात गोंधळ घालीत खेळत होती. अचानक ती चूप झाली. आत दळत बसलेल्या सुमनला कुणाची तरी सावली दारात हलल्यासारखी वाटलं, "कोण आलं आहे रे, रमेश" म्हणत ती बाहेर आली. दारात कोणीतरी उभा होता. क्षणभर तिने त्याला ओळखलंच नाही. मग पटकन ती म्हणाली, "भावोजी, तू कधी आलास? कुठं होतास इतके दिवस?"

तिला एकदम हुंदका आला. "बस भावोजी" म्हणत ती अंगणातून

मुलांना घेऊन आली. आणि त्यांना तिने भावोजीसमोर बसवलं. त्याने रमेशला जवळ ओढून घेतलं. मुलगी मात्र घाबरल्यासारखी त्याच्याकडे बघतच राहिली.

सुमन मुलांना म्हणाली, ''हा तुमचा बाबा. रमेश, बाबा म्हण त्याला. आता तुम्ही आपल्या बाबाबरोबर जायचं!''

मुंडी खाली घालून तो ढिम्म, मुकाट्याने बसला होता. त्याची दशा अगदीच खराब झाली होती. अंगावरचा जुना शर्ट, पँट अगदीच मळलेली होती. मातीने भरलेली तुटकी चप्पल त्याने बाहेर काढून ठेवली होती. चेहरा सुजरट आणि आठ दिवस दाढीसुद्धा केली नसल्यासारखा घाणेरडा दिसत होता. डोळे धुरकट आणि भोवती काळी वर्तुळे पडली होती.

''तुला कधी कळलं, भावोजी?'' तो काहीच बोलला नाही. मान हलवल्यासारखं करून गप्पच राहिला.

''तू छोट्या गीतूला अजून पाहिलंच नव्हतं ना? तू गेलास आणि सहा महिन्यांनी ती जन्मली.''

सूईतून धागा ओढल्यासारखं, बारीक चिरक्या आवाजात त्याने विचारल,'' काय झालं मंजुळाला?''

''तुझ्याबद्दलच मनाला लावून घेतलं तिने. शेवटपर्यंत तू येशील अशी आशा वाटत होती तिला. बंदराच्या वाटेकडे डोळे लावून पडली होती.''

सुमनला वाटलं, हा आता रडायलाच लागेल. पण त्याचे डोळे कोरडे, रिक्त! पिशवीतून आणलेला एक बिस्किटांचा पुडा काढून त्याने रमेशच्या हातात दिला. तो घेऊन रमेश धावत आत आला. गीतूला जवळ ओढायला गेला तर ती जोरजोरात रडायलाच लागली.

भावोजी अशी दयनीय दशा करून आला होता तरी सुमनला खूप आनंद होत होता. कशासाठी एवढा हर्ष होत होता ते तिचं तिलाही कळत नव्हतं. रात्री तिने छान, चमचमीत स्वयंपाक केला. दळलेल्या तांदळाच्या पिठाच्या भाकऱ्या, तिसऱ्यांचं कालवण, भात, कोलंबीचं धबधबे.

घरातल्याच चुलीवर तिने मडकीत पाणी गरम केलं आणि ते न्हाणीघरात नेऊन ठेवलं.

''आंघोळ करून घे, भावोजी.''

बरोबर आणलेल्या तुटक्याशा सुटकेसमधून त्याने एक मळकट चड्डी आणि टॉवेल काढला आणि तो आंघोळीला गेला. न्हाऊन आल्यावर, आपाचं एक नवीन धोतर होतं ते तिने त्याला दिलं.

''आडवं गुंडाळून घे, भावोजी.''

जेवायला बसल्यावर भूक नसल्यासारखं तो घास मागे पुढे करीत होता. सुमनला वाटलं, बायच्या आठवणीने तो घायाळ झाला असेल. बिचारा. जिवाची काय दशा करून घेतली आहे!

" जेव ना, भावोजी! "

" जेवतो... "

" कुठे होतास तू? एक चिठ्ठीदेखील का नाही लिहिलीस? होतास कुठं? "

" मुंबईला. "

" नोकरी करतोस? "

" करतो... "

" राहायला जागा आहे ना? "

" आहे. "

रात्री तिने बसायच्या खोलीत त्याचा बिछाना घातला. एका बाजूला गीतू आणि दुसऱ्या बाजूला रमेश. स्वतः ती स्वयंपाकघरात एकटीच झोपली. गीतू कधीच झोपून पडली होती. पण रमेश त्याच्याजवळ झोपायला कसाच तयार होत नव्हता. मग त्याला उचलून तिने स्वतःजवळ नेलं. पण दुसऱ्या बाजूला गीतू जवळ नसल्यामुळे तिला चुकल्या चुकल्यासारखं वाटत होतं आणि झोपच येत नव्हती. दुसरीकडे विचारांचं थैमान चालू होतं. बायच्या आठवणी पुनःपुन्हा उफाळून येत होत्या. भावोजी आल्यापासून बायची पावलं घरात वाजत होती! मधेच आवाज आल्यासारखी ती मागे पुढे बघायची. आता भावोजी आला आहे, त्याची मुलं त्याच्या स्वाधीन करून मी मोकळी होईन. त्याला हवं ते करू दे. तो आणि त्याची मुलं. मधेच ती हर्षाने मुरकल्यासारखी झाली आणि मग तिला स्वतःलाच अपराध्यासारखं वाटलं. तिने रमेशला जवळ ओढलं. या पोराने खूपच जीव लावला होता! आता दोघंही पोरं जातील आपल्या बापाबरोबर! "

सुमनला जाणवत होतं, बाहेर भावोजीला झोप येत नव्हती. तो उगाच कूस बदलतो, उठून बसतो, पुन्हा झोपतो.

दुसरे दिवशी भावोजीचे सगळे कपडे तिने रिठ्याने घासून घासून धुऊन टाकले. बरोबर मुलांचेही कपडे धुतले. अंगणात या माडापासून त्या माडापर्यंत दोरी बांधली आणि ओळीने सगळे कपडे वाळत टाकले. भावोजीचे कपडे आणि मधे मधे मुलांचे. ती ओळ बघून ती स्वतःच आनंदली.

दुसरे दिवशी तो दिवसभर बाहेरच्या खोलीत गप्प बसून राहिला. शेजारच्या बायका येऊन हातांनी खुणा करून कुजबुजत अंगणातूनच सुमनला

काय काय विचारीत होत्या. पण सुमित्रा मूळचीच धीट. ती खोलीत येऊन त्याच्यासमोर बसली आणि त्याला म्हणाली, “ झालं ते होऊन गेलं, दुःख करून चालणार नाही. या मुलांची जबाबदारी आता तूच अंगावर घेतली पाहिजे. सुमनचं सगळं व्हायचं आहे, मुलांमुळं ती अडकून पडली आहे. ”

पण तो एकही शब्द बोलला नाही. असेच चार दिवस गेले. तो जेवायचा, खायचा नि गप्प बसून राहायचा. पण नेहमी सैरभैर. नाही म्हणायला एकदा वरती दुकानात जाऊन दाढी करून आला. येताना मुलांना खाऊ, थोडी चहा-पत्ती, साखर आणि एक अंगाला लावायचा साबण घेऊन आला.

“ भावोजी, घरी गेला होतास ? ”

“ हो. ”

“ बाप्पा कसा आहे ? ”

“ लकव्याने अंथरूण धरलं आहे. ”

“ मग कोण करतो त्याचं सगळं ? ”

“ बहीण रोज सकाळी येते आणि त्याचं सगळं करून जाते. ”

“ कोण, सुमतीवैनी ? ”

“ हो. ”

सुमनचं काळीज कळवळलं.

एकदा संध्याकाळी फिरून येतो म्हणून नदीच्या बाजूने गेला आणि काळोख पडल्यावर आला. घरात शिरल्याबरोबर तोंडाला दारूचा वास! तो खोलीत गेला आणि बिछान्याच्या वळकटीवर तसाच बसून राहिला. बोलला मात्र काहीच नाही.

त्याला बघून सुमन कासावीस झाली. ह्याला गावात दारू कुठं मिळाली ? शिद्दरमधे तर हा शिद्द लोकांचा परिसर म्हणून कुणी दारूचा थेंबसुद्धा आणीत नाही. ह्या गावाच्या हद्दीत कुणी दारू आणली, प्यायला तर त्याचं चांगलं होत नाही म्हणतात. एकदा एक वडारी पिऊन धिंगाणा घालीत होता तर लोकांनी त्याला मारून मारून सीमेच्या बाहेर पाठवलं. पण हा दारू पिऊन आला आहे. तिला आठवलं, जवळच आंबे बेटावर दारू मिळते म्हणतात. होडीने जाऊन पिऊन आला आहे वाटतं.

न बोलताच तिने त्याला वाढलं. रात्री रमेश त्याच्याजवळ झोपायला तयार नव्हता तर तिने एक थप्पड मारून त्याला तिथे झोपवलं. ती तणतणली, “ बापाजवळ झोपायला नको, मावशी हवी होय तुला ? आईबरोबरच मावशीपण मेली म्हणून समज. ”

दुसरे दिवशी तो मुलांना घेऊन शेतांमधून वरच्या रस्त्यापर्यंत फिरून आला. खांद्यावर गीतू आणि बोट धरून रमेश. रमेश बोटाला धरून चालत होता आणि काय काय अनेक प्रश्न विचारीत होता. सुमनला उगाचच उत्सुकता, काय बोलत असतील बरं ? पण त्यांना तसं चालत येताना बघून तिला धन्य धन्य वाटलं. ती कालचं सगळं विसरली. तिच्या डोळ्यांत एकदम अश्रू दाटून आले. “ उद्या जातील पोरं ! ”

मध्यंतरी आणखीन दोन दिवस गेले. सुमनला अगदी काळजी. हा मुलांना कधी नेणार ? नेऊन कुठं ठेवणार ? त्याचीच मुलं, ठेवेना कुठंही, मला काय ? त्याच्याबरोबर मुलांना पाठवल्याशिवाय राहणार नाही मी. त्याची त्यानेच सांभाळावी.

“ उद्या जातो मी, सुमन. ”

“ कुठं जाणार ? ”

“ मुंबईला. ”

“ घरी हुळग्यालाच राहा ना. ”

“ नाही. शेत दोन वर्षांपासून पडीकच आहे. आता शेतीबिती नाही करायची मला. ”

“ जा, मुंबईला तर मुंबईला जा. पण जाताना तुझ्या मुलांना घेऊन जा. ”

दगडाखाली सापडलेला हात सोडवून घेतल्यागत, मधाळ शब्दात तिने म्हटलं. पण तो काहीच बोलला नाही. सुमनच बोलत राहिली. “ मी किती दिवस सांभाळणार त्यांना ? घरातलाच दाणागोटा विकून मुलीच्या दुधाचे पैसे कसेबसे फेडते मी. शेत खंडाने दिलं आहे, त्याने दिलेलं तेवढंच मी खावं. तू घेऊन जा त्यांना. माझं काय व्हायचं ते होवो. लग्न होवो नाहीतर मरू दे. माझी काळजी नको कुणाला. ”

“ मुलांना मावशीचा लळा लागला आहे, सोडून राहणार नाहीत. ”

“ भावोजी, मी सांगितलं ना एकदा, त्यांना यापुढे ठेवून घेणार नाही म्हणून. ”

“ आपण बरोबरच मुंबईला जाऊ. आपा पण नाही. तुझं कोण करणार ? ”

सुमन सावध झाली, काही वेळ त्याच्याकडे बघतच राहिली. आवाज तिखट करून ती म्हणाली, “ मुंबईला येऊन काय तुमची मोलकरीण म्हणून राबू होय ? ”

तो जरा वेळ अडखळू लागला. “ तसं नव्हे ग, मुलं आहेत, त्यांना

घेऊन नीटपणे राहू आपण. मेव्हणीशी लग्न करायला काय हरकत आहे ? ''

खरं तर संतापाने सुमनचं डोकं फुटणार असं वाटत होतं. पण तापून लाल झालेल्या लोखंडावर पाणी ओतावं तसा आपला राग तिने मोठ्या प्रयत्नाने आवरला. जरा खालच्या आवाजात ती म्हणाली, '' दारूच्या नादात तू बायकोला झिजवून मारलीस, आता त्याच नादापायी मेव्हणीला विकून टाक ! ''

'' आज सात दिवसांत मी एकदाच घेतली ना ? यापुढे अगदीच सोडून देतो. ''

'' ते मला काहीच सांगू नकोस. उद्या तू जाताना मुलांना नदीकडे घेऊन येते आणि होडीत बसवते. मग तू आणि तुझी मुलं ! ''

पुढे तो काही बोलला नाही.

सुमन झरझर कामाला लागली. दुकानात जाऊन ती मूग आणि गूळ घेऊन आली. मूग भाजून दळले. त्यात पातळ गूळ घालून चाळीस एक लाडू केले. लाडू वळताना तिचे हात थरथरत होते. मुलांची अंगडीटोपडी गोळा करून पिशवीत भरताना तिचा जीव गलबलून येत होता. बैल विकून आलेल्यापैकी दोनशे रुपये तसेच होते. त्यातले शंभर जाताना रमेशच्या हातात द्यायचं तिने ठरवलं.

रात्री झोपताना दोन्ही मुलांना तिने स्वतःजवळच झोपवलं. अंथरुणात पडल्यावर दोघांनाही एकदाच जवळ घेऊन ती खूप रडली. तिचं रडणं बाहेर भावोजीला ऐकू जात होतं.

रडता रडताच तिचा कधीतरी डोळा लागला. मधेच कधीतरी जाग आली. कुणाचा तरी जड हात तिच्या अंगावरून फिरत होता. ती ताडकन् उठून बसली. बाजूच्या खिडकीतून चांदण्याचा प्रकाश आत येत होता. अंथरूणाशेजारी एका पुरुषाची आकृती. भावोजीच तो म्हणून तिने ओळखलं. काळोखात तो बराच उंच नि दांडगा दिसत होता, कांबळ पांघरल्यासारखा. पण ती मुळीच घाबरली नाही. '' भावोजी, इथं का आला आहेस ? ''

'' मी एकटा मुलांना नेऊन काय करणार ? '' थिजलेल्या आवाजात त्याने म्हटलं.

'' मुंबईला जायचं नसेल तर हुळग्याच्या घरी घेऊन जा आणि रहा. ''

'' तू बायको होणार असशील तर कुठंही जाऊन राहीन. ''

सुमनला त्याचा भयंकर संताप आला होता, तिने रागातच म्हटलं, '' मी होणार नाही म्हणून सांगितलं ना ? ''

ती उठली, बखोट्याला घट्ट धरून त्याला उभा केला आणि बाहेर नेऊन

बिछान्यावर बसवला. तिच्या हाताची पकड इतकी घट्ट होती की त्याची बाही बरीच दुखावली. त्याच्या बखोट्याला धरलं तेव्हा तिलाही वाटलं, ह्याच्या अंगात आता एवढीसुद्धा ताकद राहिली नाही, दारूने याला संपवून टाकलं आहे. क्षणभर तिला आश्चर्य वाटलं, याच माणसाची वाट बघत, बघत बायने प्राण सोडावा?

सुमनला आता झोपच येत नव्हती. उघड्या डोळ्यांनी रात्र घालवत असताना पहाटे कधीतरी तिचा डोळा लागला.

सकाळी उठून बघते तर भावोजी बिछान्यावर नव्हता. खुंटीवरचे त्याचे कपडेही नव्हते. आणि त्याने येताना आणलेली ती तुटकी सुटकेसही नव्हती. सुमनच्या छातीत धस्स् झालं. शुद्ध गेल्यासारखी ती मधल्या दारात उंबरठ्यापाशीच बसली, तिथं तिचं लक्ष गेलं, उंबरठ्याच्या आत घडी घालून दहा दहा रुपयांच्या पाच-सहा नोटा ठेवल्या होत्या.

तिने हंबरडा फोडला, "बाळ रमेश, तुमचा बाप तुम्हाला टाकून पळाला रे!"

गोविंद असनोटीला आपल्या घरी गेला होता तो आठ दिवस आलाच नाही. सुमन कावरीबावरी होऊन त्याची वाट बघत होती. एक दिवससुद्धा जरी तो दृष्टीस पडला नाही तरी तिचा जीव टांगणीला लागायचा. आणि आता तो आठ दिवस नव्हता. पुनःपुन्हा घराच्या पूर्वेकडे जाऊन ती त्याच्या मामाच्या घराकडे बघायची. माजघरात, माडीवर, दरवाज्यापाशी कुठेतरी तो दिसतो का म्हणून शोध घ्यायची. नाहीतर बाहेर उभी राहून शेतापलीकडे नदीच्या किनाऱ्याकडे डोळे लावून बसायची. कुणीही त्या बाजूने येताना दिसला की उचंबळ व्हायची आणि तो जवळ आल्यावर गोविंद नाही म्हणून समल्यावर निराश व्हायची. तीन-चार दिवसांनी येतो म्हणून सांगून गेला होता, आज आठ दिवस झाले तरी आला नव्हता. भास्करअण्णाच्या घरी जाऊन विचारायचा तिला धीर होत नव्हता. भावोजी येऊन गेल्यापासून सगळं अवसान गळालं होतं.

एकेकदा तिला वाटायचं, का म्हणून मी गोविंदची अशी छाती फुटेपर्यंत वाट बघते? ही एवढी उत्कंठा का म्हणून! तो एक प्रेमळ मित्र म्हणून का उद्या होणारा माझा नवरा म्हणून! मला तर तो आता दिवसेंदिवस लांबवरचं एक अप्राप्य धनच असल्यासारखा वाटतोय. त्या धनाची चकाकी मनाला भुलवते पण त्यावर शेषनाग फणा धरून उभा आहे! गोविंद माझा व्हावा

म्हणून मी खूप तळमळते पण मी दळभद्री लग्नाआधीच दोन मुलांची आई होऊन बसले आहे. ही मुलं घेऊन का मी उद्या भास्करअण्णाच्या घरी राहायला जाणार आहे? गेले उडत सगळे, नाही जुमानायचं कुणाला म्हणावं तर गोविंद माझ्यापेक्षा भित्रट!

बाय, तू माझी आई झाली होतीस ना ग? आता मी तुझ्या दोन मुलांची आई झाले आहे आणि त्याकरता मला गोविंदला सुद्धा सोडावं लागतं ग! पण गोविंद मला लाभू दे म्हणून आशीर्वाद दे ग मला!

कुठं गेला हा गोविंद? त्याच्या असनोटीच्या घराची तिला भीतीच वाटायची. कधी कधी मळणी, कापणीच्या वेळी त्याचे तिघेही मोठे भाऊ बरोबरच यायचे. घडा घडा भास्करअण्णाच्या खळ्यावर राबायचे. भारे बांधायचे, गंजी घालायचे. रात्र रात्रभर ती मळणी. सगळा गडगडाट असायचा. बोलायचे पण तसेच, जोरजोरात भांडल्यासारखे.

तिघेही एकापेक्षा एक धष्टपुष्ट, उंच आणि दांडगे. त्यांच्यासमोर गोविंद अगदीच किरकोळ. आता बावीस वर्षांचा झाला तरी अजून लहान मुलासारखाच दिसायचा. गोरा गोरा, सडपातळ, काळे नितळ डोळे. बोलण्यात देखील बालकाचं भाबडेपण!

गोविंद आला म्हणून समजलं मात्र, साऱ्या वस्तीभर सुगंध दरवळल्यासारखं वाटलं तिला. दुसरं मन म्हणत होतं, मला का एवढा आनंद होतोय! मोठ्या कचाट्यात सापडले आहे मी!

संध्याकाळ व्हायच्या सुमारास गोविंद आला. ‘‘कुठं होतास रे इतके दिवस?’’

‘‘आईला बरं नाही. चार दिवस कारवारला, मोठ्या हॉस्पिटलमधे होती.’’

‘‘काय झालं?’’

‘‘खोकला येतो, दम लागतो. धड जेवतही नाही.’’

‘‘डॉक्टर काय म्हणाले?’’

‘‘काही नाही. औषधं दिली आहेत. परवा मामा गेला होता आईला बघायला तेव्हा ती सांगत होती, आपण असतानाच गोविंदचं काय करायचं ते करून टाक म्हणून.’’

‘‘मग मामाने काय सांगितलं?’’

‘‘त्याचाच विचार चालला आहे म्हणाला.’’

‘‘काय मनात आहे रे, मामाच्या?’’

‘‘मला तरी काय माहीत?’’

सुमनला एकदम धडकी भरल्यासारखं झालं, घशाला कोरड पडली. तसाच आवंढा गिळत तिने विचारलं, "गोविंद, मामाने दुसऱ्याच कुठल्या तरी मुलीशी तुझं लग्न ठरवलं तर तू काय करशील?"

"मी ठरवलं आहे, तुझ्याशीच लग्न करणार म्हणून सांगायचं."

"त्यांनी नाही ऐकलं तर?"

गोविंद आतून घुसमटल्यासारखा झाला. "मी दुसऱ्या कुणाशीच लग्न करणार नाही."

गोविंदचं बोलणं ऐकून सुमनच्या हृदयावर आनंदाचं मोरपीस फिरलं खरं पण आत दडी मारून बसलेली भीती तशीच राहिली.

पंढरीला शेत खंडाला दिल्यास तीन वर्षं होऊन गेली. तिसऱ्या वर्षी त्याने आणखीन दोन खंडी भात कमी दिलं, म्हणजे फक्त आठच खंडी दिलं. विचारलं तर म्हणाला, "शेतात राब राब राबायचं, हाडं झिजवायची आम्ही आणि पायावर पाय ठेवून तुम्ही आयतं खायचं? कसलं कंगाल शेत आहे ग तुझं? बारा खंडी लावल्या. तेरा खंडी आल्या. एक खंडी अल्लाने दिली. अशी अवस्था."

"आमचं शेत कसंही असू दे. या वर्षी तू नको करूस ते. कुणालाही देईन मी."

"कुणालाही देईन? कोण ठेवतो त्या शेतात पाय ते बघतो ना मी!"

ऐकून सुमनला आश्चर्य वाटलं. असा काय बोलतोय हा? तिच्या पायाखालची जमीन सरकायला लागली. पुढच्या दोन दिवसांत तिला ज्या गोष्टी कळल्या त्यामुळं तर तिला वेडच लागल्यासारखं झालं. खंडाला दिल्यापासून ते शेत आपणच कसतो म्हणून दर वर्षी चावडीवर जाऊन पंढरीने तलाठ्याकडून रेकॉर्डला लावून घेतलं होतं. आता तीन वर्षं झाल्यावर ते शेत आपल्या नावावर करावं म्हणून साक्षीदाराच्या सहीने त्याने मामलेदाराकडे अर्ज केला होता!

दुसरे दिवशी नरसिंहाला घेऊन ती तलाठ्याकडे गेली. तो म्हणाला, "दर वर्षी हे शेत आपणच कसतो म्हणून त्याने लिहून दिलेलं आहे."

नरसिंह म्हणाला, "त्याने सांगितलं आणि तुम्ही त्याचं नाव रेकॉर्डवर लिहिलं?"

"त्याने त्या शेताजवळच्या शेतकऱ्यांची साक्षीदार म्हणून नावं दिली आहेत."

" मग आता उपाय काय? "

" उपाय काहीच नाही. कायदा कुळाच्या बाजूने असतो. आता तुम्हाला कोर्टात जाऊन केस लढवावी लागेल. त्यातूनही तुम्ही जिंकालच अशी खात्री देता येत नाही. तीन वर्षं त्याने शेत केलं आहे ही गोष्ट खरी आहे. "

सुमनला आता त्याचीही चीड आली. ती म्हणाली, " तुम्हाला पैसे चारून लोक काहीपण करतात, गरिबाला पिळतात. "

" छे, छे. उगाच काय वेडेपणा, तसं कसं होईल ? " असं काहीतरी तो बडबडला.

ती दोघंही घरी परतली. नरसिंह तिला म्हणाला, " गावकी बोलाव. "

सुमन प्रत्येक चुलत्याकडे जाऊन रडली, " ह्याच घराण्याचं शेत, ते आमच्या वाट्याला आलं. मी एकटी मुलगी म्हणून तो मला लुबाडायला बघतो. "

त्यांनी सांगितलं, " कायदा मारेकरी आहे ! घ्या कूळ कायद्यामुळे बामणांची शंभर शंभर एकर शेतजमीन कुळांना मिळाली. गाव सोडून बामणांनी मुंबईची वाट धरली. "

" पण हा, आपला चुलता म्हणून त्याच्यावर विश्वास ठेवला. "

" खरं आहे तुझं. बोलाव तू गावकीला. बघू ते काय सांगतात ते. "

तिन्हीसांजा झाल्या तसं सगळे पुरुष तुळशीच्या अंगणात मांडवाखाली गावकीकरता एकत्र जमले. आधी केशवने जाऊन लोकांसमोर ये, म्हणून पंढरीला बोलावलं. पण तो म्हणाला, " प्रकरण सरकारकडे गेलं आहे. ते काय ठरवतील त्याच्याशी तुम्हाला काय कर्तव्य ? "

" अरे, पण सुमन आमच्या कुळातली. जमीनदेखील ह्याच घराण्याची. सगळ्यांना आधी वाटून मिळाली होती. "

" सगळ्यांना आधी सारखी वाटली होती ना ? मग मला तीनच खंडी आणि भास्करला बारा खंडी कशी मिळाली ? निळूला दहा खंडी का ? आमचा आजोबा, बाप अडचणीत सापडलेले बघून, त्यांना फसवून ह्या लोकांनी त्यांची जमीन दीड-दमडीला गिळंकृत केली. आणि केशव तू, तू मला सांगतोस ? आपूशणैची सावरीकडची तीन खंडीची जमीन काय तू विकत घेतली होतीस ? आपूशणै खंड घ्यायला आला तर तू त्याला सरकारकडून घे, म्हणून सांगायचा. खेटे घालून पाय झिजले त्याचे. तो आता घरदार सोडून मुंबईला मुलीकडे जाऊन राहिला आहे. "

नंतर रामदादा बोलवायला आला, यशवंत आला. पण त्याने कुणाचंही ऐकलं नाही. खरं म्हणजे यांच्या बोलावण्यालाही तितकासा जोर नव्हताच.

कारण नव्या कूळ कायद्यामुळे यातल्या प्रत्येकाच्या पदरी थोडीफार जमीन पडली होती, बामणांची, मुंबईला नोकरी करणाऱ्या कोकण्यांची!

सुमन इतका वेळ तुळशीच्या अंगणात धडेवर बसली होती. एकीकडे ती संतापाने धगधगत होती. किती घातकी माणूस आहे हा! माझी जमीन खातो आणि वरून गावकीला बोलावलं तरी येत नाही. आता ती स्वतः गेली. "सगळे बोलावतात, ये ना पंढरीअण्णा!"

"कशाला बोलावतात? मोठी आलीस गावकी बोलवणारी. नाही येत म्हणून सांग."

"माझी जमीन खायला बघतोस? बरं होणार नाही, ती लाभणार नाही तुला."

"उगाच खात नाही. तीन वर्षं कसतो आहे. खंड घरी नेऊन पोचवला आहे."

"वस्तीतलाच म्हणून दिली होती तुला. तू पापी असा घात करशील हे माहीत नव्हतं."

"जास्त बोलू नकोस. चालती हा आमच्या दारातून. तुला ग कशाला जमीन? उद्या लग्न करून जाताना काय डोक्यावर घेऊन जाणार आहेस? चालती हो इथून."

सुमनचा संताप अनावर झाला, तोंडाला येईल त्या शब्दांनी ती शिव्या देत सुटली. लहानपणापासून ऐकत आलेल्या सगळ्या अर्वाच्य, घाणेरड्या शिव्यांची तिने लाखोली वाहिली. हात ओवाळीत तऱ्हेतऱ्हेने तिने शिव्या दिल्या. पंढरी उठून अंगणात आल्यावर तिने तिथलाच एक चिऱ्याचा दगड उचलला आणि म्हटलं, "ये पुढं. मढंच घालते तुझं!"

"मोठी नाक वर घेऊन बोलते. भास्करच्या त्या भाच्याला घेऊन पडतेस दिवसभर."

"हो, घेऊन झोपणार मी त्याला! तू कोण विचारणारा? तुला काय करायचं आहे?"

"सगळं सोडलं आहेस तू xxx"

कुणीतरी पुढं येऊन सुमनला ओढून घेऊन गेला. थोडा वेळ साऱ्या वस्तीत कलकलाट. कोण पंढरीला शिव्या देत होता, कोण उगीच चर्चा करीत होता. सुमनने पाहिलं, प्रत्येक घरातून बायका, पुरुष बाजूला उभे राहिले आहेत. कोणी कोणी तर तिला सांभाळायला आल्यासारखे उभे आहेत.

ती घरी येताना लोक आपापल्या परीने बोलत होते, "वस्तीतल्या

चुलत्याला अशा शिव्या द्यायला नको होत्या तिने.''

''चुलता तिच्या मुळावर उठून तिला भिकेला लावायला बघतो. मग तिने काय करावं? एकटी अनाथ पोर बिचारी!''

घरी आली तर गोविंद माजघरात एकटाच बसला होता. मुलं त्याच्या जवळच होती. सुमन आत गेली आणि धप्पकन बसली. गोविंद मुलांना घेऊन तसाच बाहेर बसून राहिला. अंगणात उभ्या असलेल्या देवकीमावशीने जाऊन आपल्या घरातून दिवा आणला आणि त्यांचा दिवा शोधून तो लावला. जाताना ती म्हणाली, ''पाहिलंस ना रे गोविंद? चारी बाजूंनी कशी त्रासात पडली आहे ती. मामाचा मुलगा तू... तूच काहीतरी सांग तिला.''

कितीतरी वेळ गोविंद गप्पच बसला होता. धाकटी झोपली होती आणि रमेश मावशीच्या कुशीत बसला होता. आत सुमन रडते आहेसं दिसल्यावर गोविंद एवढंच म्हणाला, ''रडू नकोस, सुमन. खायचं असेल तर खाऊ दे ते शेत त्याला. उपाशी नाही पडणार तू!''

मामी हाका मारीत होती. जरा वेळ त्याने न ऐकल्यासारखं केलं. मग ''येतो ग, मामी'' म्हणत उठून गेला.

रमेश तिच्या कुशीत पेंगत होता पण ती तशीच बसून राहिली होती. थोड्या वेळाने दारात पुन्हा पावलं वाजली. गोविंद आणि बरोबर त्याची सरस्वतीमामी आली होती. मामीच्या हातात पितळेच्या पातेल्यात भात होता. त्यावर आमटीचं भाडं. ते सुमनच्या पुढ्यात ठेवून ती म्हणाली, ''सुमन, उठ आणि जेव तू आता. अशी उगाच बसून राहिल्याने काय होणार आहे?''

सुमनला खरं तर सरस्वतीमावशीला मिठी मारून खूप रडावंसं वाटत होतं पण दुसऱ्याच क्षणी तिने विचार केला, बरं नाही दिसणार ते.

सरस्वतीमावशी चोरून आल्यासारखी आली आणि चोर पावलांनी, घाईत असल्यासारखी ती वागू लागली. हळू आवाजात बोलत हाती. मग गोविंदला घेऊन लगेच निघून गेली.

भास्कर गेल्या पंधरा दिवसात तीनदा तरी कारवारला गेला. बोटी पहाटेच जायच्या. लाँच मात्र नऊ वाजता यायची. तो लाँचनेच जायचा. पांढरा शुभ्र शर्ट, तसंच धोतर आणि डोक्यावर काळी टोपी. पूर्वी हे पुरुष तांबड्या पट्ट्याचे रुमाल डोक्याला बांधायचे. हळूहळू रुमाल गेले. काही जणांच्या डोक्यावर काळी टोपी आली तर बऱ्याच जणांनी डोकी उघडी पडली. आता कोणत्याही शुभ कार्याला डोकं झाकायचं तर अंग पुसायचा टॉवेल डोक्याला गुंडाळतात.

भास्कर एकसारखा कारवारला का जात असेल याबद्दल लोकांना मोठी उत्सुकता होती. तो पावसकर वकिलाकडे जातो म्हणून समजलं होतं, पण का जातो ते मात्र कुणाला कळलं नव्हतं. एक दिवस रत्नाकर आला, तो कारवारला मामलेदार कचेरीत होता. आल्याबरोबर तो म्हणाला, "भास्करदादा भाच्याला दत्तक घेणार आहे. त्यासंबंधीचे कागदपत्र करायला तो कारवारला येत असतो." लगेच गावभर बातमी पसरली.

सदाशिवची बायको विश्रांती चुकून पोचल्यासारखी भास्करच्या घरी गेली. सरस्वतीशी इकडच्या तिकडच्या गप्पा मारून, पान वगैरे खाऊन झाल्यावर तिने विचारलं, "ऐकलं ते खरं का ग? गोविंदला तुम्ही दत्तक घेता म्हणे."

सरस्वती तशी सरळ मनाची होती, तिने खरं ते सांगितलं, "हो, नवरा त्याचकरता कारवारला जातो. ते सगळं झालं की मग जोश्याला बोलावून दत्तक घ्यायचा सोहळा होईल."

खरं म्हणजे त्या बातमीत नवीन असं काहीच नव्हतं पण उत्सुकता होती. एका सोहळ्याची उत्सुकता. उपवर मुलीचं लग्न होणार ते सर्वांनाच माहीत असतं पण ते ठरल्यावर एक उत्सुकता पसरते तशीच उत्सुकता. त्यात भास्करच्या घरचं कार्य. सतरा गावचे नातेवाईक जमतील. पंगतीवर पंगती पडतील. गोविंद तर सगळ्यांचाच भाचा, सगळ्यांना हवा हवासा वाटणारा.

सुमनने ही बातमी ऐकली तेव्हा तिला खूप आनंद झाला. गोविंदला त्याचं फारसं काही वाटलं नाही. काहीही झालं तरी मामाकडेच तर राहायचं.

पण सावध झाली ती सुमित्रा. अरे, एकदा का भास्करबाबने गोविंदला दत्तक घेतला की तो त्याचा मुलगाच झाला. तो त्याचंच नाव लावणार. भास्करचा मुलगा – म्हणजे गोविंद, सुमनचा भाऊ झाला!

तिला आश्चर्य वाटलं, ही गाठ इतके दिवस आपल्या लक्षात कशी नाही आली? सुमनचं सोडा, ती एक अजाण आणि गावातल्या लोकांनासुद्धा त्यांच्या लग्नाविषयी कधी विचारही केला नसेल. पण मी मनातल्या मनात कितीदा तरी सुमन-गोविंदची जोडी जुळवायची. ती दोघंही बोलायला लागली की चोरून ऐकावंसं वाटायचं, पण हे माझ्या ध्यानातच आलं नाही.

आता सुमित्रासमोर एक नवाच पेच निर्माण झाला, हे आता सुमनला आणि गोविंदला सांगावं की नाही? दोघंही अजाण. काय घडतंय याचा कदाचित आज त्यांना अर्थही लागत नसणार. उद्या घडायचं ते तोंडावर आल्यावर काय होईल, त्यांची तगमग मी बघू शकेन? कदाचित ती आपले प्राणदेखील देतील!

हे आणखी पाप नको!

सुमन माजघरात मंजूळच्या मुलीला अंगावर घेऊन खेळवत होती, बघून सुमित्राला कसंसंच वाटलं. सुमित्राला बघून सुमन ''ये, बस काकी'' म्हणत जवळ आली.

''गीतूला तीन वर्षं झाली असतील, नाही ग?''

''हो काकी, परवा तुळशीच्या लग्नाच्या वेळी तीन झाली तिला.''

''रमेश कुठं गेला?''

''शाळेत. पहिलीत आहे ना ग आता तो?''

''बघता बघता मुलं किती मोठी झाली! मंजुळा गेल्याला तीन वर्षं झाली असं वाटतच नाही. अगदी काल परवाच असं वाटतं.''

सुमन थोडा वेळ गप्प राहिली. ''रामदादाचा रेडिओ छान वाजतो नाही? इथंसुद्धा आवाज येतो.''

''नवा नवा आणला आहे, तेव्हा मोठ्याने लावतात, मी बारीक लावते. तुला माहीत आहे, सुमन? इंदिरा गांधीला म्हणे जेलमधे घालायला घेऊन जात होते, लाखभर लोकांनी येऊन तिला सोडवून घेतलं म्हणे!''

''रेडिओवर सांगितलं?''

''हो, तर.''

''कोण घालत होतं तिला जेलमधे?''

''जनता पक्षाचे लोक.''

''का?''

''तिने त्यांना तुरुंगात टाकलं होतं ना?''

सुमन आश्चर्याने ऐकत होती.

''गोविंद कुठे दिसत नाही या दिवसात?''

''असेल. त्याच्या मामाची कामं असतात ना ग?''

''इथं येत नाही?'' सुमन लाजली. ''येतो कधी कधी.''

''ए, तुम्ही लग्न करणार का ग?''

सुमनने झटकन तिच्याकडे पाहिलं. मग मान खाली घालून गप्पच बसली.

''पण त्याला भास्करबाब दत्तक घेतोय म्हणे!''

''घेऊ दे!''

''घेऊ दे काय? भास्करबाबचा दत्तक म्हणजे देवा-धर्माने सख्खा मुलगा झाला त्याचा. आणि त्याचा मुलगा म्हणजे तुझा भाऊ. तुम्ही दोघं बहीण-भाऊ झाला नाहीत का?''

ते ऐकून सुमनचं भानच हरपलं, आधार सुटून आपण लोबंकळतो आहो असं वाटलं तिला. लाज, भीड सोडून तिने विचारलं, "आता काय करावं ग, काकी ?"

"मी काय सांगू ? तुम्हीच आता काय ते ठरवायला हवं. गोविंद ठाम राहिला तरच काहीतरी होईल."

सुमनच्या मनाचा बंध सुटल्यासारखं झालं होतं. "आम्ही खरंच एकमेकांवर प्रेम करतो ग काकी! लहानपणापासूनचा माझा मित्र तो! एक दिवस दिसला नाही तर माझं चित्त थाऱ्यावर नसतं! तो मला हवा आहे ग! आम्ही लग्न करणार आहोत! नाहीतर मी जीव देईन, काकी! मी पवित्र आहे ग, त्याला कधीच हातपण लावू दिला नाही मी. आमचं लग्न होणार म्हणून थांबलो आहोत. मला खूप आवडतो तो आणि तोसुद्धा माझ्याशीच लग्न करणार म्हणतो!" बोलता बोलता दम लागल्यासारखी ती थांबली. सुमित्रा आश्चर्यानि, कौतुकाने तिच्याकडे बघत राहिली. "नशिबात असेल तोच नवरा मिळतो. आता माझंच बघ. लहानपणी कुणी म्हटलं असतं की मी इथं येऊन पडणार आहे म्हणून तर त्याला मी वेड्यातच काढलं असतं."

"नरसिंहअण्णा चांगला आहे ग, काकी."

"बरा काय आणि वाईट काय! वाईट असला म्हणून सोडून देता येतो ? तुला सांगते बघ, यात तुम्हीच दोघांनीही शक्य तितके प्रयत्न केले पाहिजेत, तिसरा माणूस यात पडू शकणार नाही. वस्तीतलं कुणी तुझी सोयरीक घेऊन भास्करबाबकडे जाणार आहे काय ?"

सुमित्रा निघून गेली. त्या दिवशी दिवसभर सुमन बैचैनच होती. कशातच मन लागत नव्हतं. मुलांना थोडं शिजवून वाढलं पण स्वतः काही जेवली नाही की काही खाल्लं नाही. त्या दिवशी गोविंद दिवसभर आला नाही. तिचा जीव नुसता टांगणीला लागला. मधेच उठून ती घराच्या पूर्व दिशेला जाऊन बघत उभी राहायची. तिला उगाच वाटत होतं, गोविंदच्या मामाच्या घरात कसली तरी गडबड चालू आहे, धांदल चालली आहे!

पण हा गोविंद आला का नाही अजून ?

दुपारी गोविंद आला. त्याचा चेहरा पार उतरला होता, काळजीत असल्यासारखा वाटत होता. "काय झालं, गोविंद ?"

"आधी मामा फार जाऊ नको म्हणून दम भरायचा. आता मामी पण जाऊ नको म्हणते. गेले चार दिवस जास्तच 'जाऊ नको, जाऊ नको'!"

"कुठे जाऊ नको म्हणतात ?"

“ इथं. तुझ्याकडे. ”

“ का ? ”

“ माहीत नाही. नीट काहीच सांगत नाहीत. ”

“ तुला दत्तक घेतात ना रे ती ? ”

“ म्हणून काय झालं ? आधीसुद्धा मी दत्तक असल्यासारखाच नव्हतो का ? ”

“ तसं नव्हे रे. देवा-धर्मानि, सोयऱ्या-धायऱ्यांसमोर ‘ दत्तक- विधान ’ होऊन त्यांनी तुला दत्तक घेतलं की तू त्यांचा स्वतःचा मुलगा होणार. त्यांचा मुलगा म्हणजे माझा भाऊ ! बहीण-भावाचं लग्न होतं का कधी ? ”

गोविंदला आश्चर्य वाटलं. मग आतून फुटल्यासारखा घुसमटत बसून राहिला.

“ तू दत्तक होणार आहेस, गोविंद ? ”

“ मर जा तू जाऊन कुठेही. मला का विचारतेस ? ”

सुमन हसली. “ तुझं तू ठरव गोविंद. मी अडथळा आणणार नाही. पण एक सांगून ठेवते, तुझ्याशिवाय मी राहू शकणार नाही ! ”

एकवार आकाशगहिऱ्या नजरेने तिच्या डोळ्यांत पाहिलं. युगायुगांची ओळख असल्यासारखी काही क्षण ती एकमेकांच्या नजरेत बुडत गेली. सुमनला वाटलं, याची बालिश नजर आज आरपार दीट, तरूण आणि पक्व झाली आहे !

बराच वेळ एकमेकांचं दुःख वाटून घेत बसल्यासारखी ती गप्पच बसली होती. सुमन पटकन म्हणाली, “ तू त्या भिल्लमाडांच्या टेकडीवर मला मिठीत घेतो म्हणाला होतास ना रे ? ”

“ हो, घेणारच होतो. पण आपण तिथपर्यंत पोचलोच नाही ना ? ”

“ कसली वाट होती ती; झाडा-झुडपांची, काट्या-कुट्यांनी भरलेली. त्या जंगलात आपण हरवून गेलो असतो. ”

“ हरवलो असतो तर बरंच झालं असतं. पूर्वेहून पश्चिमेपर्यंत कुठेही जाऊन दोघंच राहिलो असतो. डोंगराएवढा तो घांग्रेचा कातळ नव्हता का वाट दाखवायला ? ”

गोविंदच्या डोळ्यांत पुन्हा बालिशभाव उतरला. सुमन घाबरल्यासारखी झाली.

“ गोविंद, दत्तक होणार आहेस तू ? काय आहे तुझ्या मनात ? ”

कुणाचा तरी तीव्र संताप आल्यासारखा तो उठून गेला. जाताना सुमनने

म्हटलं, "तुझ्या मनात आहे ते कर. मी आणखीन काहीच सांगत नाही तुला."

एक मोठ्ठा निर्णय घ्यायचं काम आपण पहिल्यांदाच कुणावर तरी सोपवलं आहे असं वाटून मुक्त झाल्यासारखी ती हळुवार झाली.

भास्करच्या घरी बोलण्यांच्या फैरीवर फैरी झडत होत्या, कधी जोरजोरात, कधी कुजबुजत. जोशी-ब्राह्मण, मांडवापासून जेवणावळी, आमंत्रणांपर्यंत सगळी बोलणी चालली हाती. ह्या गावातलं, लोकांच्या आठवणीतलं हे पहिलंच 'दत्तक-विधान'.

मधेच कुणीतरी ओसरीवर येऊन बसायचा, त्याला भास्कर सांगायचा, "यशवंत, भाच्याला दत्तक घेतोय. अजून दिवस ठरला नाही. चांगली वेळ बघून मुहूर्त धरायला हवा."

"गोविंद चांगला मुलगा आहे. घरादाराचं सोनं होईल."

गोविंद आजूबाजूला, तिथंच कुठंतरी असायचा, मुकाट्याने सारी बोलणी ऐकायचा, जण सगळे गृहीत धरूनच चालले होते, एवढी मोठी श्रीमंती त्याच्या हातात देताहेत. तो कशाला नाही म्हणणार?

मामीला मात्र त्याची अस्वस्थता जाणवायची, पण ती काहीच बोलत नसे. गोविंदला संशय येत होता, हिचं मामाशी काहीतरी बोलणं झालं आहे. तीसुद्धा माझ्या विरुद्ध गेली आहे. नाहीतर ती, 'सुमनकडे जायचं सोड" म्हणून कशाला सांगत राहिली असती?

पण सगळं बाहेरच्या बाहेर चाललं होतं, गोविंदवर अजून काही आलं नव्हतं. त्याला चीड यायची. हे सगळं मला न विचारताच ठरवतात म्हणजे काय? मी काय अनाडी आहे?

एके दिवशी असनोटीहून मोठा भाऊ आला. येताना बागेतली दोन पपनसं, चार रामफळं घेऊन आला होता. एक पपनस तर त्याने स्वतः सोलून गोविंदला खायला दिलं. या खेपेला तो गोविंदशी खूप मायेने, गोडी-गुलाबीने बोलत होता. बोटीवर बसवून पोचवायला पण आला होता. शेवटचं, निरोपाचं गोड बोलावं तसं बोलत होता.

गोविंद फक्त सगळ्याचं निरीक्षण करीत होता.

लहानपणापासून मोठ्या भावाला तो खूप घाबरायचा. वडील नसल्यामुळं घरात त्याचाच दरारा असायचा. तो चांगलाच धिप्पाड होता. पुढे आलेले फुगरे गाल, मधे खोल गेलेले बारीक डोळे, जाड मिश्या-ह्यात त्याच्याकडे सरळ बघायचा गोविंदला धीर होत नव्हता. त्याच्यासमोर उभा राहून कधी

'अण्णा' म्हटलेलं गोविंदला आठवत नव्हतं. त्याने आपल्या खरखरीत आवाजात "मी पुरुषोत्तम घनश्याम साळुंखे" असं कुणाला ही सांगितलं की लोकांना भीतीच वाटायची.

आज पहिल्यांदाच मामाकडे येताना त्याने पिशवीत घालून काहीतरी आणलं होतं. एरव्ही तो हात हलवीतच यायचा. मामाने विकत आण म्हटलं तर नवीन नांगर वगैरे आणायचा. जाताना मात्र मामाच्या बागेतून, परसातून पाहिजे ते काढून पोतं भरून न्यायचा. मामाची बाग पण एवढी मोठी, ती ऐसपैस शेतापर्यंत पोचली होती. तिथे हरतऱ्हेची फळफळावळीची झाडं होती. केळी, नारिंग, पपनस, रामफळ, सीताफळ, आंबे, फणस सगळ्यांनी बाग भरली होती.

मोठा भाऊ आणि मामा रात्री बैठकीच्या खोलीत बोलत बसले होते.

"मामा, कारवारची सगळी कागद-पत्रं झाली का?"

"हो, गोविंदची सही पाहिजे. दोन दिवसांनी त्याला कारवारला नेऊन सही करून येतो. मग ते कागदपत्र कारवारच्या मामलेदाराकडून गावातल्या चावडीवर येतील, माझ्याबरोबर वारस म्हणून गोविंदचंही नाव लावलं जाईल."

"त्याचं नाव बदलणार?"

"नाही, नाही. तेच नाव, गोविंद म्हणूनच. गोविंद भास्कर गावकर!"

"दत्तक-विधान कधी होणार आहे, मामा?"

"उद्या आपण दोघेही जोश्याकडे जाऊन चांगला मुहूर्त बघून येऊ. लगेच करून टाकू, धर्माप्रमाणे काय असेल ते."

"आपले नातेवाईकंच किती आहेत, मामा! त्याशिवाय गावातले लोक. पत्रावळींचे चार तरी गठ्ठे लागतील पंगती वाढायला."

"हो तर, लग्नापेक्षा हे काम मोठं. उद्या लग्नाला येणारे लोक भास्करच्या मुलाच्या लग्नाला म्हणून यायला हवेत."

"मामा, गडावर हल्लीच जोगी कदम नावाचा पोलिस जमादार रिटायर्ड होऊन आला आहे. केवढं मोठं घर बांधलं आहे म्हणून सांगू त्याने! अवघ्या गडावर तसलं दुसरं घर नाही. तो गोविंदविषयी विचारीत होता म्हणे. त्याची एक मुलगी आहे लग्नाची म्हणे."

"त्याला कुणी सांगितलं?"

"आमची चुलतबहीण सुशीलाक्का तिथं जवळच दिली आहे ना?"

"बघू नंतर. मुलगी चांगली असल्यास चैत्रापर्यंत लग्नही उरकून टाकावं."

“चांगला हुंडा देणार आहे, मामा. एकवीस तोळे सोनं आणि पंधरा हजार रोख द्यायला तयार आहेत म्हणे.”

“बघू नंतर. वाटल्यास निरोप पाठव, महिना-दीड महिना थांब म्हणून. आधी आपलं हे काम आहे म्हणून सांग.”

दुसरे दिवशी मामा-भाचा जोश्याकडे जाऊन मुहूर्त बघून आले. येताना जोश्याकडून सामानाची यादी पण घेऊन आले.

मामा मोठ्या उत्साहाने मामीला सांगत होता, “माघातल्या पंचमीला चांगला मुहूर्त आहे म्हणे. फेब्रुवारीची नऊ तारीख येते.” मामी उत्साहाने ऐकत होती, खुशीने हलकी हलकी होत होती.

मग मोठा भाऊ, मामा आणि मामी, जोश्याने दिलेल्या यादीबद्दल आणि इतर कार्याबद्दल बराच वेळ बोलत बसली होती.

संध्याकाळी भाऊ परत जाताना गोविंदला जवळ घेऊन म्हणाला, “मामाने सांगितलेलं नीट ऐक. आता तोच तुझा मामा आणि तोच तुझा बाप. सुखा-समाधानात राहशील.”

गोविंदला वाटलं, भावाला सगळं सांगून टाकावं. पण त्याला माहीत होतं, काहीही सांगितलं तर भाऊ इथंच थयथयाट करून नाचायला लागेल आणि त्याला थांबवणं शक्य होणार नाही.

गोविंद मोठ्या भावाला घाबरायचा तितकाच मानायचाही. तो भाऊ खूप राबायचा. असनोटीचं मूळचं गरीब घरदार त्यानेच नावारूपाला आणलं होतं. ते चार भाऊ. आधीपासूनच त्यांच्या मनात होतं की, मामाने गोविंदला दत्तक घ्यावं. गोविंद कधी सुटीत असनोटीला गेला की ते परत परत विचारायचे, “अरे गोविंद, सुटी संपली नाही का तुझी अजून? शिद्दरला जा ना.”

आपल्या गावात वीतभर जमिनीसाठी सुद्धा हाणामारीपर्यंत भांडण करणारा थोरला भाऊ मामाची एवढी मोठी इस्टेट धाकट्या भावाच्या हाती पडणार म्हणून त्याला आतल्या आत उकळ्या फुटत होत्या.

एक दिवस मामा गोविंदला म्हणाला, “उद्या आपल्याला कारवारला जायचं आहे.”

“का, मामा?”

“तुला माहीत आहे ना, गोविंद, मी तुला दत्तक घेणार आहे. त्याआधी तू कायदेशीर वारस म्हणून काही कागदपत्र करायचे आहेत. मग तुझा नव्याने वारसा होईल.”

“पण मला दत्तक व्हायचं नाही, मामा!”

मामाने झटकन आश्चर्याने त्याच्याकडे पाहिलं. असं का बरं बोलतो आहे हा? लहानपणापासून मोठ्या प्रेमाने, लाडा-कौतुकात राहिलेला हा मुलगा, आज काय झालं याला? मामीची रिक्त ओटी तूच भरून काढलीस, मी तुला माझा मुलगाच समजत आलो. माझ्या बाळा, आज असा का बोलतोस? मी तुला दत्तक घ्यायला जरा विलंबच केला. लोक म्हणायचे, म्हातारपणी मुलं होऊ शकतात, मग अडचण नको. वेडेपणा!

"का रे बाबा, तुला दत्तक व्हायचं नाही?"

"दत्तक घेतल्यावर मी तुझा मुलगा होईन. मग मला सुमनशी लग्न करता येणार नाही."

"सुमनशीच कशाला लग्न करायला हवं तुला? ती तुझी मैत्रीण ना? आता तिला बहीण मान! मी तुला सुंदरशी, सोन्याने मढलेली नवरी आणतो."

"नको मामा, मी दुसऱ्या कुणाशीच लग्न करणार नाही."

"एवढासा असताना तुला आणलं होतं. दत्तक घ्यायचा म्हणून. आता तू मोठ्या पेचात टाकलंस मला!"

"मामा, तू सुमनलाच आपली मुलगी करून घे. मग मी घरजावई म्हणून इथं राहतो."

साध्यासुध्या ह्या मुलाचे ते शब्द ऐकून मामाला आश्चर्य वाटलं. मघापासून भीड सोडून बोलतो आहे. त्या सुमननेच तयार केलं असलं पाहिजे याला.

"अरे पण ती मुलगी आणि तू जावई झालास तर तुम्हाला माझं नाव कसं लावता येणार? तुमची मुलं उद्या तुझं साळुंखे हेच नाव लावतील." मध्येच चिडून मामा म्हणाला, "लग्न होऊन ती या घरात येणार आणि बहिणीच्या मुलांना कुठं ठेवणार म्हणे? तुला सांगतो गोविंद, नष्ट कतृत्वाची कारटी आहे ती. ती झाली आणि महिन्याच्या आत आईला खाल्लं तिने. बहीण, बाप मरून एकटी राहिली आहे, कुणाला खायला देव जाणे! मागे एकदा जोत बांधून नांगराने धरणीची छाती फोडली आहे तिने. ते बाधल्याशिवाय राहणार आहे होय तिला?"

"पण मामा..."

"काही बोलू नकोस तू. तिच्याशी लग्न करून तिच्या बहिणीच्या मुलांना पोसायची हिंमत आहे ना तुझ्यात? मला नको ती कटकट!"

"सुमनशी लग्न करता येत नसेल तर मीदेखील इथं राहणार नाही."

आपण आता खरोखर निपुत्रिक असल्याची खोलवर जाणीव मामाला झाली! त्याने काहीशा नरमाईने म्हटलं, "असं नको रे बोलूस, गोविंद.

लहानपणापासून माया लागली आहे तुझी."

"मग मला तू सुमनशी लग्न करायला का देत नाहीस?"

"तू तिच्याशी लग्न केलंस तर माझा प्रश्न सुटत नाही. मला माझं नाव लावणारा मुलगा हवा आहे. दुसरं एक सांगतो तुला, ह्या परिसरात, ह्या वस्तीत दुसऱ्या कुठल्याही पिढीचा वंश वाढणार नाही. आमच्या मूळ पुरुषाने इथं खुंटा मारला आहे तो फक्त याच पिढीच्या वंशावळीकरता. ही शेतीभातीसुद्धा ह्या वंशावळीबाहेरच्या कुणालाही पचणार नाही."

"मग मला कशी पचणार?"

"तुला मी देवा-धर्माच्या साक्षीने माझा मुलगा करून घेणार आहे. मग तू याच वंशावळीतला होशील."

"पण सुमन या वंशाची नव्हे?"

"ती मुलगी. दिलेल्या ठिकाणी जाईल. वंश वाढतो तो मुलांचा, मुलींचा नव्हे. मुलं बापाचं नाव लावतात."

"मग मला दत्तक व्हायचं नाही."

आता मात्र मामाचा राग अनावर झाला. "व्हायचं नसेल तर जा कुठंही. तुझ्या पाया नाही पडणार मी. अठरा वर्षं तुला पोसला ते फुकट गेलं म्हणून समजेन. ही इस्टेट अशीच कुणालाही खायला घालीन मी. नाहीतर देवाच्या भंडाराला देईन!"

गोविंद मुकाट्याने बाजूला झाला.

रात्रभर तो बिछान्यात तळमळत होता. मामीला ते जाणवत होतं. ती मधेच त्याच्या बिछान्यापाशी यायची, मुकाट्याने उभी रहायची आणि परत जायची. 'कसलं संकट उभं राहिलं आहे पाहा. मी माझं वांझपण तसंच भोगायला पाहिजे होतं. का एवढा लळा लावून घेतला? दुसऱ्याचं मूल कितीही आपलं म्हटलं तरी आपलं नाही होत. अशा अडचणी येतात मग. आपलं पोट पिकलं तरच ते खरं! पण हा पोरगा खूपच प्रेमळ. आतडी तुटताहेत!'

मामी अंथरुणावर पडली आणि मुकाट्यानेच रडू लागली. मधेच ती उठली आणि गोविंदजवळ गेली. त्याच्या शेजारी बसून त्याला हलवीत तिने विचारलं, "गोविंद, तुला सुमनशीच लग्न का करायचं आहे?"

"मला माहीत नाही मामी. पण मी तिच्याशीच लग्न करणार."

"दुसरी कुठलीही चांगली मुलगी पाहू आपण."

"नको मामी."

"मला मामी म्हणू नकोस तू!" तिने रागातच म्हटलं. मग थोडा वेळ

ती तशीच त्याच्या शेजारी बसून राहिली. मधेच तिने विचारलं, "लग्न केल्यावर तिच्या बहिणीच्या मुलांना कुठं टाकणार आहे म्हणे ती?"

ह्या प्रश्नाला मात्र उत्तर नसल्यासारखा तो गप्पच राहिला.

दुसरे दिवशी सकाळी मामा त्याला म्हणाला, "तुझ्या भावांना आज बोलावून घेतो. ते येऊन तुला घेऊन जावो वा ठेवो. तुमचं तुम्ही ठरवा. माझ्या पूर्वजांची मिळकत, शिवाय माझ्या वडलांनी, मी, किती भर घातली! तांब्याचे चार मोठे हंडे आमच्या घरी, अख्ख्या शिद्दर गावात नसेल एवढं थाळ-ताम्हण, सगळं तुझ्या स्वाधीन करणार होतो. पण त्या करंट्या, दळभद्र्या काटीनि तुझ्यावर कसली करणी केली आहे, देवाला माहीत! बरं होणार नाही तिचं. तिला दाखवतो मी."

गोविंदने मुकाट्याने ऐकून घेतलं. आत जाऊन त्याने आपले चार कपडे पिशवीत भरले. मामा-मामी दाराआडून त्याला न्याहाळीत होती. तो बाहेर जायला निघाल्यावर त्वरेने बाहेर येत मामीने विचारलं, "अरे, कुठं असनोटीला निघालास?"

पण तो तसाच गेला.

तो सुमनकडे गेला आणि पडवीतूनच तिला म्हणाला, "मी गोव्याला जायला निघतो आहे. तिथं कसलीही नोकरी मिळवीन. फोंड्याला माझा एक मावसभाऊ आहे."

"मग माझ काय होणार, गोविंद?"

"तू थांब. दोन-तीन महिने थांब. मग आपण सगळेच गोव्याला जाऊ. तुझं तरी आता काय आहे इथं?"

"खरं आहे तुझं; माझं आता काहीच नाही इथं. तू पण जायला निघालास, मग काहीच उरलं नाही माझं! पण अशा भलत्या वेळी कुठं निघालास तू? होड्या गेल्या, लाँचपण गेली. आत्ताच आवाज ऐकला मी. आज राहा तू. एकच दिवस रहा — माझ्याजवळ!"

"साऱ्या आयुष्यभर तुझ्याजवळच राहणार आहे मी, सुमन."

सुमन हसली. "तू पुरुष! तुला हे सारं किती सोपं वाटतं! तू लाथ मारशील तिथं पाणी काढशील यात शंका नाही. पण मला उगीच भीती वाटते. आज राहा तू. गाडी, होडी नसताना अशा अवेळी जाऊ नकोस." ती बाहेर आली आणि त्याला हाताला धरून घेऊन आत गेली.

"मी बाहेर, ओटीवरच बसतो, सुमन."

"नको, आतच बस तू."

“ का ? ”

“ आज तू माझा मित्र नाहीस, नवरा आहेस ! आज एक दिवस तू माझा नवरा म्हणून राहायचं. तू परत येईपर्यंत मी म्हातारी झाले तर ? ”

“ वेडी आहेस तू. ”

“ होय वेडीच मी. ” ती एकदम त्याच्याजवळ आली. त्याला कवेत घेऊन तिने त्याच्या गालाचा चावा घेतला. गोविंद गप्पच राहिला.

मधे विश्रांती, गोकुळ, आबोले वगैरे बायका घरात येऊन बडबडून गेल्या. आत बसलेल्या गोविंदला उगाचच दारातून बघून गेल्या. एका बाईने - कोण ते सुमनला नीट कळलं नाही - अंगणातूनच हळूच म्हटलं, “ सोन्याच्या खाणीवर लाथ मारून हा इथं येऊन बसला आहे ! ”

सुमित्रा आली. ती मात्र थेट त्यांच्या समोरच जाऊन उभी राहिली. “ हे तडीला नेणार आहेस ना रे, गोविंद ! ”

“ होय मामी, मीं वचन देतो ! मेलो तरच माझं हे वचन मोडलं म्हणून समजायचं. ”

सुमन हसली.

“ हसतेस का ग तू ? ”

“ माझ्या आयुष्यात काही चांगलं घडेल यावर माझा विश्वासच नाही ग, काकी ! ”

सुमित्राने सुस्कारा सोडला आणि ती गेली. सुमन आता गोविंदसाठी छानसा स्वयंपाक करायला लागली. मधेच हातावर खोबरेल तेल घेऊन तिने त्याच्या टाळूवर घासलं. घासता घासता त्याला चिमटे काढून गुदगुल्या केल्या. तो पण खूप हसला.

सुमन रगड्यावर वाटायला बसली तेव्हा तिला ऐकू येत होतं, भास्करअण्णाच्या घराच्या बाजूला कोणीतरी मोठमोठ्याने बोलताहेत, जोरजोरात वाद करताहेत. पण ते आपल्याबद्दल नव्हे अशी तिने मनाची समजूत घातली आणि ती वाटत राहिली.

मधेच मासे घेऊन येणाऱ्या सायकलवाल्याचा ‘ पों, पों ’ आवाज आला. घाईघाईने शेरभर भात घेऊन ती धावत सायकलवाल्याजवळ गेली आणि मासे घेऊन आली. रस्त्यावर जाऊन येईपर्यंत तिला दम लागला. ती घामाने डबडबली पण ती तशीच कामाला लागली.

“ गोविंद, आज मी तेल लावून आंघोळ घालणार आहे तुला ”

“ नको, कशाला ? ”

"आज मी तुझं काहीच ऐकणार नाही." तिने न्हाणीघरात चांगलं हंडाभर पाणी तापवलं. मग आपल्या हातांनी त्याच्या शर्टची, पँटची बटणं काढून कपडे उतरवले. मधलं दार बंद केलं आणि ती त्याच्या अंगाला तेल लावू लागली. मग त्याला तिने न्हाणीघरात नेलं आणि घसाघस गरम गरम पाणी अंगावर घातलं, साबण लावून त्याला न्हाऊ घातलं. मग टॉवेलने अंग पुसलं. "कळलं का रे गोविंद, तू मला साडीचा पदर दिला असतास तर मी पदरानेच तुझं अंग पुसलं असतं!"

"देणारच आहे मी तुला साडी नेसायला. मग आयुष्यभर माझं अंग पुसत राहा पदराने."

"तुझं अंग पुसत राहिले तर मग मुलांचं अंग कोण पुसणार? नंतर माझा पदर मुलांसाठीच असेल हं!"

"कुणाच्या मुलांसाठी?"

सुमनने पटकन त्याच्याकडे पाहिलं. आतून दुखावल्यासारखी वेदना तिच्या चेहऱ्यावर उतरली. पण तो मात्र हसत होता, चेष्टा केल्यासारखा.

सुमनने जवळ बसून त्याला पोटभर जेवू घातलं, घास भरवले. त्याने मोठी ढेकर दिल्यावर तीही तृप्त झाली. मग त्याच्याच ताटात वाढून घेऊन ती स्वतः जेवली.

भास्करच्या घराकडून कसलीतरी गडबड सारखी कानावर येत होती. खरंच तिथं कसलातरी गोंधळ चालला आहे का आपल्याला भास होतो आहे, तिला काहीच कळत नव्हतं.

दुपारी वस्तीतले चार-पाच पुरुष आणि भास्कर सुमनकडे आले.

भास्कर क्रोधाने खदखदत बोलत होता, "या मुलीने करणी केली आहे त्याच्यावर. आधीच गोडी लावल्याने सोकावला आहे तो. तिलाच निपटून टाका आधी. ह्यापूर्वी तुम्ही कधी पाहिलं होतं, अविवाहित मुलीने पुरुषाला असं घरात ठेवून घेतलेलं?"

सुमनने बाहेर येऊन शांतपणे म्हटलं, "मी ठेवून घेतलं नाही, अण्णा त्याला... तोच आला आहे. त्याला मी सांगितलं होतं. तू हो दत्तक, माझी कसलीही आडकाठी नाही. तो होत नाही त्याला मी काय करू?"

राम रागानेच म्हणाला, "पण तू कुणालाही न विचारता त्याला ठेवून घेतलंस ही चूकच."

"चूक का रामदादा? लहानपणापासून आम्ही बरोबर खेळलो, बरोबर वाढलो. आता आम्ही लग्नही करायचं ठरवलं होतं. आमच्या लग्नालाच अडचणी

उभ्या राहिल्या आहेत. तुम्हाला सांगितलं म्हणून तुम्ही काय आमचं लग्न लावून दिलं असतं? माझी चार खंडीची जमीन चुलत्याने खाल्ली तेव्हा तुम्ही कुणीच काही बोलला नाहीत आणि आता तुम्ही भास्करअण्णाच्या विरोधात जाऊन माझं लग्न करून देणार होतात? आई-बाप नसलेली पोरकी पोर आहे मी! माझं मीच ठरवायचं.''

''म्हणून अशी लाज सोडली आहेस का तू? म्हणे आपलं आपण ठरवावं. ह्या वस्तीतले, ठरवणारे सगळे पुरुष गेले काय? इथं असलं काही आम्ही मुळीच चालू देणार नाही. आण, त्याला बाहेर आण. गोविंद, मुकाट्याने बाहेर ये आणि मामाबरोबर जा.''

गोविंद बाहेर आला. ''मी आधीच सांगितलं आहे, मला दत्तक व्हायचं नाही! मी गोव्याला जायला निघालो होतो, आज उशीर झाला. उद्या सकाळी जाणार. इथंही नाही की घरीही नाही जाणार, मी मामा!''

नरसिंहने मधेच म्हटलं, ''त्याला दत्तक व्हायचंच नाही तर कोण काय करणार?''

''खरं आहे'' म्हटल्यासारखे सगळे जण थोडा वेळ गप्प राहिले. मग रामदादाने दरडावलं, ''अविवाहित असताना या वस्तीत तुम्हाला असं बरोबर राहता येणार नाही, आधीच सांगून ठेवतो. नाहीतर हाडंच मोडून टाकीन तुमची.''

सुमनने फाटक्या आवाजात म्हटलं, ''उद्या सकाळी जाणार आहे तो, दादा!''

मग भास्कर आणि सगळे उठून गेले. आता मात्र सुमनने ठरवलं, हा दिवस माझा आहे. मी आता कुणालाच घाबरणार नाही. ती संध्याकाळ ती दोघंही दार बंद करून, एकमेकांच्या मिठीत बसून बोलत राहिली. बायची मुलं कुठं खेळायला गेली होती तेही त्यांना माहीत नव्हतं.

''सुमन, मी गोव्याला नोकरी करणार, तिथंच घर करणार. मग तुम्हाला नेणार. माझ्या पगारात तुम्हा सगळ्यांचं नाही भागणार, गरिबीत राहावं लागेल आपल्याला. राहशील का?''

''तुझ्याबरोबर राहिले तर मला कसली रे गरिबी लागणार? पण गोविंद...''

''पण काय, सुमन?''

''अविवाहित मुलीला सोडून गेलेल्या पुरुषाला विसरायचं वेड लागतं म्हणतात!''

''पण मी कसा विसरेन ग तुला?''

" नाही ना रे विसरणार ? " म्हणत सुमनने त्याला मिठीत घट्ट आवळून घेतलं.

मग ती उठली. छान तोंड-बिंड धुऊन केस विंचरले, पावडर लावली. डोळ्यांत काजळ घातलं. बागेत जाऊन कसलीशी फुले आणून केसांत घातली. ट्रंकेतून नवी साडी काढून नेसली. नेहमी परकर-पोलक्यात ती उगाचच गावढळ, मळकटशी वाटायची. आपल्या देहाच्या नीटनेटकेपणाकडे तिचं लक्षही नसायचं. पण आता सजल्यावर ती सुरेख, टवटवीत, लाल जास्वंदीच्या फुलासारखी दिसत होती.

" इतकी कशासाठी सजली आहेस तू, सुमन ? "

" तुझ्यासाठी. तुझ्याचसाठी अशी सजले आहे रे मी ! "

" वेडपणाच करतेस तू... ! "

केसांतल्या फुलांचा, आपल्या शरीराचा वास त्याला हुंगू द्यायला बसल्यासारखी सुमन त्याला अगदी खेटून बसली. प्रेमाच्या गुलगुल गोष्टी त्याच्या कानात कुजबुजू लागली. ती काय बोलते ते गोविंदला नीट कळत नव्हतं. पण तशीच आपल्यामधे सामावत ती बसून राहावी असं वाटत होतं.

" गोविंद, मला खूप इच्छा होते रे, आपण दोघांनीही भिल्लमाडांशी जावं आणि तिथे तू मला मिठीत घ्यावंस ! "

" पण ती आडवणातली, खंडवणातली वाट आपण पार करू शकणार नाही ! "

ती दोघंही आता मैथुनमग्न नाग-नागिणीसारखी सर्व शरीर एकमेकांना वेढून पडली होती. दोन तरूण शरीरं आणखीन जवळ येण्याचा सर्व ताकदीनिशी प्रयत्न करीत होती. दोन शरीरांची ती तडफड आणि धडपड! त्यांचे उष्ण श्वास, छातीची धडधड, रंध्रन् रंध्र फुललेली शरीरं एकमेकांत अगदी सामावून गेली होती. दोघांच्याही तनमनाचा एकच आवेश, एकमेकात संपूर्ण विलीन व्हायचं. अद्वैताचा, एकरूपतेचा एक अनोखा सोहळा !

जरा वेळाने ती उठून बाहेर आली. थोड्याच वेळापूर्वी वस्तीतल्या पुरुषांनी इथं आपल्याविषयी गोंधळ घातला होता ते आठवून ती काहीशी उदास झाली. तिला वाटलं, इथली शीतलता कुणीतरी ओढून नेली आहे, चारी बाजूची ही घरं आगीची झाडं झाली आहेत आणि बाहेर विजा कडाडून पाऊस पडतो आहे. मधेच एक पाना-फुलांनी भरलेली वेल आगीपासून स्वतःला सांभाळत अंग ओढून उभी आहे. किती दिवस ही वेल उन्हा- पावसापासून स्वतःचं रक्षण करणार आहे !

ती घाबरल्यासारखी झाली आणि तिला पुन्हा गोविंदच्या आलिंगनाची ओढ लागली. ती आत गेली.

"गोविंद, तुला उद्या जायलाच हवं का रे? आणखीन फक्त एकच दिवस नाही का राहता येणार?"

"नाही ग, माझा मामा... माझा भाऊ..."

त्वरेने सुमनने त्याच्या तोंडावर हात ठेवला. आता प्रेमाशिवाय दुसरं काहीच बोलायचं नाही. नाहीतर मी गलितगात्र होईन गोविंद, मला उगीचच वाटतं, ही आपली पहिली आणि अखेरची रात्र आहे! ही रात्र आज आमची!"

"नको ग राणी, फक्त मृत्यूच आता आपल्याला एकमेकांपासून दूर ठेवेल!"

"कुणाचा मृत्यू? माझा? मी देवाकडे मागते, मला माझ्या आई- सारखं, बायसारखं अहेवपणाचं मरण दे!"

"लग्न व्हायच्या आधीच हे कसलं तुझं मागणं?"

"लग्न होवो अगर न होवो. आता तुझ्याकरताच मी मृत्यूला आपलासा करणार."

"प्रेमाच्या गोष्टी करू या म्हणत होतीस ती एकदम मरणाच्या गोष्टी बोलायला लागलीस?"

"नाही रे" म्हणत ती उठली. मुलांना वाढलं. जेवून झाल्यावर त्यांना स्वयंपाकघरातच झोपवलं. मग ती दोघंही जेवली आणि रातराणी फुलायची वाट पाहत बसल्यासारखी थोडा वेळ बसून राहिली.

मग तिने बसायच्या खोलीत गोविंदचा बिछाना घातला. उशीजवळ पाण्याचा तांब्या ठेवला. झोपायला ये म्हणत त्याला हाताला धरून उठवलं, तो उभा राहिल्यावर सुमनने दिवा मालवला. झरझर पोलक्याची बटणं काढली, अंगावरचे कपडे काढून पायाखाली टाकले. वीज होऊन तिने गोविंदला आलिंगन दिलं. उसासत, हुंकारत ती त्याचं अंग स्पर्शीत होती.

"आजच हे कशाकरता ग, सुमन?"

"गोविंद, उद्या मी म्हातारी होणार. ही रात्र पुन्हा नाही रे येणार! तू मला तसाच उत्कंठा लावून जाणार! कसलाही संकोच बाळगू नकोस, तू माझा मनाने वरलेला नवरा आहेस! माझं शरीर तुला दिलं नाही तर जन्मभर माझं मन मला खात राहणार. हे शरीर तुला वाहिलं तर त्याचं सोनं होईल. नाहीतर त्याचं कस्पटाएवढं देखील मोल नसणार!"

हळूहळू गोविंदची गर्भकणी जागू लागली, शरीरात चैतन्य सळसळलं.

ह्या किरकोळ वाटणाऱ्या मुलाचं हे पौरुष्य जाणवून सुमन आश्चर्याने सुखावली. तिच्या शरीरावर जय मिळवल्यासारखा तो तिला हवं तसं खेळवत होता. हळूहळू सुमन कापरासारखी त्याच्या मिठीत विरून गेली. रेशमाच्या मुलायम लडीसारखी अंथरुणावर पडून राहिली.

मग बराच वेळ तृप्तीचे हुंकार देत ती दोघं एकमेकांच्या मिठीत पडून होती. कानात कुजबुजायची, त्यादेखील लहानपणातल्या गोष्टी. भविष्याविषयी बोलायची जणू भीती वाटत होती. गोविंदला झोप येत आहे असं दिसल्यावर तिने आपलं शरीर त्याच्याभोवती वेढीत म्हटलं, "आपलं काय ठरलं आहे, गोविंद ? आजची रात्र आपण जागवायची."

खरंच ती रात्र त्यांनी जागवली. तरीही सकाळी उठल्यावर सुमन मोगरीच्या फुलासारखी ताजी टवटवीत दिसत होती, तिचं मन हळुवार होऊन वाऱ्यासवे उडत होतं. स्वतःभोवतीच एक गिरकी घेत कुठल्याशा गाण्याची एक ओळही तिने गायली. मग ती कामाला लागली. घाई होती, गोविंद आता सकाळच्या लाँचने गोव्याला जाणार होता!

गोविंद कपडे करीत असताना सुमन मधेच म्हणाली, "गोव्याला कशाला जातोस तू आता ? सरळ मामाच्या घरी जा आणि दत्तक हो त्याचा. मग त्याने ठरवलेल्या मुलीशी लग्न कर."

"का बरं ?"

"मी हवी होते ना रे तुला ? मी आता संपूर्णपणे तुझी होऊन गेले. आता काय राहिलं ?"

"मग तू काय माझी रखेल म्हणून या गावात राहणार आहेस ?"

"तोंड फोडीन हं तुझं. बराच आहेस की रे!"

"चल, मला उशीर होईल. माझी पिशवी कुठं आहे ?"

"खरंच तू परत येशील, गोविंद ?"

"हो ग, नदी पार करून मी परत येईन, येत राहीन. कुणाला नाही घाबरणार."

"हे लोक देतील तुला यायला ?"

"कोण लोक ?"

"कुणी नव्हे. फक्त एकदाच जरा आत येशील ?'

आणखी नको सुमन आता." तो दारात उभा राहिला आणि समोरून तिघेही भाऊ आणि मामा येताना दिसले.

तिघेही भाऊ मुठी आवळीत, धप्प धप्प पावलं टाकीत येत होते. तिघेही

दांडगे, धष्टपुष्ट. त्यांच्या चालण्याने धरणी जणू हलत होती. ते तिघेही अंगणात येऊन उभे राहिले आणि जोरात मोठ्या भावाने गर्जना ठोकली, "गोविंद ये, आधी अस्सा बाहेर ये!"

तो वळचणीत येऊन उभा राहिला, "गोविंद, तू मामाला दत्तक व्हायला नकार दिलास?"

गोविंद तसाच मुठी आवळून भावाजवळ ताठ उभा राहिला आणि म्हणाला, "हो, मला दत्तक व्हायचं नाही!"

"का?"

"मला सुमनशी लग्न करायचं आहे."

सुमन मागेच उभी होती. त्याचं ते उत्तर ऐकून तिला वाटलं, 'या क्षणीच तिचं गोविंदशी लग्न होऊन गेलं!

गोविंदचं ते उत्तर ऐकून थोरला भाऊ क्रोधाने बेभान झाला. पुढे येऊन त्याने एक थप्पड गोविंदच्या कानफटीत लगावली, मधल्याने शिव्या हासडत त्याचा एक हात धरून ओढला आणि पाठीवर एक ठोसा मारून त्याला अंगणात जमिनीवर लोळवलं. सुमन कळवळली आणि गोविंदजवळ धावली पण त्याने सुमनलाही बाजूला ढकलून दिलं.

तिघाही भावांनी सुमनलाच दोषी ठरवून इतक्या गलिच्छ शिव्या दिल्या की सुमनला त्या ऐकणं शक्य झालं नाही. कोणतही प्रत्युत्तर न देता ती तशीच त्या शिव्या ऐकत गप्पच राहिली, अंगावर घाण टाकल्यासारखं वाटत होतं तिला.

नंतर ते तिघेही गोविंदला घट्ट पकडून ओढीतच घेऊन गेले. दोघांनी दोन्ही बाजूंनी त्याचे बाहू इतके घट्ट पकडले होते, सुमनला वाटलं, त्याचे कोमल बाहू चेचून निघतील. थोरला म्हणत होता, "या दळभद्र्याला यापुढे ही नदी ओलांडून या तीरावर यायला देणार नाही आम्ही."

मामा मुकाट्याने आपल्या घरी परत गेला. तिघेही भाऊ गोविंदला घेऊन असनोटीला जायला निघाले. सुमन खिन्न मनाने घरासमोरच्या फाटकाजवळ येऊन उभी राहिली. मोकळी शेतं तुडवीत ते चालत होते. गोविंद जराही विरोध न करता मुकाट्याने चालत होता.

सुमनला वाटलं, समोरच्या काळी नदीतून नावाप्रमाणेच काळं काजळ वाहत आहे. सकाळच्या उन्हात देखील ती आज एवढी का चकाकते आहे? तिच्यातली ती बेटं– आंबेजुवा, बोटजुवा आणि खारेजुवा. धामिणीने वेटोळं करून पडून राहिल्यासारखं विद्रुप दिसत होतं. सुमनला वाटलं, केरवडीच्या

टेकडीवरचा तो टेकडीएवढा घांग्रेचा खडक आत्ताच पडणार आणि हा सगळा परिसर त्याच्या खाली चिरडला जाणार.

जड पावलांनी ती परत आली. मुलं घाबरून माजघरात गप्प बसली होती. चटकन तिचा हात ओटी-पोटाशी गेला. तिथं थोडं दुखत होतं. तिने मुलांकडे जरासं संशयानेच पाहिलं, ही मुलं माझ्याच पोटी जन्माला आली होती की काय! नाहीतर ह्या जागी असं का दुखावं! मग लाजत-मुरकत ती विचार करू लागली — तो लबाड नाचून गेला आहे! वरून कसा भोळा, लाजरा-बुजरा वाटतो पण माझ्याशी धिंगाणा घालून गेला! ती स्वतःशीच हसली.

पण हळूहळू स्वतःच्या विचारांचा, हसण्याचा तिलाच राग आला. चारी बाजूंनी असा आगीचा वर्षाव होत असताना आपण हे सुख घेऊच कशी शकले याचं तिला आश्चर्य वाटलं. अरे देवा, मघाशी माझ्या गोविंदला त्याने कसं मारलं?

घराच्या आत गेलो तर आपल्याला हमसाहमशी रडू येईल असं तिला वाटत होतं. ती बाहेरच ओटीवर बसली, चढतं उन्ह बघत.

वस्ती उठून गेल्यासारखं सारं शांत होतं. सुमनला उगीचच वाटलं, वस्तीतला प्रत्येक जण दारं-खिडक्या बंद करून, डोंगराकडे तोंड करून चालतो आहे. साळुआजी कधीतरी सांगायची, '' ह्या जागी खुंट पुरायच्या आधी घनदाट जंगल होतं. ते जंगल पुन्हा एकदा उगवणार, टाकळा उगवणार, काटेकुटे मातणार. आपा वेडा होऊन फिरणार, बायची तिरडी उठणार. मग तिथं एक कांचनमृग राहायला येणार... ''

सुमन अचानक विचारांच्या तंद्रीतून बाहेर आली. तिने पाहिलं प्रत्येक खिडकीमागे माणसं आहेत. पण त्यांनी दरवाजे फक्त माझ्याकरताच बंद केले आहेत. कधी नव्हे ती दारांना कडी-कुलपं लावली आहेत. गणपतआजोबा कधी कधी म्हणतो, जगात कलियुग सुरू झालं आहे. पण या वस्तीत ते नेमकं कधीपासून सुरू झालं आहे ते सुमनला कळत नाही! पण तिला एक गोष्ट कळून चुकली आहे, लोकांची चूक नव्हे, काही दुःखं एकट्याचीच असतात. विधवा दुःखसारखी एकट्याने भोगायची!

दूर नदीच्या प्रवाहाकडे लक्ष गेलं तर उजेडात, नदीच्या काळ्या पाण्यावर विषारी नाग नाचत असल्यासारखे दिसत होते.

गोविंद ही नदी पार करून पैलतीरी पोचला असेल काय?





शिद्दर ते अगडीच्या तारीपर्यंत दोन मैलांची वाट चालून येताना, भाऊ त्याला एकच प्रश्न विचारीत होते, “ तू दत्तक होतोस की नाही ? ”

तो फक्त ‘ नाही ’ म्हणत होता. त्याने त्यांना एकच प्रश्न विचारला, “ तुम्ही सुमनचा अपराध नसताना का एवढ्या शिव्या दिल्या ? ” त्यावर मधल्याचा हात वर गेला पण थोरल्याने तो धरला आणि म्हटलं, “ एकदा घरी पोचू दे, मग दाखवतो काय ते. कसा नाही म्हणतो ते बघतो ना ! ”

ते अगडीच्या तारीजवळ नदीच्या तीरावर पोचले तेव्हा भरतीने नदीला उधाण आलं होतं, ती दुथडी भरून वाहत होती. आधीच काळी नदी ह्या अगडीच्या वळणावर अक्राळ विक्राळ रूप घेते, त्यात भरतीची भर !

पण गोविंदच्या मनात वेगळाच विचार चालू होता. इथं शिद्दराम डोंगराच्या पायथ्यापाशी एकदा कधीतरी लग्नाची एक होडी नवरा-नवरीसकट नदीत बुडाली होती म्हणे ! अजूनही तिथं रात्रीची वाजंत्री वाजतात म्हणे आणि नवरा-नवरी नदीतून वर तीरावर येऊन प्रणयक्रीडा करतात.

गोविंदला वाटलं, मी आणि सुमन दोघांनी मिळून शिद्दराम डोंगरावरून नदीत उडी घ्यावी ! मग युगानुयुगे आम्हालाही तो प्रणयाचा खेळ खेळता येईल... पण दुसऱ्याच क्षणी त्याला आठवलं, सुमनला तिची मुलं आहेत ! माझ्यासारखी एकटी नाही ती ! मी एकट्याने हे मरण मरावं ! दुःखाची, वैफल्याची एक खोल वेदना त्याच्या काळजापर्यंत उतरली.

“ तारयामामा, ढकल होडी नदीत. ”

“ भरतीचा प्रवाह, तार आवरता येईल ? ”

“ दे एक वल्हं माझ्याकडे. ” थोरल्याने वल्हं हातात घेतलं. नावाड्याने होडी ढकलली. थोरला वल्हं मारीत होता आणि नावाडी नाव आवरून धरीत होता. क्षणाक्षणाला होडी खाली वर होत होती.

वर केरवडी, करकल, खारगे, हुळगे ते खाली कडवाड, कोडीबाग, सदाशिवगडापर्यंत पाण्याचा एक सागर पसरला होता. चारी बाजूंनी हिरवेगार डोंगर, बेटं, शेतं आणि गावं यांनी सागराला वेढून घेतलं होतं. सृष्टीचं हे विशाल रूप बघून डोळे दिपत होते. नजर फिरवल्यास चटकन निंसर्गाचं वेड लागल्यासारखं होत होतं.

होडी अगदी नदीच्या मध्यावर पोचली. खोल आणि जोराच्या प्रवाहात ती क्षणभर कलली. डोळ्याचं पातं लवतं न लवतं एवढ्यात गोविंद बसल्या जागेवरून उठला आणि त्याने नदीच्या प्रवाहात स्वतःला झोकून दिलं. उडी घेताच तो खोल खोल गेला. फुगा फुटल्यासारखं एकदाच त्याचं डोकं पाण्यावर

दिसलं आणि नाहीसं झालं.

नदीच्या मध्यभागी तिघाही भावांची बोंबाबोंब! असनोटीचे लोक ते, त्यांच्या गावात ना नदी ना नाला. कुणालाच पोहता येत नव्हतं. नावाडी तर प्रवाहात वाहून जाणारी होडी संभाळताना धापा टाकीत होता. मोठ्या प्रयत्नाने त्याने ती होडी किनाऱ्याला लावली.

एवढा मोठा पाण्याचा सागर, त्यात एवढासा तरूण बुडालेला. तिघेही भाऊ किनाऱ्यावर बसून, डोक्यावर हात मारून घेत आणि छाती बडवून घेत रडत होते. नावाड्याने उभा राहून जोरात कलकलाट केला. "पोर बुडाला, बुडाला होऽऽऽ!" दोन्ही तीरांवर त्या किंचाळ्या गर्जत गेल्या. छोट्या होड्यांतून मासे पकडणारे स्तब्ध झाले. कडवे, कूळ, कांटोळी लावणारे कोळी वगैरे सगळे सावध झाले. उसाच्या मळ्यात पाणी काढणाऱ्यांच्या हातातले कळसे हातांतच राहिले. बघता बघता तीन-चार होड्या नावाड्याच्या दिशेने येऊ लागल्या.

आता प्रवाहाने पण आपली दिशा बदलली होती आणि नदीला ओहोटी लागत होती.

काळ्या नदीच्या ह्या कदीम प्रवाहात एक आभाळ कोसळून पडल्याची जाणीव नदीला नसावी. चंदन रानातून वाहत येत अथांग अरबी समुद्राला मिळणारी ही नदी दोन्ही तीरांवरच्या दुःखांविषयी काहीशी बेफिकीर होऊन वाहत असते! पुन्हा तिची खोल, काळी ---, दुःखाची दवंडी पिटत चालल्यासारखी प्रत्येक खडकावर आणि वळणावर खळाळत जाते! पुन्हा ही काळी नदी अंगाने इतकी काळी कशी, याला उत्तर नाही! कारवारची ही गंगा खरी पण ती 'काळी' गंगा!

भरती-ओहोटीच्या संधिकालात सगळा प्रवाह भोवऱ्यासारखा गरगर फिरत होता. वरचा प्रवाह आणि तळातलं पाणी यांच्यात जणू संघर्षच चालला होता. नदीचा सगळा प्रवाह विश्वाकाराचा एक भोवरा होऊन फिरत होता. वरून दुपारचं प्रखर उन्ह आरपार चकाकत होतं. ते भाल्यासारखं पाण्यात उतरलं होतं. लहरी-लहरीतून वारा पाण्याच्या पाठीवरून फिरत होता पण त्याची दिशा नीट कळत नव्हती. खळखळतं पाणी, चकाकतं उन्ह, खेळता वारा आणि त्यांच्यामध्ये एक निर्जीव शरीर! वाटत होतं, निसर्गाने जणू निष्ठूरपणे गोविंदच्या शरीरातली सारी ऊब शोषून घेतली आहे आणि आता तो बेदरकारपणे धुडगूस घालतोय!

गोविंदचं कलेवर ब्रह्मांडाच्या प्रवासाला निघाल्यासारखं आपल्या दिशेने

वाहत जात होतं! प्रत्येक लाटेला तुडवीत ते चाललं होतं. त्याची दिशा कोण ठरवीत होतं काहीच कळत नव्हतं.

शिद्दर, कातने, करंजे, किन्नर आणि नासाच्या खडकापर्यंत दोन्ही तीरांवर कितीतरी माणसं किनारे शोधीत होती. हाका, किंचाळ्या, बोंबा ह्यांनी सारा परिसर भरून गेला होता. होडीवाले आपापली होडी घेऊन आंबेबेट, खारखेबेटापर्यंत शोधायला ग़ेले होते. मासे पकडणारे पकडणं सोडून नदीवरच फेऱ्या मारीत होते. गवत पेटल्यासारखी बातमी पसरली होती आणि लोक नदीकडे धावत होते.

पण संध्याकाळचं पिवळं उन्ह अंगावर येईपर्यंत कलेवराने आपला प्रवास पूर्ण केला होता आणि ते शिद्दरच्या खालच्या वस्तीजवळ येऊन किनाऱ्याला लागलं होतं!

सुमनला जाणवत होतं, आपल्यावर एक मोठ्ठं अरिष्ट येऊन गेलं आहे. सगळी धावपळ, सगळा आकांत तिला समजत होता. पण कुणाला काही विचारायचा धीरच होत नव्हता. कुणीतरी पटकन म्हणेल, ‘‘अग, आकाश कोसळून पडलं ना ग!’’ धडधडत्या काळजाने ती तशीच गप्प बसून राहिली. सारखा सारखा अंगावरून सतत घाम गळत होता. आणि शुद्धी गेल्यासारखं व्हायचं. वाटत होतं, ह्या सगळ्या लोकांनी माझ्यावर अगदी बहिष्कार टाकला आहे, त्यांना मला काहीच सांगायचं नाही म्हणून दूर दूर पळताहेत. पण शेवटी हे माझ्याच उरावर येऊन थांबणार!

तिन्हीसांजेच्या वेळी सुमित्राकाकी आली. ‘‘तू अशी का कोमेजली आहेस, अशी पांढरीफटक का पडली आहेस ग, सुमित्राकाकी? तू आत्ताच रडून आली आहेस का ग? तुझ्या शब्दांतून रक्त सांडतंय! काय झालं ग, सुमित्राकाकी?’’

‘‘बाळे, तुझ्या गोविंदने काळ्या नदीत उडी घेतली, जीव दिला ग!’’

‘‘जीव दिला?’’ शब्द काळीज फुटून आत भिनल्यासारखे वाटले. थोडा वेळ आतडी पिळवटून नसा तुटून त्यांचा सुंभ झाला. पण ती मुळीच रडली नाही. रडून हलकं वाटल्यास आपण त्याच्याशी कृतघ्न होऊ अशी तिला भीती वाटली. त्याच्यासाठी रडण्याकरता तर आयुष्य आहे सारं!

ती उठली. तिच्या दोन्ही हातात दोन-दोन कुवार बांगड्या होत्या त्या तिने काढल्या आणि केळीच्या मुळाशी नेऊन टाकल्या; आपलं कुवार कुंकूही तिने डाव्या हाताने पुसून टाकलं. आत गेली आणि आपली कुवार वस्त्रं– परकर-पोलका– उतरून ठेवली आणि साडी नेसली. साडीच्या पदराचं टोक

तोंडावर घेऊन काळोखात ती गप्प बसून राहिली!

गोविंद, तुझ्यासाठी मला अहेवपणाचं मरण मरायचं होतं रे! पण माझ्या नशिबात हे – कुवार वैधव्य वाट्याला आलं!!

☆ ☆



'' माझ्या कारवारच्या मातीला ''
– श्री. सैल यांनी ' काळीगंगा ' ही कादंबरी अर्पण केली आणि आपण कारवारच्या ऋणातून मुक्त झालो असं त्यांना वाटलं.

श्री. रवींद्रनाथ टागोरांचंही प्रथम–दर्शनीच आपल्या सृष्टिसौंदर्याने मन जिंकणारा ' कारवार ' हा गोव्याच्या दक्षिण सीमेलगतचा भाग. गोव्यापासून दुरावल्यावर विस्थापित जीवनाची व्यथा कारवारने भोगली आहे. कष्ट आणि गरिबीशी संघर्ष हा जणू तिथल्या लोकांचा स्थायीभाव बनला आहे.

तसं पाहिल्यास पूर्वीच्या सगळ्या संस्कृतींचा उगम नदीच्या काठीच झालेला आहे आणि तिथंच त्यांचा उदयही झाला. कारवारची संस्कृतीदेखील ' काळी नदी ' या नदीच्या काठाशीच निगडीत झालेली आहे. म्हणून लेखकाने तिला ' काळीगंगा ' संबोधली आहे.

या रमणीय परिसराचं वर्णन ' काळीगंगा ' वाचताना आपण ते प्रत्यक्ष अनुभवतो. ते नुसते शब्द न राहता कोरीव शिल्पासारखे आपल्यासमोर येतात. तिथली माणसंसुद्धा गुणदोषांनी परिपूर्ण असलेली येथे चित्रित झालेली आहेत. त्यामुळे ही कादंबरी प्रथमपासूनच वाचकाच्या मनाची पकड घेते व ती वाचून संपवल्यावर एका उत्कृष्ट कादंबरीचा आनंद वाचकाला अनुभवाला येतो.

अनेकविध अनुभवांनी समृद्ध झालेलं श्री. सैल यांचं जीवन आणि त्यातून वैश्विक धार असलेली त्यांची प्रतिभा यांनी कारवारच्या मातीचं सोनं झालं आहे, म्हणूनच त्यांना त्या मातीच्या ऋणातून मुक्त झाल्यासारखं वाटलं असावं.

श्री. सैल यांच्या साहित्याची यादी खूप मोठी आहे पण ' काळीगंगा ' या कादंबरीने कोकणी साहित्याचं उच्चतम शिखर गाठलं आहे.

प्रतिमा प्रकाशन